# ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिद्धी

(केवळ तिङन्त)

शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
संस्कृत विषयातील पीएच. डी. पदवीसाठी
सादर केलेला प्रबंध

संशोधक
श्री. नीलेश निशिकांत जोशी
एम. ए. (संस्कृत)

मार्गदर्शिका
डॉ. श्रीमती सुहासिनी श. राजेभोंसले
एम.ए., पीएच. डी.
संस्कृत विभाग,
लाल बहादूर शास्त्री महाविद्यालय, सातारा

डिसेंबर २०१०

# DECLARATION

I hereby declare that the thesis entitled ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिद्धी (केवळ तिङन्त) completed and written by me has not previously formed the basis for the award of any Degree or Diploma or other similar title of this or any other University or examining body.

Research Student

**(Joshi Nilesh Nishikant)**

Place : SATARA

Date : 7/7/2011

SHIVAJI UNIVERSITY, KOLHAPUR-416 004, MAHARASHTRA
PHONE : (Dir.) 2693176,2609067,2609068
☐ GRAM : UNISHIVAJI ☐ FAX : 0091- 1231- 2690655
शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर – ४१६ ००४
दूरध्वनी : (थेट) 2693176,2609067,2609068
☐ तार : युनिशिवाजी ☐ फॅक्स: 0091- 1231- 2690655
E-mail : coe@unishivaji.ac.in
Web : www.unishivaji.ac.in

★★★★★ B+
Accredited by NAAC

Dr. B. M. Hirdekar
M.A., M.Ed., LL.B. (Spl), Ph.D.
Controller of Examinations

# Declaration of Result

It is hereby declared that the thesis entitled,

ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिद्धी
(केवळ तिङन्त)

submitted by **Shri. Joshi Nilesh Nishikant** in **Sanskrit** under the **Faculty of Arts & Fine Arts** is accepted by the University authorities for the award of the Degree of **Doctor of Philosophy** in **Sanskrit** under the **Faculty of Arts & Fine Arts** on **25-10-2013.**

**Controller of Examinations**

No. SU/PG/EXAM/Ph.D./ 7729
Date : 11 NOV 2013

To,

1. Shri. Joshi Nilesh Nishikant
   Laxmi Apartment F 8,
   Godoli, Satara.
2. Dr.(Smt) S. S. Rajebhonsale - Guide
   Department of Sanskrit,
   L.B.S. College, Satara.
3. The Librarian, Barr. Balasaheb Khardekar Library, Shivaji University, Kolhapur.
4. The Head, Department of ———, Shivaji University, Kolhapur.
5. Statement of Marks / Certificate Unit.
6. Convocation Unit.
7. Statistics Section.

# CERTIFICATE

This is to certify that the thesis entitled **ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिद्धी (केवळ तिङन्त)** which is being submitted herewith for the award of the **Degree of Doctor of Philosophy in Sanskrit of Shivaji University, Kolhapur** is the result of the original research work completed by **Joshi Nilesh Nishikant** under my supervision and guidance and to the best of my knowledge and belief the work embodied in this thesis has not formed earlier the basis for the award of any Degree or similar title of this or any other University or examining body.

Research Guide

**(Dr. Smt. S. S. Rajebhonsale)**

Place : SATARA

Date : 7/7/2011

# ऋणनिर्देश

प्रबंधाचा विषय निश्चित करताना मनात अनेक संभ्रम निर्माण होत होते. पण व्याकरणावर आधारितच विषय असावा, हा मात्र दृढ निश्चय होता. मग त्यातूनच हा "वैदिक स्वरसिद्धी' विषय समोर आला. वास्तविक पाहता प्रथमत: व्याकरण त्यातही वैदिक व्याकरण व पुन्हा वैदिक स्वरसिद्धी म्हणजे अत्यंत दुर्घट, दुरुहतम आणि अशात आमची अल्पविषया मती. पण केवळ गुरुकृपेने, व मातापित्यांच्या आशीर्वादानेच हे अवतरण!

गुरुवर्य पं.म.म.हरेकान्त मिश्र, पं.म.म.वासुदेवशास्त्री अभ्यंकर, पं.काशिनाथशास्त्री अभ्यंकर यांसारख्या वैयाकरणकुलविभूषणांनी ग्रंथरुपाने निर्मित द्वारामुळेच हा विषयप्रवेश संभवला, म्हणून मी त्यांचा शतश: ऋणी आहे.

वैदिक स्वरसिद्धी विषयाचा अफाट विस्तार ज्यांच्या मार्गदर्शनाने मला संक्षिप्त करता आला त्या डॉ. सरोजा भाटे, त्यांनी "केवळ तिङन्त' असा बदल सुचविला व दुर्लक्षित तिङन्त स्वरांचा अभ्यास माझ्याकडून घडला. म्हणून मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

भाटे मॅडमकडे जाण्याची वाट दाखविणाऱ्या व नेहमी माझ्या अडचणींना सोडविणाऱ्या डॉ. अंजली पर्वते, ज्यांनी मला खऱ्या अर्थाने शब्दांकडे बघायला व त्यांच्याशी सुसंवाद कसा साधावा हे शिकविले. त्यामुळे त्यांचा मी कायमच ऋणी आहे व पुढेही राहीन.

असा दुरुह विषय घेऊन समोर आलेल्या माझी आपला विद्यार्थी म्हणून मान्यता देऊन, विषय मांडणीपासून अगदी उपसंहारापर्यंत सर्व तात्त्विक बाबी परिपूर्ण करवून घेणाऱ्या माझ्या गुरुवर्या श्रीमती डॉ. सुहासिनी राजेभोंसले, ज्यांच्यामुळे हा विषय मी आज शिवाजी विद्यापीठात पीएच. डी. पदवीसाठी सादर करू शकत आहे.

या सर्वांबरोबर माझे कुटुंबीय आई, वडील व माझी बहीण नीलाक्षी यांनी जी मला प्रबंधाच्या कामासाठी मदत व सोईसुविधा बसल्या जागी उपलब्ध करून दिल्या. त्याबद्दल त्यांचे ऋण व्यक्त करताना माझ्याकडे शब्द नाहीत.

भांडारकर ओरियंटल रिसर्च इंन्टिट्युटचे ग्रंथपाल, शिवाजी विद्यापीठ, पुणे विद्यापीठ यांचे ग्रंथपाल, तसेच "संस्कृत रत्नाकर" या पुस्तक दुकानाचे मालक श्री. गोडबोले यांनी जी पुस्तकांची उपलब्धता करून दिली त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

याचबरोबर सांगलीचे श्री. प्रतापजी भाटे यांनी मी संस्कृतमध्ये व वैदिक व्याकरणावर प्रबंध लिहित आहे हे समजताच शिष्यवृत्ती दिली, त्यांच्या या उदारतेबद्दल मी खरच त्यांचा आभारी आहे. याचबरोबर श्री. डी.व्ही.आपटे, गीताप्रतिष्ठान मिरज, प्रा.श्री.भास्कर जोगळेकर, श्री. महेश धुरी, श्री. उदयसिंह सावंत, प्रा.रूपाली वाडेकर यांनी केलेल्या मौलिक मदती बद्दलही ऋणी आहे.

मे. रिलॅक्स सायक्लोस्टायलिंग, सातारा चे श्री. मुकुंद ढवळे व श्री. कुलकर्णी यांनी अत्यंत योग्य प्रकारे संगणकीय मुद्रण करून प्रबंधाची शोभा वाढविण्यास मदत केली. त्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहे.

या शिवाय या प्रबंध निर्मितीत प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे मदत करणाऱ्या सर्वांच्या बद्दल माझ्या ठिकाणी आदरयुक्त भावना आहे व ती कायम राहील. त्यांचा नामोल्लेख केवळ ही त्यांची एक प्रकारची अभिव्यक्ती. त्यातूनही जर कोणाचे नाव अनवधानाने राहिले असले तरी त्यांच्या बद्दलही माझी भूमिका तीच आहे, जी इतरांबद्दल मी व्यक्त केली.

**(नीलेश निशिकांत जोशी)**

स्थळ : सातारा

दिनांक :

# अनुक्रमणिका


| | विषय | पृष्ठ |
|---|---|---|
| ● | संक्षेप सूची | VI |
| ● | संकेत सूची | VII |
| | **उपोद्घातप्रकरणम्** | **१ ते ६९** |
| | **उदात्तकांड** | **७१ ते २८८** |
| | ■ धातुस्वर | ७७ |
| | ■ विकरणस्वर | १२५ |
| | ■ प्रत्ययस्वर | १५५ |
| | ■ आगमस्वर | १९१ |
| | ■ अभ्यस्तस्वर | २२१ |
| | ■ गतिनिघातस्वर | २४१ |
| | ■ संकीर्ण स्वर | २५९ |
| | **अनुदात्तकांड** | **२८९ ते ५९५** |
| | **उपसंहार** | **५९७ ते ६४३** |
| | **परिशिष्ट** | **६४५ ते ७२५** |
| | ■ दशलकाराणां सस्वरप्रत्ययसूची | ६४५ |
| | ■ भूधातो: दशलकारस्थ-सस्वररूपाणि | ६४९ |
| | ■ सस्वर धातुपाठ: (ग्रन्थांतर्गत:) | ६५० |
| | ■ स्वरसाधकपाणिनीयसूत्राणि | ६५७ |
| | ■ स्वरविषयकवार्तिकानि | ६७० |
| | ■ फिट्सूत्राणि | ६७१ |
| | ■ नैघण्टुकधातुपाठ: | ६७५ |
| | ■ उदात्ततिङन्त सूची | ६७९ |
| | ■ लकारानुसारी अनुदात्ततिङन्तसूची | ६८८ |
| | ■ अनुदात्ततिङन्तसूची | ७०२ |
| | ■ संदर्भ ग्रन्थसूची | ७१७ |

# संक्षेप सूची

| संक्षेप | ग्रंथ |
|---|---|
| अथर्व. प्राति. | अर्थ प्रातिशाख्य |
| आपि. शि. | आपिशलि शिक्षा |
| आवृ. | आवृत्ती |
| उ. सू. | उणादि-सूत्र |
| ऋ. सं. | ऋग्वेदी संहिता |
| ऋक्. प्राति. | ऋक् प्रतिशाख्य |
| ऋक् सा. भा. | ऋक् सायण भाष्य |
| ऋक् सा. भा. भूमिका | ऋक् सायण भाष्य भूमिका |
| ऐ. आ. | ऐतरेय आरण्यक |
| का. वृ. | काशिका वृत्ती |
| काश. व्या. | काशकृत्स्न व्याकरण |
| चतुर. | चतुरध्यायिका |
| चा. परि. पा. | चान्द्र परिभाषा पाठ |
| चा. वृ. | चान्द्र वृत्ती |
| जै. व्या. सू. | जैनेन्द्र व्याकरण सूत्र |
| जै. शा. व्या. | जैन शाकटायन व्याकरण |
| त. टी. क्र. | तळटीप क्रमांक |
| तै. उप. | तैत्तिरीय उपनिषद् |
| तै. प्राति. | तैत्तिरीय प्रातिशाख्य |
| तै. प्राति. वै. आभ. भा. | तैत्तिरीय प्रातिशाख्य वैदिकाभरण भाष्य |
| द. उ. सू. | दशपादि-उणादि-सूत्र |
| निघ. | निघण्टु |
| निरु. | निरुक्त |
| न्यू. सं. डिक्श. | न्यू संस्कृत डिक्शनरी |
| पा. शि. | पाणिनीय शिक्षा |
| पा. सू. | पाणिनीय सूत्र |
| पारि शि. | पारि शिक्षा |

| | |
|---|---|
| पृ. क्र. | पृष्ठ क्रमांक |
| प्रतिज्ञा सू. | प्रतिज्ञा सूत्र |
| फि. सू. | फिट् सूत्र |
| भ. दी. | भट्टोजी दीक्षित |
| म. भा. | महाभाष्य |
| म. भा. पस्पशा. | महाभाष्य पस्पशाह्निक |
| रघु. | रघुवंश |
| ल. सि. कौ. | लघु-सिद्धान्त-कौमुदी |
| वा. | वार्तिक |
| वाज. प्राति. | वाजसनेयि - प्रातिशाख्य |
| वै. पुस्त. | वैदिक पुस्तकालय, अजमेर |
| वै. सि. कौ. | वैयाकरण-सिद्धान्त-कौमुदी |
| शब्द कौ. | शब्दकौस्तुभ (भट्टोजी दीक्षित) |
| शा. भा. | शाबर भाष्य |
| सं. व्या. शा. इति. | संस्कृत व्याकरणशास्त्र का इतिहास |
| सर. कण्ठा. | सरस्वती-कण्ठाभरण |
| सा. | सायणाचार्य |
| सार्थ. ल. अम. को. | सार्थ लघु-अमर कोश |
| सा. भा. | सायण भाष्य |

## संकेत सूची

| | |
|---|---|
| **अस्** ( ठळक अक्षर ) | उदात्त |
| सि॒ (अक्षराखाली रेघ) | अनुदात्त |
| सि॑ (अक्षरावर उभी रेघ) | स्वरित |

# ।। उपोद्घातप्रकरणम् ।।

।। ॐ ।।

ॐयस्य निःश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् ।
निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थमहेश्वरम्[१] ।।१ ।।
रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली
काकुत्स्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः[२] ।।२ ।।
वेदान्तवेद्यो यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः
जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः[३] ।।३ ।।
सन्नद्ध कवची खड्गी चापबाणधरो युवा
गच्छन्मनोरथोऽस्माकं रामः पातु सलक्ष्मणः[४] ।।४ ।।
येनाक्षरसमाम्नायमधिगम्य महेश्वरात्
कृत्स्नं व्याकरणं प्रोक्तं तस्मै पाणिनये नमः[५] ।।५ ।।

जगातील उपलब्ध वाङ्मयामध्ये वेदवाङ्मय हे सर्वात प्राचीन व श्रेष्ठ दर्जाचे वाङ्मय म्हणून ओळखले जाते. संहिता, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषदे या चार प्रकारांनी मिळून होणारा वेदवाङ्मयाचा विस्तार फार मोठा आहे. या सर्व वेदवाङ्मयाचे जतन भारतीयांनी हजारो वर्षांपासून अतिशय परिश्रमपूर्वक केलेले आहे. पिढ्यान पिढ्या हे ज्ञान मुखोद्गत करून पुढे संक्रमित केले. हे वाङ्मय जतन करताना त्यात कोणताही अयुक्त शब्द प्रयोग वा बदल होऊ दिला नाही, हे विशेष. हाच जगातील सर्वात मोठा चमत्कार वा आश्चर्य! कारण तसे झाले तर अर्थाचा अनर्थ होईल आणि असे प्रमादयुक्त उच्चारण वज्र होऊन पाठकाचा सर्वनाश करते,[६] जसे 'इन्द्रशत्रु' हे उदाहरण आहे.

---

१ ऋ.सा.भाष्य.१.१.१
२ रामरक्षास्तोत्रम्, श्लोक क्र. २३,
३ रामरक्षास्तोत्रम्, श्लोक क्र. २३,
४ रामरक्षास्तोत्रम्, श्लोक क्र. २१,
५ पाणिनीयशिक्षा, श्लोक क्र. ५७,
६ मन्त्रोहीनःस्वरतो वर्णतोवा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह सवाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोपराधात्।।पा.शि.५२।।

मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह।

स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोपराधात्।

## १.१ लौकिक व वैदिक भाषेतील अंतर -

वेदवाङ्मय व महाभारत, रामायणादिक ग्रंथ तसेच कालिदासादिक परवर्ती महाकवींच्या कलाकृती यांमध्ये संस्कृत ही एकच भाषा प्रयुक्त असली, तरी या दोहोंमध्ये अंतर दिसते. वेदेतर वाङ्मयीन भाषेला 'लौकिक' शब्द वापरला जातो. वैदिक भाषेत अनेक शब्द व त्यांची रूपे विभिन्न आढळून येतात, जी लौकिक भाषेत आढळत नाहीत. त्यामुळे वेदार्थ आकलन होणे कठीण होते. अशा प्रसंगी वैदिक व लौकिक अशा दोन्ही शब्दांचे ज्ञान असणे आवश्यक आहे. आणि या गरजेतूनच पुढे षड्वेदांगांची निर्मिती झाली. त्यात व्याकरण एक वेदांग आहे. व्याकरणाव्दारे लौकिक व वैदिक अशा द्विविध शब्दांचे अनुशासन केले जाते हे खुद्द महाभाष्यकारांनीच स्पष्ट केले आहे.[१] याविषयावर पुढे अधिक विवेचन होईल. येथे मात्र लौकिक व वैदिक भाषेतील अंतर स्पष्ट करण्यासाठी काही उदाहरणे देता येतील, ती पुढीलप्रमाणे -

### १.१.१ स्वररूप -

ऋग्वेदादिकांमध्ये उदात्त, अनुदात्त व स्वरित हे मुख्यत्वे करुन स्वर आढळतात. वेदमंत्रांमध्ये स्वरांकनास अत्यंत महत्त्व आहे. या स्वरांद्वारेच संहितापाठाचे क्रम, घन इ. पाठ केले जातात. तसेच अर्थनिर्णय प्रसंगी स्वर आवश्यक पाहिला जातो. जसे - 'स्थूलपृषती' हे महाभाष्यातील प्रसिद्ध उदाहरण आहे.[२] लौकिक संस्कृतात मात्र उदात्तादिक स्वर आढळत नाहीत. उदा. राजपुरुषः।

### १.१.२ व्यंजनरूप -

वैदिक प्रयोगामध्ये 'ळ' व 'ळ्ह' ही दोन व्यंजने जादा आढळतात. उदा.- अग्निमीळे पुरोहितम्[३]।। तसेच ''मरुद्भिरुग्रः पृतनासु साळ्हा[४]।।'' या व्यंजनांच्या सिद्धीसाठी

---

१ पहा. - म. भा. पस्पशा. १.१।१

२ पहा. - म. भा. पस्पशा. १।१।१

३ ऋ.सं. १।१।१

४ ऋ.सं. ७।५६।२३

ऋक्प्रातिशाख्यकारांनी ''दोन स्वरांमध्ये येणारा डकार व ढकार यांचे अनुक्रमे 'ळकार' व 'ळ्हकार' होतात.[१]'' असा नियम घालून दिलेला आहे. यालाच पिंगलाचार्यांनी 'दु:स्पृष्ट' अशी संज्ञा दिली आहे.[२] लौकिकात ही व्यंजने आढळत नाहीत.

**१.१.३ शब्दरूप -**

वेदामध्ये शब्दरूपांमध्ये वैचित्र्य आढळते. लौकिक नियमांना अनुसरुन रूपे आढळत नाहीत. जसे - पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो..[३]।। मध्ये 'पूर्वेभि:' रूप 'बहुलं छन्दसि'[४] या पाणिनी सूत्राने विकल्पाने एस् आदेश होऊन सिद्ध होते. तर लौकिकात 'पूर्वै:' असेच होते.

'औ' विभक्तीला 'आ' आदेश होतो. जसे - नाभा पृथिव्या..[५]।। येथे 'नाभौ' चे 'नाभा' रूप झाले आहे. तर 'ऋतस्यसाधुया[६]।।' येथे 'साधु:' असे लौकिक प्रथमैकवचन न होता 'याच्'[७] आदेश होऊन 'साधुया' बनले आहे.

याशिवाय प्रथमा व संबोधन बहुवचनाच्या 'जस्' प्रत्यया ऐवजी असुक् आगम होतो.[८] उदा. देवास:। ब्राह्मणास:।। ही उदाहरणे अनुक्रमे 'देवा:' 'ब्राह्मणा:' अशी लौकिकात आढळतात.

क्रियापदे, धातुसाधिते, विशेषणे, अव्यये इत्यादी अनेक ठिकाणी लौकिक व वैदिक संस्कृत भाषेत फरक आढळतो. पण हा फरक वा अंतर हेच वैदिक भाषेचे स्वतंत्र अस्तित्व महत्त्व व श्रेष्ठत्व प्रतिपादन करणारे आहे. त्यामुळे वेदाभ्यास करणाऱ्या व्यक्तीच्या दृष्टीने वैदिक व लौकिक भाषेतील अंतराची चांगलीच जाण असणे गरजेचे आहे. किंबहुना या साधुशब्दसिद्धीच्या ज्ञानाशिवाय ती व्यक्ती वैदिक प्रयोग यशस्वीरीत्या करुच शकत नाही. म्हणूनच वेदांचे रक्षण व संवर्धन आहे त्या परंपरागत मूलपाठात होण्यासाठीच व्याकरणादिक

---

१ ऋक.प्राति. १।२१।२
२ पाणिनीय शिक्षा श्लो. क्र. ५
३ ऋ.सं. १।१।२
४ पा.सू. ७।१।१०
५ ऋ.सं. १।१४३।४
६ ऋ.सं.१।४६।११
७ सुपां सुलुक्.। पा.सू. ७।१।३९
८ अज्जसेरसुक्। पा.सु. ७।१।५०।

शास्त्रांच्या अभ्यासाची आवश्यकता निर्माण होते. पूर्वीच म्हटल्याप्रमाणे व्याकरणशास्त्राच्या प्रयोजनांमध्ये 'रक्षा' व 'असंदेह' या प्रयोजनांचा मुख्यत्वे करुने समावेश होतो[१], तो याच कारणास्तव.

## १.२ वैदिक व्याकरणाचे स्थान व महत्त्व -

वेदाच्या सहा अंगांमध्ये व्याकरणाचे स्थान प्रमुख मानले आहे 'मुखं व्याकरणं स्मृतम्।[२]' तर महाभाष्यकारांनी व्याकरणास उत्तरा विद्या असे म्हटले आहे[३], तसेच सहाही अंगांमध्ये प्रधान मानले आहे[४]. वरील उल्लेखानुसार शब्दाच्या योग्यायोग्यतेचा निर्णय व्याकरणशास्त्राद्वारेच होऊ शकतो. तसेच वेदाध्ययन करु इच्छिणाऱ्यास तीन गोष्टींचे ज्ञान आवश्यक आहे - १) साधुशब्दसिद्धी २) शब्दार्थज्ञान ३) स्वरज्ञान आणि ही तीन मुख्य अंगे वैदिक व्याकरणाचीच आहेत, असे वाटते. कारण, लौकिक व्याकरणात जरी वरील दोन अंगाचा समावेश होत असला, तरी विशेष शब्दसिद्धी जसे. - 'पुनर्वसू'[५], 'विशाखा नक्षत्रम्'[६], 'अयस्मयं'[७], इ. यासाठी खास पाणिनीय व्याकरणात स्वतंत्र सूत्र रचना करावी लागली आहे यावरुन स्पष्ट होते की, वेदाच्या अध्ययनात व्याकरणशास्त्राचा महत्त्वाचा सहभाग आहे. किंबहुना त्याशिवाय योग्य उचितार्थोत्पत्ती असंभवनीय आहे.

हे वैदिक भाषेचे वैशिष्ट्य लक्षात घेऊनच पाणिनी महर्षींनी साधारणपणे ३०० सूत्रांची रचना केवळ वैदिक शब्दसिद्धीसाठी केली आहे, तर सुमारे ४०० सूत्रांनी वैदिक स्वरसिद्धी सांगितली आहे. यावरुन स्पष्ट होते, की जवळपास ७०० सूत्रांचा वैदिक व्याकरणात समावेश होतो. पाणिनीच्या परवर्ती प्रकरणग्रंथाकारांनी हीच सूत्रे दोन खंडात विभागली व त्यांना अनुक्रमे 'वैदिकी प्रक्रिया' व 'स्वर प्रक्रिया' अशी नावे दिली. यामध्ये भट्टोजी दीक्षिताच्या

---

१ "रक्षोहागमलघ्वसन्देह." म.भा. पस्पशा.१।१।१
२ पा.शि. ४२
३ म.भा. १।२।३२
४ म.भा.- "प्रधानंचषट्स्वङ्गेषु व्याकरणम्"। १।१।१
५ छन्दसि पुनर्वस्वोरेकवचनम्। पा.सू. १।२।६१।
६ विशाखयोश्च। पा.सू. १।२।६२।
७ अयस्मयादीनि छन्दसि। पा.सू. १।४।२०

सिद्धान्त कौमुदीचा[१] उल्लेख करणे आवश्यक आहे. यामध्ये २६१ सूत्रांचा 'वैदिकी प्रक्रिया' खंडात समावेश करुन स्पष्टीकरणार्थ वृत्ती लिहून ठिकठिकाणी वैदिक उदाहरणे दिलेली आहे. तर 'स्वरप्रक्रिया' या खंडात ३२८ पाणिनीय सूत्रे व ८८ फिट् सूत्रे यांचा समावेश करुन वैदिक व्याकरणाचा अभ्यास करणाऱ्यांसाठी अधिक सुगमता आणली आहे. याशिवाय वररुचीच्या वार्तिकांचे ही यात स्वतंत्र स्थान आहे. जसे – 'अयस्मयादीनि च्छन्दसि'[२] या निपातनाने 'भसंज्ञा' व 'पदसंज्ञा' या दोन्हींचा समावेश दाखविला आहे. यालाच प्रमाण म्हणून वार्तिक आहे ते असे – ''उभयसंज्ञान्यपीति वक्तव्यमिति[३]। वा.।।'' तर 'चतुर्थ्यर्थे बहुलं छन्दसि'[४] या ठिकाणीच्या 'षष्ठी' ची व्यवस्था वार्तिककरांनीच अधिक स्पष्ट केली त्यासाठी ''षष्ठ्यर्थे चतुर्थीति वक्तव्यम्[५] वा.।'' केले. तर ''मन्त्रे श्वेतवहोक्थपुरोडाशो ण्विन्''[६] या सूत्राने सांगितलेल्या 'ण्विन्' प्रत्ययाचा अपवाद म्हणून वार्तिककारांनी 'डस्'[७] प्रत्यय सांगितला आहे. त्यामुळे 'श्वेतवा:' वगैरे शब्दसिद्ध होतात. अशी अनेक उदाहरणे देता येतील.

स्वरसिद्धीमध्येही व्याकरणशास्त्र हेच एकमेव स्वरांची उपपत्ती देण्यास समर्थ ठरते. वेदाध्ययनाचे 'स्वरज्ञान' हे अत्यंत महत्त्वाचे अंग आहे. कारण पाणिनीय शिक्षेत म्हणतात – ''सस्वरेण सुवक्त्रेण प्रयुक्तं ब्रह्म राजते''[८] किंवा ''सम्यग्वर्णप्रयोगेण ब्रह्मलोके महीयते''[९] याप्रमाणे योग्य उच्चारण, सम्यग् वर्णप्रयोग व स्वरप्रयोगाने ब्रह्मलोक प्राप्ती इ. फळे सांगतात, तशीच स्वरहीन, मिथ्याप्रयोग यांची फलेसुध्दा सांगतात. जसे –

हस्तहीनं तु योऽधीते स्वरवर्णविवर्जितम्।
ऋग्यजु:सामभिर्दग्धो वियोनिमधिगच्छति[१०]।।

---

१ पहा. सि.कौ. भाग ५ व ६, संपा. म. दा. साठे,व का. वा. अभ्यंकर, यांच्या संपादित आवृत्तीतून वरील संख्या दिली आहे.

२ पा.सू. ।१।४।२०।

३ पहा. पा.सू. १।४।२०। वरील वार्तिक

४ पा.सू. २।२।६२

५ पहा. – पा.सू.।२।२।६२। वरील वार्तिक

६ पा.सू. ३।२।७१।

७ ''श्वेतवहादीनां डस्पदस्येति वक्तव्यम्'' वा.

८ पा.शि. ५१

९ पा.शि. ३१

१० पा.शि. ५४

तसेच स्वरदोष हा व्याधिकारक होतो. तो शारीरिक कष्टास कारण होतो. 'विस्वरं व्याधिपीडितम्'[१] आणि कधी कधी तर स्वरदोषामुळे यजमानाचा ही नाश होतो "स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति।[२]". थोडक्यात, विस्वरता, दुष्टाक्षरत्व हे दोष शास्त्रास वज्ररूप प्रदान करतात. तेव्हा स्वरयुक्त, सम्यग्वर्णप्रयोग महत्त्वाचे आहेत, त्यासाठी वैदिक व्याकरणाचा अभ्यासकाने आश्रय घेतलाच पाहिजे.

उपरोक्त विवेचनावरून वेदाध्ययन करणाऱ्यासाठी आवश्यक जी तीन अंगे - १) शब्दसिद्धी २) स्वरसिद्धी ३) अर्थसिद्धी यांचे सम्यग् ज्ञान होण्यासाठी वैदिक व्याकरणाचे अत्यंत महत्त्वाचे स्थान असून खऱ्या अर्थाने ते प्रधान ठरते. आणि हे स्थान प्रधान असल्यामुळेच प्रथम स्थानी मौलिभूत आहे. शिवाय "प्रधाने च कृतो यत्न: फलवान् भवति[३]" अशी श्रुती आहेच!

### १.३ स्वरविषयक सामान्यविचार -

ऋक् प्रातिशाख्यकारांच्या मते, सामान्यपणे उदात्त, अनुदात्त व स्वरित हे तीन स्वर आहेत.[४] तर शिक्षाकारांनीही याच तीन स्वरांना मान्यता दिलेली आहे.[५] तसेच हे स्वरज्ञान अर्थज्ञानासाठी आवश्यक मानले आहे. उदात्ताचे उच्चारण तालू इ. स्थानांच्या ऊर्ध्वभागात निर्माण होणाऱ्या वर्णांच्या रूपात होते. तर अनुदात्त वर्णांचे उच्चारण याच स्थानांच्या खालील भागात उत्पन्न होणाऱ्या वर्णांच्या रूपात होते आणि स्वरित हा उदात्त व अनुदात्त यांचे संमिश्र रूप आहे. हेच मत पाणिनी[६] चे आहे व असेच तत्परवर्ती प्रकरण ग्रंथकार वैयाकरणांचे[७] ही आहे. तर "उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च त्रय: स्वरा.[८]" या ऋक्प्रातिशाख्यावरील भाष्यामध्ये उव्वटाने स्पष्ट केले आहे की, 'श्वासाच्या मुळे उच्चारण अवयवांची ऊर्ध्वगती होते, त्यास

---

१ पा.शि. ५३
२ पा.शि. ५४
३ म.भा. पस्पशा. १।१।१
४ ऋक्. प्राति. ३।१
५ पा.शि. ११
६ पहा. पा.सू.१।२।२९, ३०, ३१
७ पहा. - वृत्ती, वरदराज, भट्टोजी दीक्षित
८ ऋक्प्राति. ३।१

'उदात्त' म्हणतात', तर 'ज्यामध्ये वायुवेगामुळे वागवयवांची निम्नगती होते ते 'अनुदात्त' होय[१]. पण पाणिनीच्या 'उच्चैरुदात्त'[२] 'नीच्चैरनुदात्तः'[३] या सूत्रांवर भाष्य करताना महाभाष्यकार पतंजलीने म्हटले आहे की, येथे 'उच्च' आणि 'नीच' या शब्दांवरुन कोणत्याही स्थिरतत्त्वांचा निर्देश होत नाही.[४] अर्थात हे शब्द सापेक्ष आहेत. याशिवाय या उदात्तादिक स्वरविशेषांचे प्रतीकात्मक प्रस्तुतीकरण हस्तसंचालनानेही केले जाते, असे पारिशिक्षा[५] तसेच प्रतिज्ञासूत्र[६] यांच्या व्याख्येवरुन वाटते. यानुसार उदात्ताच्या उच्चारणावेळी उजवा हात डोक्यापर्यंत वर उचलला जातो तर अनुदात्ताच्या वेळी हृदयापर्यंत तसेच स्वरितावेळी कानापर्यंत नेला जातो. अशा प्रकारे उच्चारणावयवांची गती स्पष्ट केली आहे. याविषयी असेच संकेत पाणिनीय शिक्षेतही मिळतात.[७] तसेच तेथे 'प्रचय' या चतुर्थ स्वराविषयी देखील माहिती मिळते.

उदात्तादिक स्वरांचा संबंध संगीतातील स्वर-सप्तकाशी जोडण्यात आलेला आहे. प्रातिशाख्य व शिक्षा ग्रंथांनुसार संगीतातील स्वरसप्तकाचा या उदात्तादिक तीन स्वरांशी घनिष्ट संबंध आहे. संगीतातील 'सा' म्हणजे 'षड्ज' व 'रे' म्हणजे 'ऋषभ' यांची उत्पत्ती अनुक्रमे दीर्घ ध्वनियुक्त अनुदात्तापासून व ऱ्हस्व स्वरयुक्त अनुदात्तापासून पारिशिक्षेत सांगितली आहे.[८] तर पाणिनीय शिक्षा[९] व नारद शिक्षेत[१०] उदात्तापासून 'नि' (निषाद) व 'ग' (गांधार), अनुदात्तापासून 'रे' व 'ध' (धैवत), व स्वरितापासून 'सा', 'म' (मध्यम) व 'प' (पंचम) यांची उत्पत्ती सांगितली आहे.

---

१ पहा. - ऋक्.प्राति. ३।१ वर उव्वटभाष्य
२ पा.सू. १।२।२९
३ पा.सू. १।२।३०
४ म.भा.अ. १ पा. २ आह्नि.२
५ पारि शि. ८१
६ प्रतिज्ञा सू. १, ४-६
७ पा.शि.४८
८ पारि शि. ८३, ८६
९ पा.शि.१२
१० पहा. शिक्षा सं. पृ. ४२४ संपा. युगल किशोर पाठक

उपरोक्त विवेचनातून एक गोष्ट नक्की होते की, प्रातिशाख्य व शिक्षा-ग्रंथ यांनी उदात्तादिक स्वरांचा विचार मांडला आहे; पण मुख्यत्त्वे करुन उच्चारणासंबंधी. अर्थात शिक्षाग्रंथ उच्चारविधीच स्पष्ट करणारे आहेत.[१] तरी त्यामध्येही उदात्तादिकांविषयी वा त्यांच्या उच्चारणाविषयी ताल्वादिक स्थानविचार व हस्तसंचालन यामध्ये सापेक्षता आहे. या उदात्तादिकांच्या उपपत्तीविषयी मात्र यांनी मौन बाळगले आहे. तेव्हा शिक्षा ग्रंथ व प्रातिशाख्य यांनी स्वराच्या बाह्यांगाचा म्हणजे हस्तसंचालन, ताल्वादिकस्थाने वगैरेंचा विचार मांडला आहे. त्यांच्या उत्पत्ती विषयी काहीच उल्लेख आढळत नाही. कारण जोपर्यंत कोणता स्वर कोठे येणार हे निश्चित ठाऊक होत नाही, तोपर्यंत उच्चारण विधीचा उपयोग तो काय? म्हणून हा स्वरविषयक सामान्यविचार आहे, असे वाटते.

## १.४ स्वरसिद्धीचे स्वरुप व प्रकार -

"प्रकृतिप्रत्ययादिसम्बन्धैः उदात्तादिस्वरसिद्धता स्वरसिद्धिः।" अर्थात 'प्रकृति-प्रत्यय इ. संबंधांनी उदात्त वगैरे स्वरांची सिद्धता करणे त्यास 'स्वरसिद्धी' म्हटले आहे.

प्रस्तुत व्याख्येमध्ये स्वरसिद्धीचे स्वरुप स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. व्याख्येत 'प्रकृतिप्रत्ययादि सम्बन्धैः' मध्ये 'आदि' पद का घातले आहे, नुसते 'प्रकृति-प्रत्यय संबंध' असे म्हटले असते तर लाघवता आली असती. याचे समाधान असे की, जर 'आदि' पदाचा उपयोग केला नाही तर प्रकृति-प्रत्यय असे विभाजन ज्या ज्या शब्दांचे होते अशा केवळ व्युत्पन्न शब्दांचीच स्वरसिद्धी होईल. अव्युत्पन्न शब्दांचे प्रकृति-प्रत्यय संबंधाने स्वरसिद्ध केले जात नाही तर वेगवेगळ्या पद्धतीने जसे अक्षरांची संख्या[२], थकारान्त[३], नपुंसकलिंगी[४], शब्द वगैरे अन्य संबंधांनी दिलेली आढळते, म्हणून व्याख्येत 'आदि' पद घातल्याने व्युत्पन्न व अव्युत्पन्न अशा दोन्ही प्रकारच्या शब्दांच्या स्वरसिद्धीचा समावेश होतो, व व्याखेत येणारा अव्याप्ति-दोषाचा परिहार होतो.

---

१ पहा. - "वाच उच्चारणे विधीम्" पा.शि. २
२ त्र्यषां प्राङ् मकरात्। फि.सू. ३।२ लघावन्ते द्वयोश्च बह्वषो गुरुः। फि. सू. २।२९
३ थान्तस्य च। फि. सू. ३।१४
४ नब्विषयस्यानिसन्तस्य। फि. सू. २।३

यानंतर 'उदात्तादि' शब्द देखील का वापरला, नुसते 'स्वरसिद्धता' असे म्हटले तरी तेच झाले असते जे अभिप्रेत होते. या शंकेचे समाधान असे की, नुसतेच 'स्वर' म्हटले तर हा 'स्वर' शब्द संदिग्ध आहे. यातून योग्य अर्थाची अभिव्यक्ती होत नाही, शिवाय अतिव्याप्ति-दोष संभवतो. तो असा की 'स्वर' हा शब्द पूर्वसूरींनी 'अच्' म्हणजेच अ इ उ वगैरे साठी वापरलेला आढळतो. जसे-"अष्टौ समानाक्षराण्यादितश्चत्वारि सन्ध्यक्षराण्युत्तराणि एते स्वरा...[१]।।" किंवा पाणिनीय शिक्षेत 'स्वरा विंशतिरेकश्च'[२] असे म्हणून अ इ उ वगैरेंचाचा निर्देश आहे. त्यामुळे केवळ 'स्वर' हा शब्द अ, इ, उ वगैरेंच्याच ठिकाणी अतिव्याप्त होऊन सदोषता उत्पादक ठरेल; म्हणून 'उदात्तादि' म्हटले असल्यामुळे याचा आपोआप परिहार होतो व व्याख्या निर्दोष होते.

उपरोक्त विवेचनातून असे स्पष्ट होते की, स्वरसिद्धी म्हणजे पदावर असलेल्या उदात्तादिक स्वरांची सिद्धता करणे होय. ही सिद्धता प्रकृति-प्रत्यय वगैरे संबंधांच्या द्वारे दिली जाते. वास्तविक पाहता 'स्वरसिद्धी' या शब्दाचा प्रयोग यापूर्वी केलेला आढळत नाही, तर 'स्वरप्रक्रिया'[३], 'स्वरसंचार प्रक्रिया'[४] वगैरे शब्दप्रयोग केलेले आहेत. मग 'स्वरसिद्धी' असे म्हणण्याचे काही खास प्रयोजन आहे का, अशी शंका उत्पन्न होते. तेव्हा तिचे समाधान असे की, 'स्वरसिद्धी' हा शब्दप्रयोग 'स्वरप्रक्रिया' किंवा 'स्वरसंचार' याहून अधिक व्यापक व स्पष्ट आहे. कारण उपरोक्त शब्दांच्या अर्थाचा समावेश या एकाच शब्दात होतो. जसे 'रूपसिद्धी' देताना शब्दाची 'प्रकृती' सांगून नंतर विशेष 'प्रत्यय' नंतर होणारे आगम, आदेश वगैरे क्रमाने सांगून इष्ट रूपाची सिद्धता केली जाते. त्याच प्रमाणे येथेही पदाची मूळ प्रकृती नंतर त्याचा स्वर, प्रत्ययस्वर आगम व आदेश यामुळे स्वरात होणारे बदल वगैरे सर्व स्वरप्रक्रिया स्वरसंचार क्रमाने सांगितली जाऊन अखेरीस एखाद्या विशिष्ट स्थानी 'उदात्तादिक' स्वरांची प्रतिष्ठापना करुन सिद्धता पूर्ण होते म्हणून त्यास 'स्वरसिद्धी' असे प्रक्रियानुरूप नाव दिलेले आहे.

---

१ ऋक्. प्राति. १।११।१, २, ३, ४

२ पा.शि. श्लो. क्र. ४

३ वै. सि. कौ. भाग ६ स्वरप्रक्रिया, संपा. का. वा. अभ्यंकर.

४ अथ वैदिकवाक्येषु स्वरसंचारप्रकारः।' - भ. दी. पहा. - वै.सि.कौ. भाग ६, पृ. २८८.

मग यावर कोणी शंका घेईल की, थोडक्यात ही रूप-सिद्धीच आहे, तर असे म्हणता येणार नाही. कारण रूपसिद्धीमध्ये वर म्हटल्याप्रमाणे केवळ प्रत्यय, आगम, आदेशादिक विकारांचा विचार केला जातो. तर येथे यापुढे जाऊन त्या प्रत्यय, आदेश, आगमादिकांमुळे होणाऱ्या स्वरांचा, त्यातील बदलांचा विचार केला जातो. त्यामुळे असे जर म्हटले की, स्वरसिद्धीमध्ये शब्दाच्या व पदाच्या[१] रूपसिद्धीचा अंतर्भाव असतो तर ते अयोग्य ठरणार नाही.

थोडक्यात, उपरोक्त विवेचनावरुन स्पष्ट होते की, स्वरसिद्धीमध्ये त्या त्या शब्दांची रूपसिद्धी तर असतेच शिवाय प्रकृति-प्रत्यय वगैरे संबंधांनी उदात्त वगैरे स्वरांची व्युत्पत्ती सिद्ध केली जाते. आता 'प्रकृति-प्रत्ययादि संबंध' हा शब्दच पाणिनीय व्याकरणाचा बोधक आहे. कारण पाणिनी महर्षींनी संपूर्ण व्याकरणशास्त्र या प्रकृति-प्रत्यय संबंधाने सांगितलेले आहे. त्यामुळे हे उदात्तादिक स्वर सिद्ध करताना पाणिनीय सूत्रांचा आधार घ्यावाच लागतो. किंबहुना पूर्णपणे त्यावरच ही स्वरसिद्धी आधारलेली आहे, असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. कारण पाणिनीय कालखंडानंतर उत्तरवर्ती पाणिनीयेतर व्याकरणकारांनी या स्वरप्रक्रियेचा विचार वा या स्वरप्रक्रियेला आपापल्या व्याकरणात विशेष स्थान दिलेले नाही. अर्थात या विषयावर अधिक विचार पुढे मांडला जाईल. तेव्हा मुनित्रयांनी मांडलेला स्वरसिद्धीचा विचार सविस्तरपणे उलगडून सांगण्याचा प्रयत्न प्रस्तुत प्रबंधात केला जाणार आहे.

याशिवाय 'आदि' पदावरुन शान्तनवाचार्यांच्या फिट् सूत्रांचा देखील येथे अंतर्भाव केला पाहिजे. कारण एखाद्या शब्दाचा जेव्हा स्वर प्रकृति-प्रत्यय संबंधाने ठरविता येत नाही, तेव्हा अशा शब्दांच्या स्वरसिद्धीसाठी फिट्सूत्रांकडेच वळावे लागते. जसे 'उपसर्ग' 'निपात' यांच्या स्वरांचा विचार पाणिनीय सूत्रांनी सिद्ध करता येत नाही तेव्हा मात्र फिट् सूत्रे अत्यंत उपकारक ठरुन ''अभिउपसर्ग सोडून सर्व उपसर्ग आद्युदात्त असतात''[२], तसेच ''निपात

---

१ सुप्तिङन्तं पदम्।१।४।१४। ने उक्त पद संज्ञा येथे अभिप्रेत आहे.

२ उपसर्गाश्चाभिवर्जम्। फि.सू. ४।१३

आद्युदात्त असतात''[१] असे सांगून स्वरसिद्धी घडवून आणतात. म्हणून येथे स्वरसिद्धीसाठी पाणिनीय सूत्रांबरोबर, फिट्सूत्रेही उपयोगी ठरतात.

अव्युत्पन्न शब्दांच्या स्वरसिद्धीसाठी जसा फिट्सूत्रांचा आधार घ्यावा लागतो, तसा काही व्युत्पन्न शब्दांच्या स्वरसिद्धीसाठी 'उणादिसूत्रांची' देखील उपयोगिता नाकारता येत नाही. कारण उणादिसूत्र ही पाणिनीय व्याकरणास पुरक आहेत आणि खुद्द पाणिनी महर्षींनी उणादिसूत्रांचा वापर करण्याचा उल्लेख 'उणादयो बहुलम्'[२] असा केलेला आढळतो. उणादिसूत्रे पाणिनीय व्याकरणास पुरक तसेच स्वरसिद्धीस पोषक आहेत. यास अनेक प्रमाणे देता येतील. उदा.- ''कृवापाजिमिस्वदिसाध्यशूभ्य उण्''[३], ''धान्ये नित्''[४], ''ईषे: किच्च''[५], 'सुविदे: कत्रन्'[६] वगैरे अनेक आहेत. यातील 'उण्' प्रत्यय 'णित्' सांगितला त्यामुळे पाणिनीय सूत्रांद्वारे आद्यवृद्धी युक्त होतो[७]. तर 'नित्' प्रत्यय सांगितल्यामुळे स्वराच्या दृष्टीने तो शब्द आद्युदात्त होतो व त्यास 'ञ्नित्यादिर्नित्यम्'[८] हे पाणिनीय सूत्र उपयोगी पडते. तर 'कत्रन्' प्रत्यय 'कित्' व 'नित्' आहे. त्यातील 'कित्' सांगण्याने 'क्ङितिच'[९] या सूत्राने सांगितल्याप्रमाणे गुणनिषेध होऊन 'सुविदत्रम्' शब्द बनतो व नित्स्वराने आद्युदात्त[१०] होतो. तेव्हा या व अशा अनेक शब्दांच्या स्वरसिद्धीसाठी उणादिसूत्रांचाही आधार घ्यावा लागतो. अर्थात उणादिसूत्रांनी होणारी स्वरसिद्धी यांचा पुढे स्वतंत्र विचार केला जाणार आहे. तरी येथे स्वरसिद्धी मध्ये त्याचा समावेश होतो हे निर्दिष्ट करण्यासाठी सांगितले आहे.

अशा प्रकारे स्वरसिद्धी स्वरूप आहे, असे म्हणता येईल. आता स्वरसिद्धी प्रकारांची चर्चा करणे आवश्यक आहे. स्वरसिद्धी कोण कोणत्या बाबतीत होते व तिचे कोणते प्रकार मानले आहेत याचा विचार करु.

---

१ निपाता आद्युदात्ता:। फि.सू. ४।१२
२ पा.सू. ३।३।१
३ पं.उ.सू.क्र. १।१
४ पं.उ.सू.क्र. १।९
५ पं.उ.सू.क्र. १।१३
६ पं.उ.सू.क्र. ३।१०८
७ अचो ञ्णिति। पा.सू. ७।२।११५
८ पा.सू. ६।१।१९७
९ पा.सू. १।१।५
१० ञ्नित्यादिर्नित्यम्। पा.सू. ६।१।१९७

**स्वरसिद्धीचे प्रकार –**

प्रत्यक्ष पाणिनी महर्षींनी स्वरसिद्धीचे किंवा स्वरांचे प्रकार असे चर्चिले नाहीत. पण त्यांच्या स्वरसिद्धीच्या प्रक्रियेनुसार उत्तरकालीन प्रक्रिया ग्रंथकारांनी मात्र प्रकारांची चर्चा केली. यामध्ये अग्रभागी कोण असेल तर वैयाकरण सिद्धान्त कौमुदीकार भट्टोजी दीक्षित. किंबहुना स्वरप्रक्रिया व वैदिकी प्रक्रिया यांची स्वतंत्र रचना करून त्यावरच आधारित सूत्रांना संकलित करून त्याचे सविस्तर विवेचन करण्याचे दुर्घट कार्य त्यांनी अत्यंत समर्थपणे केलेले आहे. वै. सि. कौ.तील स्वरप्रकियेवर पुढे विवेचन केले जाणार आहेच; पण आता मात्र त्यांनी स्वरांचे सामान्यस्वर, प्रातिपदिक स्वर, धातुस्वर, प्रत्ययस्वर, समासस्वर व तिङन्तस्वर असे प्रकार कल्पिले आहेत.[१]

येथे स्वरसिद्धीचे प्रकार मांडताना भ. दीं. च्या विवेचनाचा विचार करून स्वरसिद्धीच्या अनुकूल असे १) प्रातिपदिकस्वर २) समासस्वर आणि ३) तिङन्तस्वर असे तीन प्रकार कल्पिले आहेत.त्यातील (१) **प्रातिपदिकस्वर** या प्रकारात 'व्युत्पन्न प्रातिपदिक' व 'अव्युत्पन्न प्रातिपदिक' अर्थात व्युत्पन्न नामे व अव्युत्पन्न नामे, सर्वनामे, उपसर्ग, निपात यांचा समावेश होतो, तर व्युत्पन्न प्रातिपदिकांमध्ये कृदन्त व तद्धितान्त यांचाही समावेश करता येईल. कारण कृदन्त व तद्धितान्त यांनाही प्रातिपदिकसंज्ञा विहित आहेच.[२] पण त्यातून (२) **समासस्वर** मात्र बाजूला काढणे आवश्यक आहे; कारण समासात एकत्र येणाऱ्या शब्दांची स्वत:ची आधी एक स्वरसिद्धी असते व नंतर समासानंतर स्वरात पुन्हा बदल होतो. उदा.– 'रामलक्ष्मणौ' येथे 'राम'[३] व 'लक्ष्मण'[४] ही दोन प्रातिपदिके स्वतंत्र स्वरयुक्त आहेत व द्वन्द्व समासानंतर मात्र यांचे स्वतंत्र अस्तित्व मिटून ते एकरूप होतात 'रामलक्ष्मणौ' समास 'समासस्य'[५] या सूत्राने अन्तोदात्त होतो. म्हणून जरी 'कृत्तद्धितसमासाश्च'[६] या सूत्राने कृदन्त, तद्धितान्त व समासान्त

---

१ पहा. वै.सि. कौ. भाग ६, स्वरप्रक्रिया,

२ कृत्तद्धिसमासाश्च पा.सू. १।२।४६

३ 'राम' हा शब्द 'रमु क्रीडायाम्' याहून 'घञ्' प्रत्यय होऊन सिद्ध होतो. घञ् 'ञित्' असल्याने ञ्नित्यादिर्नित्यम्।६।१।१९७ ने आद्युदात्त होतो पण 'कर्षाऽऽत्वतो घञोऽन्त उदात्त:।६।१।११९ ने' अन्तोदात्त होतो.

४ 'लक्ष्मण' शब्द 'लक्षेरट्मुट् च। पं.उ.सू.३।७। ने 'न' प्रत्ययान्त होतो, आद्युदात्तश्च।३।१।३। ने अन्तोदात्त सिद्ध होतो.

५ पा.सू. ६।१।२२३

६ पा.सू. १।२।४६

यांना एकत्रितपणे प्रातिपदिक संज्ञा सांगितली असली, तरी 'समासान्ताचा' प्रातिपदिकस्वरात समावेश करणे योग्य नसून त्यांचे स्वतंत्र अस्तित्व दाखविणे गरजेचे वाटते. म्हणून स्वरसिद्धीचा दुसरा प्रकार 'समासस्वर' स्वीकारणे योग्य आहे, असे वाटते.

(३) **तिङन्तस्वर** – "तिप्तस्झि."[१] या सूत्राने विहित 'तिङ्' प्रत्यय ज्याच्या अंती आहे, ते 'तिङन्त' होय. त्याचा स्वरसिद्ध करताना धातू, विकरण व प्रत्यय, आगम या चारांपैकी कोणाच्यातरी ठिकाणी स्वर सिद्ध होईल, काही विशिष्ट भाषिक रचना असताना अन्यथा सर्वत्र तिङन्त सर्वानुदात्तच आढळतात.[२] पण जेव्हा ती उदात्तादिक स्वरयुक्त आढळतात तेव्हा नक्की कोठे तो उदात्तादिक स्वर येणार धातू, विकरण, प्रत्यय, आगम या चारांपैकी नक्की कोणाच्या ठिकाणी, हे सिद्ध करण्यासाठी तिङन्त स्वराचा स्वतंत्र विचार या 'तिङन्तस्वर' या प्रकारात करता येईल. यावर पुढे विवेचन केले जाईल. येथे केवळ थोडक्यात परिचय देण्याचा प्रयत्न केला आहे.

अशा प्रकारे प्रातिपदिकस्वर, समासस्वर व तिङन्तस्वर तीन प्रकारात सर्वच प्रकारांचा समावेश करता येतो. तो सर्व विस्तार पुढीलप्रमाणे एका दृष्टिक्षेपात.




आतापर्यंत स्वरसिद्धी म्हणजे काय, स्वरसिद्धीचे स्वरूप व तिचे प्रकार यांची चर्चा केली. या अंतर्गतच स्वरूप वर्णन करताना स्वरसिद्धी–साधक साधनांचा थोडक्यात आढावा

---

१ पा.सू. ३।४।७८

२ 'तिङतिङः।८।१।२८। ने सर्वानुदात्त

घेण्यात आला होता. यानंतर मात्र त्याच विषयाचा सविस्तरपणे परामर्श घेणे आवश्यक आहे. जसे अष्टाध्यायीतील महर्षींनी केलेले स्वरविवेचन, वार्तिकांनी होणारी स्वरसिद्धी, महाभाष्याचे स्थान, तसेच पाणिनीयेतर व्याकरणातील स्वरविवेचन वगैरे विषयांचा विचार पुढे केला जाणार आहे. ज्यातून स्वरसिद्धी विषयीची अधिक सुस्पष्टता वृद्धिंगत होईल.

**१.५ अष्टाध्यायी व स्वरविवेचन –**

भारतीय परंपरेनुसार पाणिनीय व्याकरण एक आदर्श व्याकरण आहे आणि यामुळेच या व्याकरणास 'वेदांग' ही पदवी दिली गेली. वेदमंत्रांचा नीटपणे अर्थ कळावा, त्यातील शब्दप्रयोग पाहून प्रमादाने तो चुकीचा उच्चारु नये अथवा त्यात बदल करून अन्य शब्दप्रयोग रूढ करू नये, जेणे करून वेदांचे पारंपारिक शुद्ध स्वरूपातच जतन व्हावे; म्हणून षड्वेदांगामध्ये प्राधान्याने व्याकरणाचे पठण केले जाते. आणि म्हणूनच भाष्यकारांनी ''रक्षोहागमलघ्वसन्देहा:''[१] अशी व्याकरणशास्त्राची प्रयोजने सांगताना 'रक्षा' हे पहिले प्रयोजन अग्रक्रमाने सांगितले आहे. त्यामुळे पुढे मुलं अधिकाधिक शिको वा न शिको पण त्यांनी व्याकरणाचे पठण केले पाहिजे अशी जनमानसिकता सांगणारी सुभाषिते रूढ झाली जसे –

यद्यपि बहु नाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणम्।
स्वजन:श्वजनो मा भूत् सकलं शकलं सकृत् शकृत्।।

मूळ लाहोरचे रहिवासी मानलेले पाणिनी जागतिक वैयाकरणकुळाचे मुकुटमणीच होय. पाणिनींनी रचलेल्या व्याकरणग्रंथालाच 'अष्टाध्यायी' हे नाव पुरातन परंपरेचे द्योतक आहे. कारण पूर्वीच्या काळी ग्रंथातील अध्याय, मंडल, काण्ड वगैरेंच्या संख्येवरून अनेक ग्रंथांची नावे रूढ झालेली आढळतात. जसे – ऋग्वेदाचा १० मंडले असल्यामुळे निरुक्तात 'दशतयी'[२], महाभाष्यात 'दाशतय'[३], शाबरभाष्यात 'दाशतयी'[४] इ. नामोल्लेख आढळतात. तसेच पूर्वमीमांसा शास्त्रास 'द्वादशलक्षणी', महाभारतास 'शतसाहस्त्री' भर्तृहरीची 'शतकत्रयी'

---

१ म.भा. पस्पशा. १।१।१
२ निरु. ७.८, 'न तु ऋक् संस्तविकी दशतुयीषु विद्यते।'
३ 'दृष्टो दाशतयेऽपि हि'। म.भा.६।४।१४९
४ ''ता: सर्वा दाशतयीभ्य आनीय::'' शा.भा.१०।६।७३

इ. प्रमाणे आठ अध्यायांनी युक्त ती 'अष्टाध्यायी' असे नाव योग्य वाटते. या शिवाय पाणिनीय व्याकरणाचा 'अष्टाध्यायी' म्हणून उल्लेख महाभाष्यकारांनीही केलेला आढळतो. 'शिष्टज्ञानार्थम् अष्टाध्यायी' अर्थात शिष्ट-अशिष्टतेच्या ज्ञानासाठी 'अष्टाध्यायी'[१] उपयोगी ठरेल असा अभिप्राय आहे.

'अष्टाध्यायी' हा शब्द "अष्टानाम् अध्यायानां समाहार:, अष्टाध्यायम्"[२] असा 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च'[३] या सूत्राने समाहार द्विगू समास होऊन पुढे 'द्विगो:'[४] या सूत्राने स्त्रीत्ववाचक 'ङीप्' प्रत्यय होऊन 'अष्टाध्यायी' असा शब्द सिद्ध होतो. पण आता हा शब्द योगरूढ झाला आहे. त्यामुळे इतर कोणताही ग्रंथ अष्टाध्यायात्मक असला तरी त्यास 'अष्टाध्यायी' म्हटले जाणार नाही. कारण, 'अष्टाध्यायी' म्हणजे पाणिनीय व्याकरणच, आणि एवढेच. तेव्हा "द्वितीयगामी नहि शब्द एष न:"[५] या कालिदासाच्या उक्तीप्रमाणे पाणिनीयेतर ग्रंथास अद्वितीयगामी बनला आहे.

अष्टाध्यायीतील पाणिनीय सूत्रे ही लौकिक व वैदिक अशा द्विविध शब्दांचे व्याकरण सांगणारी आहेत. अर्थात म्हणून महाभाष्यकारांनी तसे स्पष्ट शब्दात सांगितले आहे. तरी महाभाष्यात[६] पठित सूत्रांनुसार एकूण सूत्रसंख्या ३९८२, तसेच श्रीगोपालदत्त पाण्डेय[७] यांनी संपादित सूत्रपाठात देखील हीच संख्या आहे. यापैकी ३३९३ सूत्रांनी लौकिक व्याकरणाचे नियम सूत्रबद्ध केले आहेत तर ५८९ मध्ये वैदिक व्याकरण सांगण्यात आलेले. त्यात सुद्‌धा भ. दी. नी संकलित केलेल्या वैदिकी प्रक्रियेत २६१ सूत्रे व स्वर प्रक्रियेत ३२८ सूत्रे पठित आहेत[८]. या विषयाचा पूर्वी परामर्श घेण्यात आलेला होता, तरी येथे स्वरसिद्धीच्या दृष्टीने अष्टाध्यायीतील स्थान स्पष्ट करताना हा विषय पुन्हा चर्चिला जाणे आवश्यक वाटते. त्यामुळे

---

१ म.भा.६।३।१०९

२ येथे 'द्विगुरेकवचनम्।२।४।१' ने एकवचन व 'स नपुंसकम्।२।४।१७' ने नपुंसकलिंगी झाला आहे.

३ पा.सू. २।१।५१

४ पा.सू. ४।१।२१

५ रघु० ३।४९

६ पहा.-'महाभाष्य' मराठी भाषांतरासहित, संपा. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्युकेशन सोसा. पुणे, इ.स.१९५१

७ 'अष्टाध्यायी' संपा. गोपालपाण्डेय, प्रका. चौखंबा सुरभारती प्रकाशन, इ.स. २००४.

८ वै.सि.कौ. भ.दी., संपा. म.दा.साठे, भाग ५ वैदिकी प्रक्रिया, भाग ६ स्वरप्रक्रिया

जरी अधिकांश भाग लौकिक व्याकरणाने व्यापलेला असला, तरी साधारणपणे ६००[१] सूत्रांची वैदिक व्याकरणातील व्याप्ती ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. किंबहुना वैदिक व्याकरणाचे विवेचन ही पाणिनीय व्याकरणाची अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण बाब आहे. कारण पुढे उत्तरकालीन वैयाकरणांनी वैदिक व्याकरणाच्या क्लिष्टतेमुळे या अत्यंत महत्त्वाच्या भागाकडे दुर्लक्ष केले. किंबहुना भ. दी. नंतर प्रक्रियाग्रंथकारांनी 'वैदिकी प्रक्रिया' व 'स्वर प्रक्रिया' ही दोन व्याकरणाची महत्त्वाची अंगे त्यांना अध्ययन-अध्यापनातून सीमापार केले असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. या दोन प्रक्रियेंच्या अध्ययनाविना अष्टाध्यायीचे व संपूर्ण व्याकरणाचे अध्ययन खऱ्या अर्थाने पूर्ण होऊच शकत नाही; कारण सुरवातीसच म्हटले आहे की, शब्दानुशासन हे लौकिक व वैदिक द्विविध शब्दांचे आहे. शिवाय प्रस्तुत प्रबंधामुळे दुर्लक्ष झालेल्या या महत्त्वाच्या विषयाकडे अभ्यासकांचे लक्ष वेधले जाईल.

पाणिनींनी अष्टाध्यायीची रचना करताना पूर्ववर्ती वैयाकरणांच्या मतांचा आधार घेतलेला आहे, हे अगदी स्पष्टपणे त्यांनी सूत्रांद्वारेच स्पष्ट केले आहे. पाणिनींनी पूर्ववर्ती १० वैयाकरणांची मते नामनिर्देशासह उद्धृत केलेली आहेत[२]. तेव्हा वैदिक व्याकरणाची व स्वरप्रक्रियेची रचना हे अष्टाध्यायीचे वैशिष्ट्य ठरते. तेव्हा तेथे ही त्यांनी पूर्ववर्ती वैयाकरणांनी प्रातिशाख्यकारांनी दिलेल्या संज्ञा आपल्या व्याकरणात पुढे तशाच वापरलेल्या आहेत. जसे - उदात्त, अनुदात्त, स्वरित, एकश्रुती ही स्वरांची नावे तशीच घेतली आहेत[३]. पण पाणिनींचे वैशिष्ट्य हे की, त्यांनी नुसते नाम निर्देश केले नाहीत, तर त्यांची व्याख्या केली जी प्रातिशाख्यात आढळत नाही. जसे - 'उच्चैरुदात्त'[४] 'नीचैरनुदात्त:'[५] 'समाहार: स्वरित:'[६] इत्यादी.

---

१ इतरही काही सूत्रे आहेत, ज्यांचा भ.दींनी आपल्या प्रक्रिया ग्रंथात समावेश केलेला नाही म्हणून ही साधारण संख्या ६०० दिली आहे. उदा. - आमन्त्रितं पूर्वविद्य०।८।१।७२, नामन्त्रिते०।७।१।७३, चिदिती०८।२।१०१, क्षिमाशी: प्रैषेषु०८।२।१०, तस्यादित उदा०।१।२।३२ वगैरे सूत्रे वै.सि.कौ. मध्ये आढळत नाहीत; पण श्रीनिवास दीक्षित रचित 'स्वरसिद्धान्तचन्द्रिका' ग्रंथात मात्र आढळतात - पहा अनुक्रमे पृ. ३९२, ३९३, ४५४, ४५०, ४ वगैरे.

२ (१) शाकल्य - पा.सू.१।१।१६, ६।१।१२७, ८।३।१९, ८।४।५१ (२) गालव - पा.सू. ६।३।६१, ७।१।७४, ७।३।९९, ८।४।६७ (३) शाकटायन - पा.सू. ३।४।१११, ८।३।१८, ८।४।५० (४) गार्ग्य - पा.सू. ७।३।९९, ८।३।२०, ८।४।६७ (५) काश्यप - पा.सू. १।२।२५, ८।४।६७ (६) आपिशलि - ६।१।९२ (७) भारद्वाज - पा.सू. ७।२।६३ (८) चाक्रवर्मण - पा.सू. ६।१।१३० (९) स्फोटायन - ६।१।१२३ (१०) सेनक - ५।४।११२ हे ते पूर्ववर्ती आचार्य होत.

३ पहा. - उदात्तश्चानुदात्तश्च स्वरितश्च त्रय: स्वरा:। ऋक्. प्राति. ३।१।।

४ पा.सू. १।२।२९

५ पा.सू. १।२।३०

६ पा.सू. १।२।३१

प्रत्यक्ष स्वरविवेचन अष्टाध्यायीमध्ये पाणिनी महर्षींनी अनुदात्तपदमेकवर्जम्।६।१।१५८ पासून ते परादिश्छन्दसि बहुलम्।६।२।१९९ या २६४ सूत्रांमध्ये व पुढे आठव्या अध्यायातील 'तिङो गोत्रादीनि कुत्सनाभीक्ष्णयो:'।८।१।२७ पासून ते 'तिङि।८।१।७१' या सूत्रापर्यंत एकूण ४४ सूत्रांनी अशा प्रकारे सहाव्या अध्यायात व आठव्या अध्यायात एकत्रित ३०८ सूत्रांनी स्वर विवेचन केले आहे. तर याशिवाय इतर २० सूत्रें, जी भ. दी. नी आपल्या वै.सि.कौ. त साधारणप्रकरण वगैरे प्रकरणात एकत्रित केली आहेत, स्वरविषयक 'विधिसूत्रे' आहेत असे म्हणता येईल. पण याशिवाय अष्टाध्यायीत अजूनही काही सूत्रे वेगवेगळ्या अध्यायांमध्ये विखुरलेली आहेत, ज्यांचा समावेश 'स्वरविषयक सूत्रांमध्ये' होऊ शकतो त्या सूत्रांवर थोडा प्रकाशझोत टाकण्याचा प्रयत्न करणे गरजेचे वाटते. कारण वर उल्लेखित सूत्रांमध्ये भ. दी. नी अत्यंत विद्वत्तापूर्ण विवेचन केलेले आहेच, पण या दुर्लक्षित पण स्वरविषयक महत्त्वाची माहिती सांगणाऱ्या सूत्रांचे विवेचन स्वरांच्या दृष्टीने करणे आवश्यक आहे व त्याप्रमाणे या प्रबंधात प्रयत्न करणार आहे.

पहिल्या अध्यायात प्रथमत: उदात्त, अनुदात्त, स्वरित यांच्या संज्ञा स्पष्ट करणारी 'उच्चैरुदात्त:'[१], 'नीचैरनुदात्त:'[२], 'समाहार: स्वरित'[३] अशी ३ संज्ञासूत्रे आलेली आहेत. तर 'तस्यादित उदात्तमर्धऱ्हस्वम्'[४] या सूत्राने स्वरितातील अर्धऱ्हस्व भाग उदात्त असतो, असे सांगितले. येथील उदात्तादिक संज्ञा हस्तचालनविषयक आहेत की उच्चारणविषयक या विषयी संदिग्धता आहे, हे पूर्वीच स्पष्ट केले आहे[५]. यानंतर यापुढे 'एकश्रुती दूरात्संबुद्धौ'[६] या सूत्रापासून 'स्वरितात्संहितायामनुदात्तानाम्'[७] या सूत्रापर्यंत 'एकश्रुती' ची विधिसूत्रे आहे; ज्यांचे संकलन भ. दी. नी केलेले आहे[८].

---

१ पा.सू. १।२।२९
२ पा.सू. १।२।३०
३ पा.सू. १।२।३१
४ पा.सू. १।२।३२
५ पहा.- १.३ स्वरविषयक सामान्यविचार
६ पा.सू. १।२।३३
७ पा.सू. १।२।३९
८ पहा. - वै.सि.कौ. भ.दी. भाग ६, स्वरप्रक्रिया

स्वराच्या दृष्टीने महत्त्वाचे पुढे सूत्र आहे ते म्हणजे 'स्वरितेनाधिकारः'[१] हे परिभाषासूत्र आहे. याचे ग्रहण भ. दी. नी 'संज्ञा व परिभाषा' या प्रकरणात केले आहेच[२]. तरी स्वराच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण सूत्र आहे; कारण या सूत्रावरुन स्पष्ट होते की, आज विद्यमान असलेली अष्टाधायी ही पूर्वी अध्ययनाध्यपन-काळी सस्वर होती, जी पुढे स्वररहित झाली. त्यामुळे आज किमान अधिकारसूत्रे व अनुवृत्त होणाऱ्या पदांचा स्वर तरी या सूत्राच्या आधारे स्पष्ट करता येतो.

'अनुदात्तङित आत्मनेपदम्'[३] 'स्वरितञित कर्त्रभिप्राये क्रियाफले'[४] आणि 'शेषात्कर्तरि परस्मैपद'[५] ही तीन सूत्रेही अतिशय महत्त्वाची आहेत. या तीन सूत्रांनी धातुपाठातील धातूंच्या स्वराविषयी माहिती दिलेली आहे. त्यानुसार जे धातू अनुदात्त स्वरेत् आहेत ते आत्मनेपदी आहेत, तर स्वरितेत् धातू उभयपदी व 'शेष' म्हटल्याने अनुदात्त व स्वरित सोडून 'उदात्तेत्' परस्मैपदी होतात. तसेच हा स्वर निर्देश हलन्त धातूंसाठी आहे. उदा. 'एध वृद्धौ' हा धातू 'अनुदात्तेत्' आहे म्हणूनच 'आत्मनेपदी' चालतो तर तनादिगणपठित 'तनु विस्तारे' 'षणु दाने' 'क्षणु हिंसायाम्' वगैरे धातू 'स्वरितेत्' आहेत म्हणून उभयपदी रूपे होतात. परस्मैपदी धातूंसाठी वापरलेल्या 'उदात्तेत्' उदा. - ''व्रज गतौ, कटे वर्षावरणयोः'' इ. याशिवाय ही बाब धातूच्या परस्मैपद-आत्मनेपद याची बोधक आहे. पण धातूच्या इडागमासाठी धातूचा स्वर ओळखणे आवश्यक आहे; कारण उदात्त धातूहूनच आर्धधातुकात वलादिक प्रत्ययास इडागम सांगितला आहे. त्यामुळे 'आर्धधातुकस्येड्वलादेः'[६] हे सूत्र धातुपाठातील धातूंच्या 'उदात्तत्वाचे' प्रतिनिधी आहे. तर 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्'[७] हे अनुदात्त धातूंचे. तेव्हा ही सूत्रे स्वरविषयक अत्यंत महत्त्वाची असून आज वर्तमान धातुपाठास पुन्हा एकदा सस्वर करण्यास समर्थ आहेत. आणि म्हणूनच प्रस्तुत प्रबंधातील धातूंचा 'सस्वर धातुपाठ'

---

१ पा.सू. १।३।११
२ पहा. - वै.सि.कौ. भ.दी. भाग १, संज्ञा परिभाषा
३ पा.सू. १।३।१२
४ पा.सू. १।३।७२
५ पा.सू. १।३।७८
६ पा.सू. ७।२।३५
७ पा.सू. ७।२।१०

परिशिष्टात दिला जाईल,[१] ज्यामुळे पाणिनीय परंपरा पुन्हा पूर्ववत् होण्यास व नवीन अभ्यासकांना सस्वर धातू ओळखण्यास मदत होईल. व्याकरण कठीण वाटणाऱ्यांना ते सुगम व सुलभ होईल.

तेव्हा प्रथम अध्यायात साधारणपणे स्वरविषयक एकूण १६ सूत्रांचा समावेश आहे, ज्यातील 'एकश्रुति दूरात्संबुद्धौ' इ. ८ सूत्रांनाच स्वरप्रक्रियेत भ. दी. नी स्थान दिले आहे.

द्वितीय अध्यायात स्वरविषयक तीनच (३) सूत्रे सांगण्यात आलेली आहेत – ती 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे'[२], 'इदमोन्वादेशेशनुदात्तस्तृतीयादौ'[३] आणि 'एतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ'[४] होय. यापैकी 'सुबामन्त्रिते...' इ. सूत्राने, 'आमंत्रित' म्हणजे संबोधनान्त पद पुढे असताना सुबन्त पद स्वराचे बाबतीत 'परांगवत्' म्हणजे पुढे असलेल्या संबोधनान्त पदाप्रमाणे त्याचे अंगभूत होते, असे सांगितले आहे, यावर सविस्तर चर्चा वै.सि.कौ.त आढळते.[५] पण पुढील दोन सूत्रांचा स्वरप्रक्रियेत समावेश नाही. पण 'स्वरसिद्धान्तचन्द्रिका' या ग्रंथात आहे.[६] त्यापैकी 'इदमोन्वादेशे.' इ. सूत्राने अन्वादेश[७] असल्यास 'इदम्' शब्दाला तृतीयादी विभक्ति-प्रत्यय पुढे असताना 'अश्' असा आदेश व तो ही अनुदात्त सांगितला आहे. येथे 'अश्' असा शित् आदेश असल्यामुळे सर्वादेश होतो[८], पण तो सर्वादेश अनुदात्त सांगितला आहे. येथे 'अनुदात्त' हे 'अश्' चे विशेषण आहे. त्यामुळे अन्वादेशातील 'इदम्' चे तृतीयादी विभक्ति-प्रत्यययुक्त रूप सर्वानुदात्त आढळते. उदा. "युञ्जन्त्यस्यकाम्याहरी."[९], "न विंन्धे अस्य सुष्टुतिम्."[१०], किंवा "एवाह्यस्य सूनृता."[११], किंवा "एवाह्यस्यकाम्या."[१२], इ. ठिकाणी

---

१ पहा. – परिशिष्ट क्र.३

२ पा.सू. २।१।२

३ पा.सू. २।४।३२

४ पा.सू. २।४।३३

५ पहा. – वै.सि.कौ. भ.दी., संपा. का.पा.अभ्यंकर, भाग ६, पृ.क्र.९, स्वरप्रक्रिया, इ.स.१९७२.

६ पहा. – स्वरसिद्धन्तचन्द्रिका, प्रका. अन्नमलाई विद्यापीठ, पृ.क्र. ३८०, ३८१, टीकाकार श्रीनिवास दीक्षित.

७ "एखादे कार्य करण्यासाठी ज्याला सांगितले जाते, त्यालाच फिरुन दुसरे कार्य सांगितले जाते. त्यास 'अन्वादेश' म्हणतात." उदा.– 'अयं संगीतकलायां निपुण, अतो अस्य प्रथमः क्रमांकः।

८ अनेकाल्शित् सर्वस्य।१।१।५५ ने सर्वादेश.

९ ऋ.सं. १।६।२

१० ऋ.सं. १।७।७

११ ऋ.सं. १।८।८

१२ ऋ.सं. १।८।१०

'इदम्' चे 'अस्य' हे अन्वादेशाचे सर्वानुदात्त रूप आढळते. या सर्वानुदात्त रूपाची सिद्धी प्रस्तुत 'इदामोन्वादेशे'[१] या सूत्राविना असंभव आहे.

यापुढील ''एतदस्त्रतसोस्त्रतसौ चानुदात्तौ''[२] या सूत्रातील 'च' काराने मागील सूत्रांतील 'अन्वादेशे' पदाची अनुवृत्ती स्वीकारली आहे. या सूत्राने 'एतद्' सर्वनामाला 'अन्वादेश' असताना 'त्रल्'[३] व 'तसिल्'[४] हे प्रत्यय पुढे असताना 'अश्' असा अनुदात्त आदेश व 'त्र' व 'तस्' दोन्ही प्रत्यय देखील अनुदात्त होतात, असे विधान केले आहे. वास्तविक पाहता मागील सूत्रातून सर्वानुदात्त अशा 'अश्' ची अनुवृत्ती येत असतानाही प्रत्यय पुन्हा 'अनुदात्त' सांगितले; कारण 'त्रल्' व 'तसिल्' लित् स्वराने उपान्त्य अक्षर उदात्त करतील[५] व स्वत: 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[६] या परिभाषेने अनुदात्त होतील; तर 'लिति' हे सूत्राचे कार्य होऊच नये म्हणून प्रत्ययांना अनुदात्तत्व सांगितले आहे. त्यामुळे 'अत्र' व 'अत:' ही सर्वानुदात्त पदे सिद्ध होतात. पण अन्वादेश नसताना आद्युदात्त होते. उदा. ''अर्त:परिज्मन्नागहि''[७].

याशिवाय 'द्वितीयाटौस्स्वेन'[८] या सूत्रातही मागील सूत्रातून अन्वादेशे' व 'अनुदात्त' यांची अनुवृत्ती येऊन 'इदम्' व 'एतद्' सर्वनामाचा अन्वादेश असताना द्वितीया, 'टा' 'ओ:' प्रत्यय पुढे असताना 'एन' असा अनुदात्त आदेश होतो. यानुसार 'एनम्, एनेन, एनयो:' अशी सर्वानुदात्त रूपे होतात. उदा. ''एमेंनंसृजतासुते०''[९]. येथे 'एनम्' सर्वानुदात्त आहे.

तिसऱ्या अध्यायात प्रत्ययाचा सामान्यस्वर आद्युदात्त[१०] असा नियम सांगून सुप् व पित् प्रत्यय अनुदात्त[११] असल्याचे विधान केले आहे. त्यानंतर स्वरदृष्ट्या 'मन्त्रे

---

१ पा.सू. २।४।३२
२ पा.सू. २।४।३३
३ सप्तम्यास्त्रल्। पा.सू. ५।२।१०
४ पञ्चम्यास्तसिल्। पा.सू. ५।२।७
५ लिति परे प्रत्ययात्पूर्वमुदात्तम् - भ.दी. पा.सू. ६।१।१९३
६ पा.सू. ६।१।१५८
७ ऋ.सं. १।६।९
८ पा.सू. २।४।३४
९ ऋ.सं. १।९।०२
१० आद्युदात्तश्च।पा.सू.३।१।३
११ अनुदात्तौ सुप्पितौ।३।१।४

वृषेषपचमनविद्भूवीरा उदात्त[१].' या सूत्रापासून 'कृत्रः श च'[२] या सूत्रापर्यंत ५ सूत्रात 'उदात्त' पदाची अनुवृत्ती आहे, ही अनुवृत्ती वासुदेवशास्त्री अभ्यंकर देखील मान्य करतात[३]. तसेच श्रीगोपालदत्त पाण्डेय देखीलही 'उदात्त' पद अनुवृत्त होत असल्याचे दाखवतात[४]. या पाच सूत्रात 'स्त्रियां क्तिन्'[५] प्रत्ययाचा अधिकार चालू आहे व तो नित् असल्यामुळे शब्द आद्युदात्त होतो[६]. पण तो तसा होऊ नये व प्रत्ययच उदात्त व्हावा म्हणून येथे स्वतंत्रपणे 'उदात्त' असे पद घालून पुढे अनुवृत्त केले आहे. यानुसार √वृष धातूहून 'क्तिन्' प्रत्ययाला वृष्टि, इष्टि इ. ऊति, जूति वगैरे, अन्तोदात्त रूपे मंत्रात होतात. उदा. ''सुरूपकृत्नुमूतये॰''[७] किंवा ''वर्षिष्ठम् ऊतये भर.''[८] तसेच ''रातिभिःप्रत्यायंसिन्धुं॰''[९] इ. तर 'व्रजयजोभावे क्यप्'[१०] या व 'संज्ञायां समज॰'[११] या दोन सूत्रांनी 'क्यप्' प्रत्यय सांगून तोही उदात्त आहे. तेव्हा व्रज्या, इज्या, समज्या, निषद्या अशी अन्तोदात्त रूपे होतील; जी 'क्यप्' च्या पित्त्यामुळे अनुदात्त होणार होती[१२]; पण त्याचाच बाध करण्यासाठी उदात्त सांगितला आहे. √कृ धातूची 'क्रिया' व 'कृत्या' अशी अन्तोदात्त रूपे होतील[१३].

तिसऱ्याच अध्यायातील 'यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च'[१४] हे स्वरदृष्ट्या अतिशय महत्त्वाचे सूत्र आहे. या सूत्राने यासुडागम उदात्त सांगितला आहे. त्यामुळे तिङन्तावर निघातस्वर नसताना तिङन्तांवर हा आगमस्वर राहतो. उदा. ''विद्यामसुमतीनाम्''[१५],

---

१ पा.सू. ३।३।९६
२ पा.सू. ३।३।१००
३ पहा. – म.भा. मराठी भाषांतर, वासुदेव शास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्युकेशन सोसा. पुणे, पृ.क्र.३१३, भाग ३.
४ पहा. – 'अष्टाध्यायी' सूत्रपाठ, प्रका. चौखम्बा सुरभारती प्रकाशन, वाराणसी, पृ.क्र.३१.
५ पा.सू. ३।३।९४
६ ञ्नित्यादिर्नित्यम् । पा.सू. ६।१।१९७
७ ऋ.सं.।१।४।१
८ ऋ.सं.।१।८।१
९ ऋ.सं.।१।११।६
१० पा.सू. ३।३।९८
११ पा.सू. ३।३।९९
१२ अनुदात्तौ सुप्पितौ । पा.सू. ३।१।४
१३ कृञः श च । पा.सू. ३।३।१०० ने 'श' व 'क्यप्' प्रत्यय होऊन 'क्रिया' व 'कृत्या' रूपे.
१४ पा.सू. ३।४।१०३
१५ ऋ.सं. १।४।३

''स्यामेदिन्द्रस्य शर्मणि''[१] या उदाहरणात 'विद्याम' व 'स्याम' येथे यासुडागम आहे व तो उदात्त आहे. हा यासुडागम प्रत्ययस्वरापेक्षा बलवान ठरतो[२]. पण जेव्हा 'अतो येय:'[३] या सूत्राने अजन्त अंगापुढील यासुडाला 'इयादेश' होतो तो स्थानिवद् भावाने उदात्तच होतो; पण धातू हा अदुपदेश होत असल्यामुळे 'इत्' वगैरे प्रत्यय अनुदात्त होतात[४] व धातुस्वर शेष राहतो. यावर अधिक विवेचन पुढे उदात्तकांडात केले जाईल[५]. तथापि अजन्त अंगापुढे नसता मात्र आगमस्वर उदात्त कायम राहतो. त्यामुळे स्वरप्रक्रियेत हे एक महत्त्वाचे सूत्र ठरते. शिवाय 'आगमा अनुदात्ता भवन्ति'[६] याचे ज्ञापक म्हणूनही हेच सूत्र दिले जाते. याच सूत्राने प्रथमत: आगमाचे उदात्त विधान केले आहे. पुढे नंतर 'लुङलङलृङक्ष्वडुदात्त'[७] ने देखील अडागम व उदात्ताचे विधान केले आहे. थोडक्यात, आगमस्वराच्या दृष्टीने हे महत्त्वाचे सूत्र आहे, हे मात्र निश्चित.

चतुर्थ अध्यायायातील 'वृषाकप्यग्निकुसितकुसिदानामुदात्त:'[८] या सूत्राने 'वृषाकपि' वगैरे शब्दांहून 'त्याची स्त्री' या अर्थी ङीप् प्रत्यय सांगितला व शेवटच्या वर्णाला उदात्त ऐकार आदेश सांगितला आहे. त्यामुळे 'वृषाकपे: स्त्री', 'वृषाकपायी' रूप होऊन येथे 'पा' उदात्त होतो व 'ङीप्' प्रत्यय पित्त्वामुळे अनुदात्त[९] राहून पुढे अनुदात्ताचा स्वरित होतो[१०]. तर पुढे 'मनोरौ वा'[११] या सूत्राने 'मनु' शब्दाहून 'तस्य स्त्री' या अर्थी 'ङीप्' प्रत्यय सांगून अन्त्यवर्णाला उदात्त ऐ व औ-कार विकल्पाने सांगितले आहेत. उदा. मनावी किंवा मनायी रूपे होतील.

---

१ ऋ.सं.१।४।६
२ 'सतिशिष्ट स्वरो बलीयान्' अशी परिभाषा आहे. त्यामुळे प्रत्ययानंतर होणार आगम उदात्त असल्यामुळे तो बलवान ठरतो.
३ पा.सू. ७।२।८०
४ पहा. - तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्ल.।६।१।१८६
५ पहा. - उदात्तकांड पृ.क्र. ९८, १.२
६ पहा. - 'पारिभाषिक', प्रका. वैदिक पुस्तकालय अजमेर, पृ.क्र.११२
७ पा.सू. ।६।४।७१
८ पा.सू. ४।१।३७
९ अनुदात्तौ सुप्पितौ । पा.सू. ३।१।४
१० उदात्तादनुदात्तस्य स्वरित: ।८।४।६६
११ पा.सू.४।१।३८

याशिवाय 'वर्णादनुदात्ता०'[१], 'अन्यतो ङीष्'[२], 'बहुव्रीहेश्चान्तोदात्तात्'[३], 'अनुदात्तादेरञ्'[४], 'उदीच्यग्रामाच्च'[५], 'अनुदात्तेश्च'[६] या सूत्रांनी प्रत्यक्ष उदात्तादिक स्वराचे विधान केलेले नाही; पण स्वरयुक्त शब्दांना लागणाऱ्या प्रत्ययांची चर्चा केली आहे. जसे - अनुदात्त स्वराला वर्णवाचक शब्दातून ङीप् प्रत्यय वगैरे[७].

पाचव्या अध्यायात मुख्यत: तद्धित प्रत्यय आहेत. तस्मै हितम्[८], तेन क्रीतम्[९], तदस्य सञ्जातम्[१०], कालात्[११] इ. अनेक अधिकारांच्या अंतर्गत अनेक प्रत्यय विहित आहेत. त्यामुळे येथे स्वरविषयक विवेचन नाही.

सहाव्या अध्यायात द्वित्व[१२], संप्रसारण[१३], आत्व[१४], आगम[१५], आदेश[१६] यांचे सुरूवातीस विवेचन करून संधी प्रकरणानंतर[१७] 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[१८] पासून 'परादिश्छन्दसि बहुलम्'[१९] पर्यंत स्वरविवेचन केले आहे, जे भ. दीं. नी आपल्या स्वरप्रक्रियेत समाविष्ट केले आहे. मात्र सहाव्या अध्यायातील चतुर्थ पादातील 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त'[२०] व 'आडजादीनाम्'[२१] या दोन अत्यंत महत्त्वाच्या सूत्रांचा स्वरप्रक्रियेत तिङन्त प्रकरणातही उल्लेख केलेला नाही.

---

१ पा.सू. ४।१।३९
२ पा.सू. ४।१।४०
३ पा.सू. ४।१।५२
४ पा.सू. ४।२।४४
५ पा.सू. ४।२।१०९
६ पा.सू. ४।३।१४०
७ पहा. - वर्णादनुदात्त. पा.सू. ४।१।३९
८ पा.सू. ५।१।५
९ पा.सू. ५।१।३७
१० पा.सू. ५।२।३६
११ पा.सू. ५।१।७८
१२ द्वित्व प्रकरण - एकाचो द्वे.६।१।१ ते दाश्वान् साह्वान्.।६।१।१२ पर्यंत.
१३ संप्रसारण - ष्यङ:संप्रसारणं.।६।१।३३ ते विभाषा परे:।६।१।४४ पर्यंत
१४ आत्व प्रकरण - आदेच उपदेशे.।६।१।४५ ते शेश्छन्दसि बहुलम्।६।१।७० पर्यंत
१५ आगम प्रकरण - ऱ्हस्वस्य पिति.।६।१।७१ ते पदान्ताद्वा ।६।१।७६ पर्यंत
१६ आदेश व संधी प्रकरण - इको यणाचि।६।१।७७ ते पारस्करप्रभृतीति.।६।१।१५७ पर्यंत
१७ आदेश व संधी प्रकरण - इको यणाचि।६।१।७७ ते पारस्करप्रभृतीति.।६।१।१५७ पर्यंत
१८ पा.सू.६।१।१५८
१९ पा.सू. ६।२।१९९
२० पा.सू. ६।४।७१
२१ पा.सू.।६।४।७२

लुङ्, लङ् व लृङ् या तीन लकारात धातूहून उदात्त अडागमाचे विधान सूत्रांनी केले आहे. हलादि - धातूहून अडागम व अजादि धातूहून आडागम विहित आहेत. हे दोन्ही सतिशिष्ट स्वरांची इतके महत्त्वाची उदाहरणे आहेत की, हे दोन आगम सर्व धातुस्वर, विकरणस्वर व प्रत्ययस्वर या तिन्हींहून बलवान ठरून तिङन्त आद्युदात्त करतात. उदा. "अस्थाद्देव:प्रतिदोष०"[१], "अपिन्वन्मध्वर्णसो०"[२], "यदब्रवम् प्रथमं०"[३], येथे 'अस्थात्', 'अपिन्वत्' व 'अब्रवम्' ही अनुक्रमे लुङ् व लङ् लकाराची उदाहरणे आहेत. 'अभविष्यत्' असे लृङ् लकाराचे उदाहरण होईल. येथे सर्वत्र आगमस्वर आढळतो. यावर अधिक विवेचन पुढे उदात्तकाण्डात आगमस्वर प्रकरणात केले जाईल[४].

सातव्या अध्यायातील 'अस्थिदधिसक्थ्य'[५] सूत्राने नपुंसक लिंगामध्ये अस्थि, दधि इ. चार शब्दांना उदात्त अनङ् आदेश सांगितला आहे. त्यामुळे तृतीयादी अजादी विभक्ती असताना 'अस्थ्ना', 'दध्ना सक्थ्ना', 'अक्ष्णा' अशी अन्तोदात्त रूपे होतात. या सूत्रातील 'उदात्त अनङ्' पद पुढे दोन सूत्रे अनुवृत्त होते. त्यानुसार 'ई च द्विवचने'[६] या सूत्राने वेदांमध्ये 'दधि' वगैरे शब्दांना द्विवचनी प्रत्यय पुढे असताना उदात्त ईकार होतो व 'अक्षीभ्यां' अशी रूपे होतात. त्यामुळे स्वरविधान व रूपदृष्ट्या ही महत्त्वाची सूत्रे आहेत. या खेरीज 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्'[७] या सूत्राने अनुदात्त एकाच् धातूपुढील वलादी आर्धधातुक प्रत्ययाच्या इडागमचा निषेध केला आहे. या सूत्रामुळे धातुपाठातील अनुदात्त धातू स्पष्ट करता येतात, किंबहुना त्याशिवाय इडागमाचा निषेध होतो हे स्पष्ट होणार नाही; कारण पाणिनी महर्षींच्या काळी संस्कृत भाषा शिष्टमान्य होती. तसेच त्याकाळी भाषेत उदात्तादिक स्वरांचा यथास्थान प्रयोग होत असे, पण पुढे सस्वर उच्चारण मागे पडत गेले. त्यामुळे सस्वर धातुपाठही

---

१ ऋ.सं. १।३५।१०
२ ऋ.सं. १।६२।६
३ ऋ.सं. १।१०८।६
४ पहा. उदात्तकांण्ड, आगमस्वर पृ.क्र.१९१
५ पा.सू. ७।१।७५
६ पा.सू. ७।१।७७
७ पा.सू. ७।२।१०

अनुपलब्ध झाले. त्यामुळेच महाभाष्यकारांनीही अनुदात्त धातू ओळखण्यासाठी कारिका उद्धृत केलेली दिसते[१]. तेव्हा ही सूत्रे दुर्लक्ष्य नाहीत.

आठव्या अध्ययात 'तिङो गोत्रादीनि.'[२], या सूत्रापासून 'तिङि चोदात्तवति'[३] यासूत्रापर्यंत तिङन्तस्वराविषयी सलग विवेचन करण्यात आलेले आहे, जे भ. दीं.च्या 'तिङन्तप्रकरणा'त समाविष्ट आहे[४]. पण यातील अजून काही सूत्रे आहेत, जी दुर्लक्षित आहेत. जसे – 'अनुदात्तं सर्वमपादादौ'[५] ते "त्वामौ द्वितीयाया:"[६] या सूत्रापर्यंतच्या सर्व सूत्रात 'अनुदात्त सर्वम् अपादादौ' हे पूर्ण सूत्रच अनुवृत्त होते; त्यामुळे काही महत्त्वपूर्ण शब्दाची स्वरसिद्धी साधता येते. यामध्ये युष्मद व अस्मद् सर्वनामांच्या चतुर्थी, षष्ठी, द्वितीया विभक्तींना "वाम्-नौ"[७], 'वस्', 'नस्'[८], 'ते-मे'[९] असे आदेश सांगितले असून ते सर्वानुदात्त आहेत. कारण 'अनुदानं सर्वमपादादौ' या सूत्राचा पाद संपेपर्यंत अधिकारच केलेला आहे.[१०] त्यामुळे येथे केवळ 'वाम्, ते-मे' वगैरे आदेश नाहीत तर अनुदात्त स्वर सांगणे सुद्धा मुख्य प्रयोजन आहे. तेव्हाच वैदिक प्रयोग सिद्ध करता येतील. उदा. त्वा – "उप॑त्वाग्ने दि॒वेदि॑वे॒०"[११], "त्वंत्वावाजे॑षु०"[१२] किंवा "आ त्वा॑ विशन्त्वा॒श॒व०"[१३] किंवा गाय॑न्ति त्वा गा॒यत्रि॑णं०"[१४] वगैरे.

'न॑:' – "स न॑: पि॒तेव"[१५] किंवा "पा॒व॒का न॒: सर॑स्वती॒"[१६] वगैरे.

---

१ पहा. – प.भा. ७।२।१०, पृ.क्र.११२ म.भा. मरा. भाषां., म.म. वासुदेव शास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यकेशन सोसा. पुणे, इ.स. १९५१, भाग ६. "अथ के पुनरनुदात्ता:।आदन्ता अदरिद्रा:।इवर्णान्ताश्चाश्विडीशीदीधीवेवीङ"।...इ.
२ पा.सू. ८।१।२७
३ पा.सू. ८।१।७१
४ पहा. – वै. सि. कौ. भ. दी., पृ.क्र २६२ ते २८७, संपा. का. बा. अभ्यंकर, प्रथमावृत्ती ऑगस्ट १९७२.
५ पा.सू. ८।१।१८
६ पा.सू. ८।१।२३
७ युष्मदस्मदो: षष्ठी.। पा.सू. ८।१।२० ने विधान केले आहे.
८ बहुवचनस्य वस्नसौ। पा.सू. ८।१।२१ ने 'व' व 'न:' यांचे विधान केले.
९ तेमयावकेवचनस्य। पा.सू. ८।१।२२ ने त्याचे विधान केल
१० पहा. – म. भा. मराठी भाषांतर, वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्युकेशन सोसा. पुणे. पृ.क्र.२८०, भाग ६.
११ ऋ.सं. १।१।७
१२ ऋ.सं. १।४।९
१३ ऋ.सं. १।५।७
१४ ऋ.सं. १।१०।१
१५ ऋ.सं. १।१।९
१६ ऋ.सं. १।१।९

'वाम्' -''इन्दवो वामुशन्ति हि''[१] किंवा '' ता वां नेदिष्ठमीमहे''[२] किंवा 'इन्द्रावरुणा वामहं''[३] वगैरे.

'वः' - ''इन्द्रं वो विश्वत०''[४] किंवा '' प्र वो भ्रियन्त०''[५].

'ते' (युष्मद्-षष्ठी ए. व.)-''अथा ते अन्त०''[६] किंवा ''शन्ते सन्तु प्रचेतसे०''[७] किंवा ''एवाहिते विभूतय०''[८] वगैरे.

याशिवाय ''वाक्यस्य टेःप्लुत उदात्तः''[९] या सूत्रापासून 'तयोर्य्वावचि'[१०] या सूत्रापर्यंत पूर्ण पाद संपेपर्यंत अधिकार चालू राहतो[११]. त्यामुळे या सूत्रांमध्ये 'प्लुत उदात्ता'ची सिद्धता होते. त्यामुळे स्वर साधण्यास ही सूत्रे देखील उपकारकच ठरतात.

तेव्हा वरील विवेचनावरून स्पष्ट होते की, सहाव्या व आठव्या अध्यायात सलगपणे स्वरविवेचन जरी आले असले, तरी अन्यत्र देखील तितकेच महत्त्वाचे स्वरविषयक विवेचन पाणिनींनी प्रसंगानुसार त्या त्या स्थानी केले आहे, जे निश्चितच स्वरसिद्धीस उपकारक ठरते. तसेच पाणिनींच्या काळी लोक व वेद या दोहोंमध्ये व्यवहारात उदात्तादिक स्वरांचा वापर होत असे. आणि म्हणूनच त्यांनी आपल्या व्याकरणशास्त्रात उदात्तादिक स्वरांचे इतक्या विस्ताराने विवेचन केले. अन्यथा अर्धी मात्रा लाघव देखील साधण्याचा प्रयत्न करणारे पाणिनी महर्षी या स्वरविवेचनास वगळता ग्रंथास एक चतुर्थांश लहान करू शकले असते. पण त्यांनी तसे केले नाही, यावरूनच त्याचे महत्त्व लक्षात येते. यामुळेच ही वैदिक शब्दसिद्धी व स्वरसिद्धी अष्टाध्यायीस 'वेदांग' ही बिरुदावली रूढ करण्यास समर्थ ठरते.

---

१ ऋ.सं. १।२।४
२ ऋ.सं. १।१७।३
३ ऋ.सं. १।१७।७
४ ऋ.सं. १।७।१०
५ ऋ.सं. १।१४।४
६ ऋ.सं. १।४।३
७ ऋ.सं. १।५।७
८ ऋ.सं. १।८।९
९ पा.सू. ८।२।८२
१० पा.सू. ८।२।१०८
११ पहा. - म.भा. मराठी भाषां. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यकेशन सोसा. पुणे, पृ.क्र. ३८४, भाग ६, आवृ. इ.स.१९५१.

## १.६ वार्तिके व स्वरविवेचन -

पाणिनीय अष्टाध्यायीवर अनेक वैयाकरणांनी वार्तिके रचलेली होती. पण आज त्यांचे ते ग्रंथ उपलब्ध नाहीत. अशा अनेक वार्तिककारांची नावे देखील ज्ञात नाहीत; ज्यांच्या वार्तिकांचे महाभाष्यात संग्रह करण्यात आलेला आहे. तरीही पतंजलींनी काही वार्तिककारांचे नामनिर्देश केलेले आहेत. जसे - कात्यायन[१], भारद्वाज[२], सुनाग[३], वाडव[४], क्रोष्टा[५] इ. याशिवाय महाभाष्याच्या व्याख्याकारांनी देखील काही वार्तिककारांचा नामोल्लेख केला आहे. उदा. व्याघ्रभूती[६], वैयाघ्रपद्य[७] इ. त्यामुळे वार्तिककारांची संख्या बरीच होती हे स्पष्ट होते.

सर्वश्रुत आहे की, महाभाष्यकार पतंजलींनी आपल्या महाभाष्याची रचना कात्यायनकृत वार्तिकांच्या आधारावर केलेली आहे. पण त्याचबरोबर अन्य वार्तिककारांच्या वार्तिकांचे त्यांनी संकलनही केलेले आहे. तरी महाभाष्याच्या माध्यमातून कात्यायनाच्याच वार्तिकांची प्राप्ती होऊ शकते इतर वार्तिककारांच्या सर्व वार्तिकांची नाही. त्यामुळे कात्यायनासच पाणिनीय अष्टाध्यायीतील 'उक्त, अनुक्त किंवा दुरुक्त सूत्रांवर' गहन विचार विमर्श करणारा वैयाकरण म्हणून श्रेय द्यावे लागेल.

---

१ कात्यायनकृत वार्तिकांचे परीक्षण करण्यासाठी महाभाष्याची रचना केली असे. काशिकेवरील न्यास टीकेत स्पष्ट पहा.- "भाष्यं कात्यायनप्रणीतानां वाक्यानां विवरणे पतञ्जलिप्रणीतम्".

२ पतंजलीने अनेकवेळा भारद्वाज यांच्या वार्तिकांचा उल्लेख केला आहे. उदा. "घुसंज्ञायां प्रकृतिग्रहणं शिद्विकृतार्थम्" किंवा "युक्चिणो:प्रतिषेधे णिश्रिश्रन्थिग्रन्थिब्रूआमात्मनेपदाकर्मकाणामुपसंख्यानम्" पहा. म.भा. ३।१।८८.

३ सुनाग - म.भा.स "सौनागवार्तिका" ची रचना केलेली होती असे स्पष्टपणे म्हटले आहे व त्याचे कर्ता सुनाग होते. पहा. म.भा. ४।३।११४ याशिवाय 'एतदेव सौनागैर्विस्तृततरकेण पठितम्' असे म्हणून सुनागाचा उल्लेख केलेला आहे. पहा. म.भा. २।२।१७

४ वाडव - म.भा.कारांचे 'अनिष्टिज्ञोवाडव:पठति' असे एकवचन आहे. तेथे 'वाडव' वैयाकरणाचा उल्लेख आढळतो. पहा. म.भा.८.२.१०६

५ क्रोष्टा - "परिभाषान्तरमितिच कृत्वा क्रौष्ट्रिया:पठन्ति" असे क्रोष्टा नामक आचार्य उल्लेखित आहेत. पहा.म.भा.१।१।३ त्यावरुन क्रोष्ट्रीय वार्तिकेही होती, हे स्पष्ट होते.

६ व्याघ्रभूती - पतंजलीने उल्लेख केलेला नाही; पण 'अदो जग्धिर्ल्यप्तिकिति' या सूत्रावरील भाष्यातील श्लोक कैयटाने व्याघ्रभूतिरचित मानला आहे. पहा. - म.भा. कैयटकृत 'प्रदीप' २.४.३६, तसेच 'एकाच उपदेशेनुदात्तात्' या सूत्रावरील अनिट् कारिका व्याघ्रभूतीची मानली जाते. पहा.- शब्द कौ.भ.दी. १.१.२., पृ.८२

७ वैयाघ्रपद्य - 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रावर काशिकेत 'शुष्किका शुष्कजङ्घाच...' एक श्लोक आहे, जो भ. दीं नी वैयाघ्रपद्यरचित मानला आहे. पहा. शब्द कौ. भ. दी. १.१.५६

कात्यायनाच्या वार्तिकांचा विषय हा पाणिनींनी रचलेल्या सूत्रांमध्ये उक्त, अनुक्त या दुरुक्त शब्दांची व्यवस्था लावणे आहे[१]. त्यामध्ये अनेक वैदिक व लौकिक शब्दांच्या संबंधांची पूर्तता करण्याचा प्रयत्न कात्यायनीय वार्तिकांनी केलेला आहे. त्यापैकी येथे स्वरप्रकरणात समाविष्ट होणाऱ्या पाणिनीय सूत्रांमध्ये जे काही कमी-अधिकपण होते. जे वार्तिकाद्वारे परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्याचा शोध येथे क्रमश: मांडला जाईल व याचबरोबर स्वरदृष्ट्या या वार्तिकांचा विचार केला जाईल.

प्रथम अध्यायातील 'न सुब्रह्मण्यायां स्वरितस्य तूदात्त:'[२] या सूत्रावर 'असावित्यन्त:', 'अमुष्येत्यन्त:', 'स्यान्तस्योपोत्तमं च', 'वा नामधेयस्य' अशी चार वार्तिके आहेत. सुब्रह्मण्या निगदामध्ये केवळ उदात्त व अनुदात्त या दोनच स्वरांनी उच्चारण केले जाते. त्यामुळे येथे सूत्रकारांनी प्राप्त स्वरिताचे उच्चारण एकश्रुतीने न करता उदात्त स्वराने करावे असे विधान केले. येथे सूत्रकारांनी स्वरिताच्या विभक्तीरूपाचा अनुल्लेख केला आहे. म्हणूनच 'असावित्यन्त:' या वार्तिकात 'असौ'[३] असे 'अदस्' सर्वनामाचे प्रथमा एकवचन वापरून विभक्ति-निर्देश स्पष्टपणे दाखविला. त्यामुळे 'सुब्रह्मण्या निगदामध्ये प्रथमा एकवचनान्त पदाचा अन्त उदात्त होतो' असा स्पष्टार्थ बनतो. तर 'अमुष्येत्यन्त' व 'स्यान्तस्योपोत्तमं च' या दोन्ही वार्तिकांनी षष्ठ्यन्त पदाचा 'अन्त्यस्वर उदात्त होतो' असे सांगितले आहे, मग ही दोन वेगळी वार्तिके करण्याचे कारण काय अशी शंका निर्माण होते. याचे समाधान असे की, नुसते 'अमुष्य'[४] असे षष्ठी एकवचनान्त पदाचा अन्त उदात्त होतो असे सांगितले असते, तर 'स्य' या षष्ठ्यन्त पदाचा अन्त उदात्त झाला असता, पण त्याचा उपान्त्यस्वर अनुदात्त राहिला असता म्हणून तो ही उदात्त व्हावा यासाठी 'स्यान्तस्योपात्तमं च' असे वेगळे वार्तिक केले. त्याशिवाय 'स्यान्त०' इ.

---

१ "उक्तानुक्तदुरुक्तानां चिन्ता यत्र प्रवर्तते। तं ग्रन्थं वार्तिकं प्राहुर्वातिकज्ञा मनीषिण:।।" असा कारिकेतच 'वार्तिक' पदाचा अर्थ स्पष्ट केलेला दिसतो, जो कात्यायनाच्या सूक्ष्मनिरीक्षण दृष्टीचा परिचायक आहे व म्हणून कात्यायनीय वार्तिकांना लागू होतो.

२ पा.सू. १।२।३७

३ "असावित्यन्य:" यामध्ये 'न सौ इति अन्त' असा पदच्छेद संभवू शकतो कारण 'असौ' नञ् तत्पुरुषान्त होऊ शकते. 'असु' व त्याचे सप्तमी एकवचन असू शकते पण ते तसे नसून 'अदस्' सर्वनामास 'अदस औ सुलोपश्च। पा.सू. ७।२।१०७' ने सुलोप व औ आदेश होऊन 'तदो स: सावनन्त्ययो:। पा.सू. ७।२।१०६' ने 'स' होऊन 'असौ' रूप बनते.

४ अमुष्य - येथे 'ङस' ही षष्ठ्यन्त विभक्ती पुढे असताना 'टाङसिङसामि.।७।१।१२' ने 'स्य' आदेश होऊन 'अदसोऽसेर्दादुदोम:।८।२।८०' ने दकाराचा मकार व अकाराचा उकार होऊन रूप बनले आहे.

वार्तिकाने 'उपोत्तम' म्हणजे उपान्त्यस्वर उदात्त सांगितला शिवाय 'च' ग्रहणाने मागील 'अमुष्येत्यन्त:' या वार्तिकातील 'अन्त:' या पदाची अनुवृत्ती होऊन स्यान्त पदाची उपान्त्य व अन्त्य अशी दोन पदे उदात्त होतील[१]. शिवाय सतिशिष्ट स्वराने उपोत्तम स्वराचा बाध होऊ नये म्हणूनच संपूर्ण वार्तिक स्वतंत्रपणे केले आहे व द्वयुदात्त सांगितले. यानंतर 'वा नामधेयस्य' या वार्तिकाने मागील विषयात 'नाव' असेल तर उपोत्तमस्वराचा उदात्त विकल्पे करून सांगितला.[२] अशा प्रकारे या चार वार्तिकांनी सूत्रात व स्वरसिद्धीत निश्चितपणे भर टाकलेली दिसते. अन्यथा प्रथमान्त व षष्ठ्यन्त पदांची उदात्तत्व व द्वयुदात्तत्व सिद्ध होऊ शकली नसती.

दुसऱ्या अध्यायातील 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे'[३] या सूत्रावर 'षष्ठ्यामन्त्रितकारक-वचनम्', 'पूर्वाङ्गवच्चेति वक्तव्यम्', 'अव्ययानां न', 'अव्ययीभावस्य त्विष्यते' अशी ४ वार्तिके रचलेली आहेत. प्रथम पाहू की वार्तिक रचनाची काय आवश्यकता होती. प्रस्तुत सूत्राने आमंत्रित पद पुढे असताना (पर असताना) सुबन्त पद स्वराबाबत परपदाच्या अंगभूत होते म्हणजे दोन्ही पदांच्या मिळून एकच मुख्य उदात्त स्वर राहतो, असे विधान केले आहे. येथील 'सुप्' शब्द 'सुबन्त' अर्थाचा बोधक असल्यामुळे सर्व सुप् प्रत्ययान्त रूपे परस्थानीय आमंत्रिताच्या अंगभूत होऊ लागतात व सूत्रामध्ये अतिव्याप्ती दोष उत्पन्न होतो. उदा. ''त्वमग्ने भद्रं करिष्यसि''[४] किंवा ''सूनवेग्ने सूपायनो भव''[५] इ. ठिकाणी 'त्वम्-अग्ने' व 'सूनवे-अग्ने'. येथे अनुक्रमे प्रथमान्त व चतुर्थ्यन्त सुबन्त असून पुढे 'अग्ने' हे आमंत्रित आहे, तरी पराङ्गवत् स्वर येथे होऊ लागेल. तो होऊ नये म्हणून वार्तिककारांनी 'षष्ठ्यामन्त्रितकारकवचनम्' असे पहिले वार्तिक केले. त्यामुळे 'षष्ठ्यन्त नाम व आमन्त्रितकारक म्हणजे आमंत्रितान्तातील

---

१ 'स्यान्त' पदाचे उदा. - गार्गस्य पिता यजते। असे भ.दी. उदाहरण देतात. येथे 'गर्गस्य गोत्रापत्त्यम्' या अर्थी 'गर्गादिभ्यो यञ्।४।१।१०५' 'यञ्' प्रत्यय होऊन 'गार्ग्य' शब्द बनतो. येथे ञित् प्रत्ययामुळे 'ञ्नित्यादिर्नित्यम्।६।१।१९७' ने आद्युदात्त होतो. त्याचा बाध 'स्यान्तस्योपोत्तमंच' या वार्तिकाने होऊन 'स्य' हा प्रत्यय व त्यापूर्वीचा 'ग्य' असे दोन उदात्त होतात.

२ 'देवदत्तस्य पिता यजते' या उदाहरणात 'देवदत्त' हे नाम 'लघावन्ते द्वयोश्च. फि.सू.२।१९' ने आद्युदात्त प्राप्त असताना 'स्य' असे षष्ठ्यन्त रूप 'स्यान्तस्योपोत्तमं च' ने अंत्य व उपान्त्य असे दोन उदात्त होतात पण 'देवदत्त' हे कोणा व्यक्तीचे नाव असल्याने 'वा नामधेयस्य' या वार्तिकाने उपान्त्य स्वराचा उदात्त विकल्पाने सांगितला. त्यामुळे 'देवदत्तस्य' यातील 'त्त' या वर्णाला एकदा उदात्त होतो व एकदा नाही, तेव्हा अनुदात्त होतो.

३ पा. सू. २।१।२

४ ऋ. सं. १।१।६

५ ऋ. सं. १।१।९

अंतर्भूत क्रियेचे कारक असे जे नाम त्यांनाच पराङ्गवत्स्वर-कार्य करावे. इतरांना नाही हे स्पष्ट होते. उपरोक्त उदाहरणात 'त्वमग्ने' व 'सूनवेग्ने' येथे पराङ्गवत कार्य होत नाही. आणि सूत्र निर्दोष होते.

पण अजून एक समस्या निर्माण होते की, जसे आमंत्रितान्त पद हे पराङ्गवत्स्वराप्रमाणे व्यपेक्षा-सामर्थ्याने पूर्वपदाशी संबंधित असताना सूत्र लागू होणार नाही व अव्याप्ती दोष निर्माण होईल म्हणून पराङ्गवत्स्वराप्रमाणे 'पूर्वाङ्गवच्चेति वक्तव्यम्' असे वार्तिक रचावे लागले. थोडक्यात, येथे आमंत्रितान्त पद हे जर षष्ठ्यन्त नामाचे पूर्वी असेल तर पूर्वाङ्गवस्वर कार्य करावे व सूत्रानुसार षष्ठ्यन्त नामाचे परस्थानी जर आमन्त्रितान्त पद असेल तर पराङ्गवत्स्वर कार्य करावे. याची "आ ते पितर्मरूताम्"[१] व "द्रवत्पाणी शुभस्पती पुरुभुजा"[२] अशी यथाक्रम उदाहरणे होतील.

पराङ्गवत् व पूर्वाङ्गवत् भाव हा अव्ययांना होऊ नये म्हणून तिसरे वार्तिक 'अव्ययानां न' असे करावे लागले. त्यामुळे "उच्चैरधीयान"[३], "नीचैरधीयान"[४] या ठिकाणी 'उच्चै' व 'नीचै' या अव्ययांना पराङ्गवद् भाव होत नाही. पुढे 'अधीयान' हे आमंत्रित असले तरी. त्यामुळे 'उच्चै:' व 'नीचै:' ही अव्यये स्वरादिगणपठित असून अन्तोदात्त होतात[५] व 'अधीयान' हे आमंत्रितान्त पद पादारंभी नसल्यामुळे 'आमन्त्रितस्य च'[६] या आष्टमिक सूत्राने

---

१ ऋ. सं. २।१३।१, येथे 'पित:' हे आमन्त्रित पद 'मरुताम्' या षष्ठ्यन्त सुबन्ताच्या पूर्वी आलेले आहे; त्यामुळे पराङ्गवद्भाव न होता. पूर्वाङ्गवद्भाव झाला. 'पित:' हे आमंत्रितपद 'आमन्त्रितस्य च।८।१।१९' ने पादादी नसल्यामुळे सर्वानुदात्त झाले व त्याचे अंगवद्भावाने युक्त 'मरुताम्' पद ही सर्वानुदात्त झाले जे वास्तविकपणे 'मरुताम्' असे मध्योदात्त हवे पण पूर्वाङ्गवद्भावाने ते सर्वानुदात्त झाले व पुढे 'ते' या स्वरितापुढील सर्वानुदात्तांची 'स्वरितात्संहितायाम.।१।२।३९' ने एकश्रुती झाली आहे.

२ ऋ. सं.१।३।१, येथे 'पती' हे द्विवचनान्त आमंत्रितपद असून ते 'शुभ:' या षष्ठ्यन्त सुबन्ताच्या परस्थानी असल्यामुळे 'षष्ठ्यामन्त्रितकारकवचनम्' या वार्तिकाने पराङ्गवत् झाले. येथे 'पती' पद पादारंभी नसल्यामुळे आष्टमिक निघाताने सर्वानुदात्ताची प्राप्ती होते; पण 'शुभस्पती' एकच पद मानून त्यापूर्वीचे 'द्रवत्पाणी' हे आमंत्रितपद 'आमन्त्रितं पूर्वम् अविद्यमानवत्।८।१।७२' ने अविद्यमान होऊन शुभस्पती पादारंभी होऊन 'आमन्त्रितस्य च।६।१।१९८' ने आद्युदात्त होते, हे आद्युदात्त एकच स्वर मानून होते 'शुभ' व 'पती' यांचे दोन वेगळे स्वर मानले जात नाहीत.

३ पहा. म. भा. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यु. पुणे. २।१।२, पृ.क्र. २६५, भाग २.

४ पहा. म. भा. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यु. पुणे. २।१।२, पृ.क्र. २६५, भाग २.

५ एवादीनामन्त:। फि. सू. ४।१४ ने अन्तोदात्त

६ पा. सू. ८।१।१९

सर्वानुदात्त होते. त्याचे 'उच्चैः' व 'नीचैः' ही दोन अंगवद् होत नाहीत. त्यामुळे त्यांचे मूळ अन्तोदात्तत्व कायम राहते.

हा प्रतिषेध केवळ अव्ययांनाच व्हावा त्यातून अव्ययीभाव समास वगळला जावा म्हणून पुन्हा 'अव्ययीभावस्य त्विष्यते' असे वार्तिक करावे लागते. त्यामुळे अव्ययीभाव समासान्त पद हे परस्थानी असलेल्या आमंत्रितान्त पदाचे अंगवद् होते. म्हणजेच अव्ययीभाव समासान्त पद व पर आमंत्रितपद मिळून एकच पद समजले जाते. उदा. ''उपाग्न्यधीयान''[१], ''प्रत्यग्न्यधीयान''[२] येथे 'उपाग्नि' व 'प्रत्यग्नि' ही दोन अव्ययीभाव समासान्त पदे आहेत[३]. 'अधीयान' हे आमंत्रितान्त पद परस्थानी आहे. अव्ययीभाव समासान्त पदे जी समासस्वराने अन्तोदात्त होणार होती[४]; परांगवद्भावाने आमंत्रिताची अंगवद् झाल्यामुळे 'आमन्त्रितस्य च'[५] या षाष्ठिक सूत्राने आद्युदात्त होतात. हे या वार्तिकाविना सिद्ध होऊ शकले नसते. त्यामुळे या वार्तिकांचे स्वरप्रक्रियेत महत्त्वाचे स्थान आहे.

यानंतर सहाव्या अध्यायात स्वरविषयक वार्तिके आढळतात 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[६] या परिभाषासूत्रावर 'सतिशिष्टस्वरबलीय' इ. वार्तिक केले आहे, ज्याने सतिशिष्ट स्वराविषयी अत्यंत मौलिक भर घातली आहे. ज्याचे विवेचन पुढे उदात्तकांडात सविस्तरपणे केले जाईल[७]. तसेच 'चितः'[८] या सूत्रावर 'चिति प्रत्यये परें' इ. वार्तिक रचले आहे. ज्याने प्रकृती व प्रत्यय याच्या समुदायाचा अन्त उदात्त होतो असे स्पष्ट केले आहे. यावरही अधिक विवेचन पुढे उदात्तकांडात केले जाईल[९]. त्यामुळे येथे अधिक विवेचन अयोग्य ठरेल. यानंतर पुढे

---

१ पहा. म. भा. २।१।२, म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यु. पुणे. पृ.क्र. २६५, भाग २.
२ पहा. म. भा. २।१।२, म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यु. पुणे. पृ.क्र. २६५, भाग २.
३ अग्नेःसमीपम्, उपाग्नि व 'अग्नौ अग्नौ प्रत्यग्नि' अशी 'अव्ययं विभक्तिसमीप.२।१।६' ने अव्ययीभाव समास झाला आहे.
४ समासस्य।६।१।२२३। ने समासान्त पद अन्तोदात्त झाले. त्यामुळे 'उपाग्नि' व 'प्रत्याग्नि' मधील 'ग्नि' उदात्त होतो.
५ पा. सू. ६।१।१९८
६ पा. सू. ६।१।१५८
७ पहा. उदात्तकांड, पृ. क्र.१२५
८ पा. सू. ६।१।१६३
९ पहा. उदात्तकांड, पृ. क्र.१५५

'ऱ्हस्वानुड्भ्यां मतुप्'[१] या सूत्रावर 'रेशब्दाच्च' असे वार्तिक रचले आहे. येथे प्रस्तुत सूत्राने ऱ्हस्वान्त अन्तोदात्त शब्दापुढील व नुडागमापुढील मतुप् प्रत्यय उदात्त होतो, असे सांगितले आहे. त्यामुळे जर ऱ्हस्वान्त नसेल तर मतुप् उदात्त होणार नाही व 'रेवाँ इन्द्रेवत'[२] येथे 'रेवान्'[३] पदाची स्वरसिद्धी होणार नाही; म्हणून 'रेशब्दाच्च' असे वार्तिक केले. त्यामुळे 'रे' शब्दापुढील मतुप् प्रत्यय उदात्त होतो, जरी 'रे' दीर्घान्त असला तरी देखील. तेव्हा या वार्तिकाने सूत्रात 'अनुक्त' जो 'रेशब्द' त्याची पूर्तता करण्याचे काम केले आहे.

'चौ'[४] या सूत्रावर ''अतद्धित इति वाच्यम्' असे वार्तिक आहे. 'चौ' या सूत्राने, अकारलोप पावलेला अञ्च् धातू पुढे असताना त्या पूर्वीच्या शब्दाचा अन्त उदात्त होतो, असा नियम सांगितला आहे. या सूत्राने एक सामान्यविधान केले, पण त्याचा अपवाद मात्र वार्तिकाने सांगितला. त्यामुळे ''दाधीचः, माधूचः''[५] वगैरे तद्धितान्त शब्द अन्तोदात्त सिद्ध होऊ शकले; अन्यथा प्रस्तुत सूत्राने त्यांचा उपान्त्य स्वर उदात्त होऊ लागला असता. हा अतिप्रसंग टाळण्याचे कार्य येथे या वार्तिकाने केले आहे.

'तत्पुरुषे तुल्यार्थतृतीयासप्तम्य०'[६] या सूत्रावर 'अव्यये नञ्कुनिपातानाम्' असे वार्तिक केले आहे. या वार्तिकाने सूत्रातील 'अव्यय' शब्दाने ज्या समस्त अव्ययांच्या ठिकाणी अतिव्याप्ती संभवते ती दूर करण्यासाठी 'नञ्', 'कु', व 'निपात' संज्ञक अव्यये घ्यावयाची

---

१ पा. सू. ६।१।१७६

२ ऋ. सं. ८।२।१३

३ 'रयि' शब्दाहून 'तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्।५।२।९४' ने मतुप् होऊन 'छन्दसीरः।८।२।१५' ने मतुप् च्या मकारास वकार झाला. 'रे' शब्द 'फिषोन्त उदात्त। फि. सू.१।१।' ने अन्तोदात्त आहे व पुढील 'मतुप्' पित्त्वाने अनुदात्त होतो व 'रेवान्' शब्द अन्तोदात्त सिद्ध होऊ शकत नाही.

४ पा. सू. ६।१।२२२

५ दाधीचः-माधूचः- येथे 'दधि' व 'मधु' हे उपपदी असताना 'अञ्च्' धातूहून 'ऋत्विग्दृक.।३।२।५६' ने क्विन् प्रत्यय होऊन 'दध्यञ्च्' व 'मध्वञ्च्' हे शब्द बनतात. त्यांच्या हून 'अण्' हा तद्धितान्त प्रत्यय करुन 'अनिदितां हल उपधायाः.।६।४।२४' ने नकाराचा लोप, अचः।६।४।१३८ ने अकारलोप, 'चौ।६।३।१३८ ने दधी व मधू' असे दीर्घ व तद्धितेष्वचामादेः।७।२। ११७। ने आदिवृद्धी होऊन 'दाधीचः' व 'माधूचः' असे तद्धितान्त शब्द बनतात, येथे 'अञ्च्' च्या अकाराचा लोप 'अचः।६।४।१३८' ने झाला आहे; त्यामुळे 'चौ।६।१।२२९' ने 'दाधीच' व 'माधूच' मधील 'धी' व 'धू' चे उदात्तस्वर प्राप्त होतात; पण वार्तिकामुळे 'अण्' याचा प्रत्ययस्वर अन्तोदात्त कायम राहतो व हे शब्द अन्तोदात्त सिद्ध होतात.

६ पा. सू. ६।२।२।

आहेत व त्यांचेच प्रकृतिस्वरत्व कायम राहील[१]. त्यामुळे 'सामिकृतम्', 'स्वयंघोषित' वगैरे समास अन्तोदात्त होतील[२]. अन्यथा 'सामि' व 'स्वयम्' वगैरे पूर्वपदप्रकृतिस्वर होऊ लागले असते[३], याचा परिहार वार्तिकाने केला आहे.

यानंतर सहाव्या अध्यायातीलच 'कुरुगार्हपतरिक्तगुर्वसूत०'[४] इ. सूत्रावर 'वृजेरिति वाच्यम्' व 'पण्यकम्बल: संज्ञायामिति वक्तव्यम्' अशी दोन वार्तिके केलेली आहेत. त्यापैकी पहिल्या वार्तिकाने सूत्रातील 'कुरूगार्हपतम्' या समासातील 'कुरु' शब्दबरोबर 'वृजि' हा देखील शब्द पूर्वपदी असताना 'वृजिगार्हपतम्' या समासातील पूर्वपद प्रकृतिस्वरत्व कायम राहील असे सांगितले आहे. वास्तविक पाहता 'कुरुगार्हप०' इ. सूत्रात प्रत्यक्षपणे सात समास उच्चारलेले असल्यामुळे 'वृजिगार्हपतम्' हा समास 'समासस्य' सूत्राने अन्तोदात्त झाला असता. म्हणून वार्तिक करून हा समास देखील आद्युदात्त होतो[५], हे सांगावे लागले. तर दुसरे वार्तिक हे सूत्रातील 'पण्यकम्बल' या सामासिक शब्दाबद्दल स्पष्टार्थकता करते, की जर 'पण्यकम्बल:' शब्द जर संज्ञावाचक असेल तरच पूर्वपदप्रकृतिस्वरत्व होईल[६] अन्यथा होणार नाही. म्हणजे 'पण्य: कम्बल:, पण्यकम्बल:' असा 'विशेषणं विशेष्येण बहुलम्'[७] या सूत्राने 'विकाऊ

---

१ 'अयोग्य:' येथे न योग्य:, अयोग्य: असा 'नञ्।२।२।६' तत्पुरुष होतो. तेव्हा 'समासस्य।६।१।२२३।' ने तो अन्तोदात्त प्राप्त होतो; 'तत्पुरुषे तुल्यार्थ.।६।२।२' ने अव्ययस्वर शेष राहतो, तर वार्तिकामध्ये नञ् चे पठण असल्याने 'नञ्' जो आद्युदात्त आहे तो कायम राहून 'अयोग' आद्युदात्त असे प्रकृतिस्वराने सिद्ध होते. याचप्रमाणे 'कुपुरुष' या ठिकाणी 'कु' 'निपाता आद्युदात्ता:। फि.सू.४।१२' ने उदात्त होतो व समासात 'कु' चा उदात्त प्रकृतिस्वर कायम राहतो.

२ 'सामिकृतम्', 'स्वयंघोषित:' हे ही तत्पुरुष समासच असून 'सामि' व 'स्वयं' ही अव्यये पूर्वपदी असली तरी वार्तिककारांनी केवळ 'नञ्' व 'कु' यांचेच ग्रहण केलेले असल्यामुळे येथे 'समासस्य।६।१।२२३' ने अन्तोदात्त होतो व पूर्वपदप्रकृतिस्वराचा बाध होतो.

३ 'सामि' व 'स्वयम्' ही दोन अव्यये 'स्वरादिनिपातमव्ययम्।१।१।३७' सूत्रामध्ये स्वरादिगणपठित असल्यामुळे त्यांना 'अव्यय' संज्ञा आहे व सूत्रात 'अव्यय' असेल तर त्याचे प्रकृतिस्वरत्व कायम राहते म्हटले आहे; म्हणून प्रकृतिस्वर होऊ लागतो.

४ पा. सू. ६।४।४२

५ 'वृजिगार्हपतम्' हा 'वृजीनां गार्हपतम्' असा ष. तत्पु. आहे. त्यामुळे तो 'समासस्य।६।१।२२३' ने अन्तोदात्त प्राप्त होतो; पण वार्तिकाने 'वृजि' या पूर्वपदाचे प्रकृतिस्वरत्व सांगितले आहे. 'वृजि' शब्द 'इगुपधात् कित्। पं. उ. सु. ४।१।१२१' ने 'इन्' प्रत्यय होऊन तयार झाले आहे, त्यामुळे नित्त्वामुळे आद्युदात्त होते व 'वृजिगार्हपतम्' समास आद्युदात्त होतो.

६ 'पण्यकम्बल:' या संज्ञावाचक पदातील 'पण्य' शब्द 'अवद्यपण्यवर्या.।३।१।१०१' ने 'यत्' या कृत्य-प्रत्ययान्त निपातन केले आहे. यतोऽनाव:।६।१।२१३ ने दोन स्वर युक्त 'पण्य' शब्द आद्युदात्त सांगितला त्यामुळे 'पण्यकम्बल' वार्तिकाने आद्युदात्त सिद्ध होतो.

७ पा. सू. २।१।५७

कांबळ' या अर्थी कर्मधारय असेल तर तो 'समासस्य'[१] ने अन्तोदात्त होईल. पण जर हे वार्तिक केले नसते तर संज्ञावाचक अर्थ नसतानाही पूर्वपद प्रकृतिस्वरत्व होऊन 'पण्यकम्बल:' शब्द स्वरसिद्ध होऊ शकला नसता. तेव्हा वार्तिककारांनी सूत्रातील अनुक्तता दूर केलेली दिसते.

'अहीने द्वितीया'[२] या सूत्रावर वार्तिकाची निर्मिती करावी लागते, कारण 'अहीने' या पदाने 'हीन' हा अर्थ नसताना द्वितीया तत्पुरुष समासाचे द्वितीयान्त पद प्रकृतिस्वरत्वास प्राप्त होते. त्यामुळे 'सुखप्राप्तम्'[३] येथे ही 'सुख' शब्द प्रकृतिस्वरूप प्राप्त होतो, पण 'प्राप्तम्' हे क्तान्त रूप असल्यामुळे 'याथघञ्क्ता'[४] या सूत्राने अन्तोदात्त झाले पाहिजे; पण त्याचा बाध होतो; पण सूत्रात 'अनुपसर्ग इति वक्तव्यम्' असे वार्तिक म्हटले तर 'प्राप्तम्' हे सोपसर्गपद आहे; त्यामुळे सूत्रातील 'सुखप्राप्तम्' या ठिकाणी होणारी अतिव्याप्ती टळते व अन्तोदात्त सिद्ध होऊ शकते.

सहाव्याच अध्यायात 'आदिरुदात्त:'[५] पासून 'न भूताधिकसंजीव०'[६] या सूत्रापर्यंत आद्युदात्त प्रकरण आहे. पाणिनींनी या प्रकरणात आद्युदात्त आढळणाऱ्या वैदिक शब्दांचा स्वरसिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. तरी त्यांच्याकडून राहून गेलेल्या अशा अनेक सामासिक शब्दांची स्वरसिद्धी व्हावी, जे शब्द वार्तिककारांच्या समोर आद्युदात्त उच्चारले जात असावेत. त्यांची पूर्तता करण्यासाठीच ' न भूताधिक'[७] या आद्युदात्त प्रकरणातील शेवटच्या सूत्रावर 'आद्युदात्तप्रकरणे दिवोदासादीनां छन्दस्युपसंख्यानम्' असे वार्तिक रचले. ज्यामुळे अनेक 'दिवोदासादिक' सामासिक शब्दांची या आद्युदात्त प्रकरणात स्वरसिद्धी होऊ शकते.

---

१ पा. सू. ६।१।२२३

२ पा. सू. ६।२।४७

३ 'सुखप्राप्तम्' हा 'सुखम् प्राप्तम्' असा 'द्वितीया श्रितातीतपतितगतात्यस्तप्राप्तापन्नै:।२।१।२४' ने द्वि. तत्पु. होतो व प्रस्तुत सूत्राने 'सुख' पदाचा प्रकृतिस्वर प्राप्त होतो. येथे 'सुख' हा नित्य नपुंसकलिंगी असल्यामुळे 'नब्विषयस्या.। फि. ऋू.।२।३' ने आद्युदात्त होईल, पण 'खान्तस्याश्मादे: फि. सू. १।६' ने अन्तोदात्त होतो.

४ पा. सू. ६।२।१४४

५ पा. सू. ६।२।१६४

६ पा. सू. ६।२।९१

७ पा. सू. ६।२।९१

यावरून स्पष्ट होते की, वार्तिककारांनी आपल्या सूक्ष्म पुरक दृष्टीने पाणिनीय सूत्रांची समाजमान्यता वाढविण्यास अधिक मौलिक योगदान दिले आहे.

याशिवाय 'कुचेलम्', 'कुराज्यम्', 'कुवर्ग्यम्' इ. शब्दांच्या अव्ययाच्या पूर्वपदप्रकृति-स्वरसिद्धीसाठी 'चेलराज्यादिस्वरादव्ययस्वर: पूर्वविप्रतिषेधेन' असे वार्तिक केले आहे.[१] सहाव्या अध्यायातील स्वरप्रकरणाचे जे शेवटचे सूत्र 'व्यत्ययो बहुलम्'[२] या सूत्रातील 'व्यत्यय:' स्पष्ट करण्यासाठी केलेले "परादिश्च परान्तश्च पूर्वान्तश्चापि दृश्यते । पूर्वादयश्च दृश्यते व्यत्ययो बहुलं यत:।।" हे श्लोक वार्तिक[३] वैदिक स्वरसिद्धी देताना व्यत्यय कसा येतो याची माहिती देऊन स्वरसाधक ठरते. या व्यत्ययाची उदाहरणे भट्टोजींनी आपल्या वै. सि. कौ. ग्रंथात अत्यंत सविस्तरपणे दिलेली आहेत[४]. तसेच आठव्या अध्यायातील 'कुत्सने च सुप्यगोत्रादौ ।'[५] यासूत्रावरील 'क्रियाकुत्सन इति वाच्यम्', 'पूतिश्चानुबन्ध इति वाच्यम्' व 'वा बह्वर्थमनुदात्तमिति वाच्यम्' या तीन वार्तिकातूनही तोच भाव व्यक्त होतो, जो पूर्वीच्या वार्तिकांनी पाणिनीय सूत्रांतील त्रुटी तसेच न्यूनतांची पूर्ती करून संस्कृत व्याकरणशास्त्रात पूर्णता प्रदान करण्याचे कार्य केले आहे.

थोडक्यात, पाणिनी महर्षींनी स्वरविषयक विवेचन अत्यंत व्यापक स्वरूपात केलेले असले, तरी जेथे जेथे म्हणून पाणिनीय सूत्रांत त्रुटी संभवतात, त्या दूर करण्याचे भगीरथ कार्य कात्यायन वार्तिकांनी केलेले दिसते. उपरोक्त विवेचित वार्तिकांनी कशा प्रकारे स्वरसिद्धी सफल

---

१ कुचेलम् इ. ठिकाणी 'कुत्सितं चेलम्' असा कुगतिप्रादय:।२।२।१८। ने तत्पुरुष समास झाला आहे. 'कु' यास अव्यय संज्ञा असल्यामुळे 'तत्पुरुषे तुल्यार्थ.।६।२।२' ने अव्ययपूर्वपदप्रकृतिस्वरत्व प्राप्त होते; पण 'चेलखेटकटुककाण्डं गर्हायाम्।६।२।१२६' ने 'चेल' पदाचा आदिस्वर उदात्त सांगितला आहे. त्यामुळे दोन्ही सूत्रात विप्रतिषेध निर्माण होतो तेव्हा 'विप्रतिषेधे परं कार्यम्।१।४।२' ने परिभाषेने परसूत्रकार्य प्राप्त होऊन उत्तरपदादी स्वर उदात्त होऊ लागतो, तो होऊ नये; म्हणून 'चेलराज्यादि.' असे वार्तिक करुन 'कु' या पूर्वपदाचा उदात्त कायम राहतो, असे सिद्ध केले आहे. 'कुराज्यम्' येथेही वरील प्रमाणे 'अकर्मधारये राज्यम्।६।२।१३०।' या सूत्राशी विप्रतिषेध निर्माण होतो, तर 'कुवर्ग्यम्' येथे 'वर्ग्यादयश्च।६।२।१३१' शी विप्रतिषेध होतो, तेव्हा पूर्वसूत्राचे म्हणजे 'तत्पुरुषे तुल्यार्थ.।६।२।२१' सूत्राचेच कार्य प्रबळ करुन 'कुचेलम्' इ. ठिकाणी आद्युदात्त स्वर सिद्ध होतो.

२ पा. सू. ६।२।१८९

३ पहा. म. भा. ६।२।१९९, भाग ५, म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, प्रका. डेक्कन एज्यु. सोसायटी, पुणे, प.क्र.२९६.

४ पहा. वै. सि. कौ. भाग ३, वैदिकी प्रक्रिया, संपा. म. दा. साठे, पृ. क्र. ३२.

५ पा. सू. ८।१।६९

होते स्पष्ट होते, त्याचबरोबर गोल्ड स्टुकर[१], वेबर[२], बर्नेल[३] यांनी जे कात्यायनास छिन्द्रान्वेषी, विद्वेषी मानले आहे, ते सर्वथा अयोग्य आहे हे ही यावरून स्पष्ट होते.

### १.७ फिट्सूत्रे व स्वरसिद्धी -

एकीकडे जिथे लौकिक शब्दांची सिद्धी देणे, हा मुख्य विषय डोळ्यासमोर ठेवून संपूर्ण भाषेचेच आदर्श व्याकरण रचण्याचे काम महर्षी पाणिनींनी केले. त्यातच वैदिक शब्दसिद्धीसाठी अष्टाध्यायीमध्ये एक चतुर्थांश हिस्सा खर्ची घातला. असे दुर्घट कार्य झालेले असतानाच दुसरीकडे शांतनवाचार्य असे एक आचार्य होते, ज्यांनी केवळ 'स्वरसिद्धी' याच विषयाला वाहून घेणारा ग्रंथ निर्माण केला. ज्यामुळे त्याकाळी सस्वर उच्चारणास किती महत्त्व होते ते स्पष्ट होते. पण त्यांच्या स्वरसिद्धीचा विषय मात्र प्रातिपदिके ही आहेत. पाणिनीय प्रातिपदिक संज्ञा ज्यांना लागू होते, त्यांनाच शांतनवाचार्य 'फिट्' अशी संज्ञा देतात. फिट्स्वर सांगणारी सूत्रे ती 'फिट्सूत्रे' म्हणून पुढे ओळखली जाऊ लागली. या फिट्सूत्रांचे वैशिष्ट्य म्हणजे यांनी त्या त्या शब्दांचे स्वर सिद्ध करून दाखविले आहेत, जे जे शब्द अव्युत्पन्न मानले गेलेले आहे. त्यामुळे अव्युत्पन्न शब्दांची स्वर सिद्धी फिट् सूत्रांनी होत असल्यामुळे जिथे पाणिनीय स्वरविषयक सूत्रे, कात्यायनीय वार्तिके चर्चिली जातात, तिथे फिट् सूत्रांचा विचार न होणे चुकीचे ठरते, त्यामुळे फिट्सूत्रांनी होणारी स्वरसिद्धी याचा विचार येथे केला जाईल.

फिट्सूत्रांचे कर्ता शांतनवाचार्य पाणिनीहून पूर्वकालिक आहे, असे मीमांसकांचे मत आहे[४]. स्वत: महाभाष्यकार पतंजलीनेही अव्युत्पन्न प्रतिपादिकांच्या स्वरसिद्धीसाठी फिट्सूत्रांचा आधार घेतलेला दिसतो. मीमांसकांच्या मते, फिट्सूत्रांची रचना आपिशलीच्या पूर्वी झालेली होती[५]. पाणिनीय सूत्रांमध्ये ही अपिशलीचे नाव उल्लेखलेले आहे[६]. तसेच पाणिनी

---

१ Pānini, Goldstűcker, Pg. No. 119-121.

२ इंडिस्टु, वेबर ए., भाग १३, पृ. २९७ ते ३८९.

३ Aindra School of Sanskrit Grammarians, by A. C. Burnell, Pg. No. 91.

४ पहा. मीमांसक, भाग २, पृ. ३१७

५ पहा. मीमांसक, पृ. ३१७

६ पहा. 'वा सुप्यापिशले:।६।१।९२'

व शान्तनवाचार्य दोघेही वेदासाठी 'छन्दसि' असा, तर भाषिक प्रयोगासाठी 'भाषायाम्' असा शब्दप्रयोग करताना दिसतात[१]. पाणिनीय सूत्रांप्रमाणेच फिट्सूत्रातील काही सूत्रातील - उदाहरणे वैदिक भाषेत उपलब्ध होत नाहीत[२]. असे असले तरी स्वरसिद्धी प्रसंगी फिट्सूत्रांचा उपयोग होतो हे अमान्य करून चालणार नाही.

वास्तविक पाहता पाणिनी वैदिक शब्दांच्या व्युत्पन्नपक्षाचे समर्थक आहेत, तर शांतनवाचार्य अव्युत्पन्नपक्षाचे आणि त्यामुळे या दोहोंच्या स्वरप्रक्रियेत विभिन्नता आहे. पाणिनी शब्दाच्या प्रकृति-प्रत्यय संबंधाने स्वरसिद्धी करतात, तर शांतनवाचार्य त्या शब्दाच्या आकार प्रकार या बाह्यांगांचा विचार करून नियम सांगतात. त्यामुळे लहान रचनेत मोठा विषय प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. जसे -

१) **अक्षरसंख्येच्या दृष्टीने** बह्वच् लघ्वन्त शब्द त्यांच्यातील गुरु अक्षर त्यास उदात्त होतो असे सांगितले आहे[३]. उदा. ऋबीश, काकम्बीर, वृषाकपि येथे अनुक्रमे 'बी' व 'षा' हे गुरुवर्ण उदात्त आहेत.

२) **लिंगावर आधारित स्वरसिद्धी** - १) धान्त, यान्त नित्य स्त्रीलिंगी शब्द अन्तोदात्त सांगितले आहेत[४]. उदा. गोधा, मेधा, छाया, माया. २) शिवाय नपुंसकलिंगी 'इस्' प्रत्ययान्त नसलेले शब्द आद्युदात्त सांगितले आहेत[५]. उदा. ''स्वे दमें''[६], ''स्वामेदिन्द्रस्य शर्मणि''[७], ''प्रथिना शर्वः''[८], इ. यातील '' दमे, शर्मणि, व शवः'' ही आद्युदात्त वैदिक उदाहरणे आहे. शिवाय रजम्, तपः, पयः, मनः वगैरे आहेतच.

---

१ भाषायां सदवसश्रुवः। पा. सू. ३।२।१०८, प्रथमायाश्च द्विवचने भाषायाम्। पा. सू. ७।२।८८, वा भाषायाम्। फि. सू. १।१६ छन्दसि च। पा. सू. ५।४।१४८, ५।१।६७, ६।३।१२६, छन्दसि च। फि. सू. १।१०, ३।१

२ पीतद्र्वर्थानाम्। फि. सू. २।१४, शादीनां शाकानाम्। फि. सू. ३।५, ईषान्तस्य हयादेरादिर्वा फि. सू. ३।१६, गोष्ठजस्य.। फि. सू. ४।२

३ लघावन्ते द्वयोश्च बह्वषो गुरू। फि. सू. २।१९

४ ध्यपूर्वस्य स्त्रीविषयस्य। फि. सू. १।५

५ नब्विषयस्यानिसन्तस्य। फि. सू. २।३

६ ऋ. सं. १।१।८

७ ऋ. सं. १।४।६

८ ऋ. सं. १।८।५

३) **पदार्थावर आधारित स्वरसिद्धी** - १) पाटला, अपालंक, अम्बा व सागर अर्थाच्या शब्दांचा अंत उदात्त असतो[१]. यानुसार 'पाटला' व 'अपालंक' ही वनस्पतींची नामे आहेत. यावरून औषधी वनस्पतींचा येथे संग्रह करता येतो. त्यानुसार 'गुल्गुलू[२], प्रमंदनी[३], आघाटा[४], कर्कर्य[५], अजशृङ्गी[६], अराटकी[७] इ. वनौषधींचा उल्लेख अथर्ववेदात आढळतो ; ज्या प्रस्तुत फिट् सूत्राच्या नियमानुसान अन्तोदात्त सिद्ध होतात. २) "गेहार्थानामस्त्रियाम्"[८] असा नियम करून 'घर' या अर्थाच्या स्त्रीलिंगी नसलेल्या शब्दांचा शेवटचा स्वर उदात्त सांगितला आहे. उदा. गेहम्, गृहम्, वेश्म, सद्म वगैरे शब्द. जे शब्द नपुंसकलिंगी असल्यामुळे 'नब्विषयस्यानिसन्तस्य'[९] सूत्राने आद्युदात्त होणार होते; पण प्रस्तुत सूत्राने त्याचा बाध केला. तर 'अस्त्रियाम्' म्हटल्याने 'शाला' शब्द आद्युदात्त होतो. उदा. "इमां शालां सविता."[१०]

३) पीतद्रू शब्द व त्या अर्थाचे इतर शब्दही आद्युदात्त होतात[११].असा नियम केलेला दिसतो.

४) **वर्णावर आधारित स्वरसिद्धी** - १) उन, ऋ, वन् ही अक्षरे शेवटी असलेले शब्द आद्युदात्त असतात[१२]. उदा. उन = "वरुणंच रिशादसम्।"[१३],ऋ ="होतारं रत्नधातमम् ।"[१४], वन् = "पीवानं मेषम्"[१५] इ. २) इगन्त म्हणजे इ, उ, ऋ, लृ शेवटी असलेले द्वयक्षरी शब्द आद्युदात्त असतात[१६]. उदा. कृषि, भूमि, हरि वगैरे.

---

१ पाटलाऽपालङ्काऽम्बासागरार्थानाम्। फि. सू. १।२
२ अथर्व. सं. ४।३७।३
३ अथर्व. सं. ४।३७।३
४ अथर्व. सं. ४।३७।५
५ अथर्व. सं. ४।३७।५
६ अथर्व. सं. ४।३७।६
७ अथर्व. सं. ४।३७।६
८ फि. सू. १।३
९ फि. सू. २।३
१० अथर्व. सं. ३।१२।४
११ पीतद्र्वार्थानाम्। फि. सू. २।१४
१२ उनर्वनन्तानाम्। फि. सू. २।९
१३ ऋ. सं. १।२।७
१४ ऋ. सं. १।१।१
१५ ऋ. सं. १०।२७।१७
१६ इगन्तानां च। फि. सू. २।२६

तसेच विशिष्ट शब्दांच्या स्वरसिद्धीसाठी गणपाठही केलेले आहेत. उदा. घृतादी[१], ग्रामादी[२], कर्दमादी[३], एवादी[४], वावादी[५], चादी[६] इ. गणपाठ केलेले आहेत. पैकी 'घृतादिगण' व 'ग्रामादिगण' हे दोन पाणिनीय 'वृषादिगण'[७] व 'उञ्छादिगण'[८] यांच्या तुल्य आहेत. जसे - अन्यसूत्रांनी अन्तोदात्त वगैरे होणारे त्या त्या गणात परिगणित मानून त्यांची स्वरसिद्धीची व्यवस्था पाणिनीय व्याकरणांत आहे, तशीच व्यवस्था फिट्सूत्रांमध्ये 'घृतादिगण' व 'ग्रामादिगण' या दोन गणपाठांनी केलेली आहे.

याशिवाय फिट्सूत्रकारांनी अशी काही मौलिक सूत्र केलेली आहेत, ज्यांच्या विना त्या काही विशिष्ट शब्दांची स्वरसिद्धीच होऊ शकत नाही. जसे 'निपात', 'उपसर्ग', 'सर्वनामे', यांच्या स्वरसिद्धीसाठी फिट्सूत्रांवरच अवलंबून रहावे लागते. त्यातही निपात आद्युदात्त असतात[९]. असा सार्वत्रिक नियम केला व नंतर लगेच एव वगैरे निपांताचा अन्त उदात्त असतो[१०] असा अपवादही सांगितला. तर च, वा, ह वगैरे अव्यये नेहमी अनुदात्त असतात[११] असे अत्यंत महत्त्वाचे नियम सांगितले आहेत. त्यामुळे स्वरसिद्धी होण्यास ही फिट्सूत्रे अत्यंत उपकारक ठरतात. उदा. निपात = "अच्छा जरितारः"[१२], उपसर्ग = " प्र वामश्नोतु"[१३], एव = "एव दिवेदिवे।"[१४], च, वा = "इतो वा सातिम्"[१५], "सहस्रप्रधनेषु च।"[१६]

---

१ घृतादीनां च। फि. सू. १।२२
२ ग्रामादीनां च । फि. सू. २।१५
३ कर्दमादीनां च। फि. सू. ३।१०
४ एवादीनामन्तः । फि. सू. ४।१४
५ वावादीनामुभावुदात्तौ । फि. सू. ४।१६
६ चादयोनुदात्ताः । फि. सू. ४।१७
७ वृषादीनां च । पा. सू. ६।१।२०३ ने आद्युदात्त सांगणारा गण.
८ उञ्छादीनां च । पा. सू. ६।१।१६० ने अन्तोदात्त सांगणारा गण.
९ निपाता आद्युदात्ताः । फि. सू. ४।१२
१० एवादीनामन्तः । फि. सू. ४।१४
११ चादयोऽनुदात्ताः । फि. सू. ४।१७
१२ ऋ. सं. १।२।२
१३ ऋ. सं. १।१७।१
१४ ऋ. सं. १।१।३
१५ ऋ. सं. १।६।१०
१६ ऋ. सं. १।७।४

उपसर्गांमध्ये 'अभि' उपसर्ग वगळून इतर उपसर्ग आद्युदात्त असतात[१] असे सांगितले आहे. त्यामुळे 'अभि' उपसर्ग अन्तोदात्त सिद्ध होतो. उदा. "अभि त्वा पूर्वपीतये"[२].

सर्वनामांना 'शिट्' अशी कृत्रिम संज्ञा दिलेली आहे. अकारान्त सर्वनामे आद्युदात्त असतात[३], असा नियम केलेला आहे. त्यानुसार 'सर्वादीनि सर्वनामानि' येथे पठित सर्व, विश्व वगैरे अकारान्त सर्वनामे आद्युदात्त होतात. उदा. "विश्वे देवासो[४]", "सर्वा उपब्रुवे।"[५] पण हा नियम 'उभ' यास लागू होत नाही. तो अन्तोदात्त आढळतो. उदा. "उभे ऋंघायमाणमिन्वत:।"[६] पण तो अन्तोदात्त सिद्ध व्हावा म्हणूनच 'घृतादिगणपठित' मानला जातो. तसेच या सूत्रात अकारान्त सर्वनामांना आद्युदात्त घोषित केल्यामुळे अन्य 'त्यदादिगणपठित' सर्वनामे 'फिषोऽन्त उदात:'[७] या प्रातिपादिकस्वराने अन्तोदात्त होतात. त्यद्, यद्, तद् वगैरे एकाच् असल्यामुळे इतके स्पष्टपणे कळत नाही; पण 'इदम्, युष्मद्, अस्मद्' सर्वनामे सिद्ध करताना ती अन्तोदात्त आढळतात. उदा. "इमे सुता उप."[८], "अस्मभ्यंमप्रतिष्कुत:।"[९], "वयं महाधन इन्द्र."[१०]

थोडक्यात, फिट् सूत्रांनी प्रातिपदिकांच्या स्वरांची प्राथमिक माहिती दिलेली दिसून येते. तसेच या प्राथमिक माहितीच्या मदतीने पुढे विशेष नियम पाणिनीय सूत्रांनी दिलेले आहेतच. तसेच अव्युत्पन्न प्रातिपदिकांच्या स्वरसिद्धी मोठी व्यवस्था लावलेली असल्यामुळे फिट्सूत्रांचे स्वरसिद्धीमध्ये एक स्वतंत्र स्थान दिले पाहिजे. कारण फिट्सूत्रांच्या ज्ञानाशिवाय अनेक शब्दांचे प्रकृतिस्वर सिद्ध करता येणार नाहीत. तेव्हा फिट्सूत्रे ही स्वरसिद्धीस उपकारकच आहेत.

---

१ उपसर्गाश्चाभिवर्जम् । फि. सू. ४।१३
२ ऋ. सं. १।१९।९
३ स्वाङ्गशिटामदन्तानाम् । फि. सू. २।६
४ पा. सू. १।१।२७
५ ऋ. सं. १।३।८
६ ऋ. सं. १।१८८।८
७ फि. सू. १।१
८ ऋ. सं. १।२।४
९ ऋ. सं. १।७।६
१० ऋ. सं. १।७।५

जरी फिट् सूत्रांची विषय मर्यादा प्रातिपदिक स्वरापुरती असली, तरी त्यांचे स्वरसिद्धीतील स्थान अमान्य करता येणार नाही. कारण ती पाणिनीय सूत्रांना पुरक ठरतात आणि त्यामुळेच ती पाणिनींनी रचलेली नसली तरी पाणिनीय संप्रदायातील आहेत, असे मानता येईल.

### १.८ उणादिसूत्रे व स्वरसिद्धी -

शब्द हे दोन प्रकारचे मानले जातात - १) रूढ व २) यौगिक. रूढ शब्दांनाच 'अव्युत्पन्न' असे आणि यौगिक शब्दांना 'व्युत्पन्न' असे नाव दिलेले आहे. व्युत्पन्न शब्द हे प्रकृति-प्रत्यय संबंधाने सिद्ध केले जातात, तर 'अव्युत्पन्न' शब्द आहेत तसेच ग्राह्य असतात. हे दोन संप्रदाय अत्यंत पुरातन असल्याचे दिसते. निरुक्त काळात व त्यापूर्वी या दोन्ही संप्रदायांचे समर्थक आचार्य होते, जे आपापल्या पक्षांचे अनेक प्रकारे समर्थन करीत. त्यामध्ये निरुक्ताचे सिद्धान्त मानणारे व शाकटायनाचार्य हे सर्व शब्दांना व्युत्पन्न व नामांना आख्यातज म्हणजे धातूपासून उत्पाद्य मानतात[१]. तर दुसरे काही वैयाकरण व आचार्य गार्ग्य सर्वच नामांना आख्यातज मानीत नव्हते[२]. पाणिनी मात्र समन्वयवादी आचार्य होते, म्हणून त्यांनी दोन्ही संप्रदायांना आश्रय दिलेला आढळतो.

व्युत्पन्नवादी संप्रदायाच्या समर्थकांनी उणादिसूत्रांची रचना केलेली आहे. 'उण्' हा प्रत्यय पहिल्या प्रथम सांगितला आहे. म्हणून ती 'उणादिसूत्रे' म्हणून ओळखली जातात. पाणिनी या उणादिसूत्रांचे जाणकार होते, हे त्यांच्या 'उणादयो बहुलम्'[३] या इतर सूत्रांवरून स्पष्ट होते[४]. तरीही या 'उणादिसूत्रांचा' रचयिता कोण, या विषयी विद्वज्जनांमध्ये एकमत दिसत नाही. जसे - प्रा. के. बी. पाठक यांनी उणादिसूत्रे पाणिनीय असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे[५]. तर त्यांचे मत एकांगी असून त्याचे खंडन जी. एस. पडे यांनी केलेले

---

१ "नामानि आख्यातजानि, इति शाकटायनः नैरुक्तसमयाश्च" निरू. १।४।१

२ "न सर्वाणि, इति गार्ग्यः वैयाकरणानां चैके।" पहा. निरू. १।४।१

३ पा. सू. ३।३।१

४ इतर पाणिनीय सूत्रे-भूतेऽपिदृश्यन्ते।३।३।२, ताभ्यामन्यत्रोणादयः।३।४।७५, इस्मन्त्रन्क्विषु च।६।४।९७, तितुमतथसिसुरकसेषु च।७।२।९ हे उणादिप्रत्यायां सदृश्य आहेत.

५ "Authorship of the Unadi Sutras", Annals of Bhandarkar Orientel Research Institute, Poona, IV, 1923, Pg. No. 111-136.

दिसते[१]. याशिवाय के. माधवकृष्ण शर्मा[२] व लुई रेनू[३] यांनी प्रा. पाठक यांच्या मतांचे खंडन करून उणादिसूत्रे पाणिनीची रचना नाही, हे सिद्ध केलेले आहे.

उणादिसूत्रांचे दोन पाठ उपलब्ध होतात - १) पंचपादी २) दशपादी. पंचपादी उणादिपाठात पहिला प्रत्यय 'उण्' हाच आहे[४] तर दशपादीचा पहिला प्रत्यय 'अनि' हा आहे[५] आणि 'उण्' हा प्रत्यय १।८६ क्रमांकाच्या सूत्रात पठित आहे. शिवाय दशपादी उणादिसूत्रपाठाचा आधार पंचपादी सूत्रपाठच आहे. दशपादी उणादिपाठाचे संकलन शब्दांच्या शेवटच्या वर्णानुक्रमाने करण्यात आलेले आहे. उदा. प्रथम पाद[६] - इकारान्त, ईकारान्त, उकारान्त, ऊकारान्त; द्वितीय पाद[७] -ऋकारान्त, ऐकारान्त, ओकारान्त, औकारान्त इ. प्रमाणे वर्णानुक्रमे आढळते. तसेच हे संकलन पंचपादीच्या पादांच्या क्रमानुसारही केलेले आहे. उदा. उकारान्त प्रत्ययांचे संकलन पंचपादीच्या क्रमाने आहे. 'कृवापाजिमि. उण्'[८] (पं.उ.सू.१/१), 'कृहृभ्यामेणुः'[९] (पं.उ.सू.२/१)', 'यजिमनिशुन्धि. युच्'[१०] (पं.उ.सू.३/२०), 'अर्त्तेररुः'[११] (पं.उ.सू.४/८०), 'तनोतेर्डउः सन्वच्च'[१२] (पं.उ.सू.५/५२) याप्रमाणे येथे अनुक्रमे 'उण्', 'एणु', 'युच्', 'अरुः' व 'डउ' असे प्रत्यय संकलित करून 'कारु', 'करेणुः', 'यज्यु', 'अररुः', आणि 'तितउः' असे उकारान्त शब्द सिद्ध होतात.

---

१ Journal of Orientel Institute, Barady 1958, Pg. No. XVII - XIX

२ Festschrift, P. V. Kane, Pg. No. 395-404

३ J. Asiatique, 1956, Vol. 244, Pg. No. 155-165

४ कृवापाजिमिस्वदिसाध्यशूभ्य उण् । पं. उ. सू. १।१

५ अशवतृभ्योऽनिः । द. पा. उ. सू. १।१

६ प्रथम पाद-हा 'अशवतृभ्योऽनिः । द. पा. उ. सू. १.१' पासून 'भ्रमेश्च डुः । द. पा. उ. १।१७७' पर्यंत आहे. यात इकारान्त-सू. १।१ ते ८१ ईकारान्त- सू. १।८२ ते १।८५; उकारान्त- सू. १।८६ ते १।१६३; ऊकारान्त- सू. १।१६४ ते १।१७७

७ द्वितीयपाद-'तृन्तृचौ.। द. पा. ३.२।१ ते च्विरव्ययम् । द. पा. उ. २।१३ पर्यंत आहे. यात ऋकारान्त- सू. २।१ ते २।९, ऐकारान्त- सू. २।१०, ओकारान्त- सू. २।११, औकारान्त- सू.२।१२, १३

८ द. पा. उ. सू. १।८६

९ द. पा. उ. सू. १।१३३

१० द. पा. उ. सू. १।१३४

११ द. पा. उ. सू. १।१५५

१२ द. पा. उ. सू. १।१६०

पण याचबरोबर दशपादी उणादिसूत्रात अशी ही काही सूत्रे आहेत, जी पंचपादीमध्ये आढळत नाहीत. त्यामुळे ती सूत्रे दशपादीची स्वतंत्र निर्मिती आहे. उदा. 'भुवोऽनिच्'[१], ''जीवे रदानुक्'[२], 'दृणातेर्घक् च'[३], 'गलेरुच्चोपधायाः'[४] या सूत्रांनी अनुक्रमे 'भवनिः', 'जीरदानुः', 'दीर्घः', आणि 'गुल्मः' असे शब्द सिद्ध होतात.

तेव्हा पंचपादी व दशपादी यांच्या बाबतीत असा एक निर्णय करता येतो की, दशपादीचा आधार पंचपादी आहे हे स्पष्टच आहे. तेव्हा पंचपादीचा प्राच्यपाठ अत्यंत प्रामाणिक मानला जातो. त्यामुळे त्यांनी शब्दांची सिद्धी देऊन ज्या शब्दांची सिद्धी केवळ दशपादीनेच होते तेथेच दशपादीचा स्वीकार करणे योग्य वाटते.

स्वरसिद्धीच्या दृष्टीने उणादिसूत्रांचा विचार करता असे लक्षात येते की, उणादिकारांनी पाणिनीय स्वरप्रक्रियेस पुरक अशी सूत्रे बनविली आहे. अर्थात पाणिनीय व्याकरणात जे काही अनुबंध लावून विशिष्ट स्वरादिक कार्ये साधली जातात, तशीच कार्ये उणादिसूत्रांनी सुद्धा साधली जावीत अशा प्रकारे रचना आढळते. उदा. 'इगुपधात् कित्'[५] या सूत्राने इक् म्हणजे इ. उ. ऋ. लृ. या स्वरोपान्त धातूहून 'इन्' असा कित् प्रत्यय सांगितला. त्यामुळे 'क्ङिति च'[६] या पाणिनीय सूत्राने गुणनिषेध 'नित्' सांगितल्यामुळे 'ञ्नित्यादिर्नित्यम्'[७] सूत्राने आद्युदात्त होतात. जसे.-''ऋषिभिरीड्योनूतनैः.''[८] येथे 'ऋषि' शब्द आद्युदात्त आहे. शिवाय 'अर्तिस्तुसुहु.'[९] या उणादिसूत्राने 'मन्' असा प्रत्यय सांगितला आहे. ज्याच्या नित्त्वामुळे तो आद्युदात्त होतो. उदा. ''सोमा अरंकृता तेषां''[१०] किंवा ''कवी नो मित्रावरुणा.''[११] या उदाहरणातील 'कवि' शब्द 'अच इः'[१२] या उणादिसूत्राने अजन्त धातू '√कु शब्दे' या

१ द. पा. उ. सू. १।९
२ द. पा. उ. सू. १।१६३
३ द. पा. उ. सू. ३।७१
४ द. पा. उ. सू. ७।३२
५ पं. उ. सू. ४।१२१
६ पा. सू. ४।१।५
७ पा. सू. ६।१।१९७
८ ऋ. सं. १।१।२
९ पं. उ. सू. १।१४०
१० ऋ. सं. १।२।१
११ ऋ. सं. १।२।९
१२ पं. उ. सू. ४।१४०

'अदादिगणस्थ' धातूहून 'इ' हा प्रत्यय करून सिद्ध होतो. जेथे 'इ' प्रत्यय अनुबंधरहित असल्यामुळे 'आद्युदात्तश्च''[१] सूत्राने अन्तोदात्त सिद्ध होतो. तसेच केवळ वेदातच आढळणारे शब्द जसे- धेना[२], आरुजत्नु[३], उक्त्थ[४], वाश्र[५], अज्म[६] इ. शब्द अनुक्रमे 'धेट इच्च''[७] ने आद्युदात्त; 'कृहनिभ्यां कत्नुच्''[८] ने अन्तोदात्त; 'पातृतुदिवचिरिचि.'[९] ने अन्तोदात्त; 'स्फायितञ्चि.''[१०] ने अन्तोदात्त; आणि 'अर्तिस्तुसुहु.''[११] ने आद्युदात्त सिद्ध होतात. अशा अनेक शब्दांबाबत उणादिसूत्रे उपयोगी ठरतात. यावरून स्पष्ट होते की, उणादिसूत्रांच्या सहाय्याने अनेक रूढ व यौगिक अशा दोन्ही शब्दांची सोपपत्तिक स्वरसिद्धी देता येते. पण या विषयास देखील फिट्सूत्रांप्रमाणे 'प्रातिपदिक' याची मर्यादा आहे. उणादिसूत्रांनीही केवळ प्रातिपदिकस्वराचीच सिद्धी होते. तेव्हा असे म्हणता येईल, जेव्हा प्रातिपदिकस्वर सिद्ध करावयाचा असेल, तेव्हा प्रथम पाणिनीय सूत्रे, उणादिसूत्रे वा रूढ समजून फिट्सूत्राने तो स्वरसिद्ध केला जाईल. उदा. ''वीळुचिंदारुजत्नुभि.''[१२] या मंत्रातील 'वीळु'[१३] शब्द पाणिनीय सूत्रांनी व उणादिसूत्रांनी स्वरसिद्ध होत नाही; तर तो रूढ मानून फिट् सूत्राने अन्तोदात्त[१४] सिद्ध करावा लागतो. थोडक्यात, प्रातिपदिक जर व्युत्पन्न असेल तर निश्चित उणादिसूत्रांनी त्याची स्वरसिद्धी करणे सोपे जाते. त्यामुळे स्वरसिद्धीचा अभ्यास करताना पाणिनीय स्वरविषयक सूत्रांबरोबर उणादिसूत्रे पुरक ठरतात, हे लक्षात ठेवले पाहिजे.

---

१ पा. सू. ३।१।३
२ पहा.- ''धेना जिगाति दाशुषे'' । ऋ. सं. १।२।३
३ पहा.- ''आरुजत्नुभिर्गुहा.'' । ऋ. सं. १।६।५
४ पहा.- ''उक्थमिन्द्राय शंस्य.'' । ऋ. सं. १.१०.५
५ पहा.- ''वाश्रा अभिज्ञु यातवे'' । ऋ. सं. १।३७।१०
६ पहा.- ''येषामज्मेषु पृथिवी.'' । ऋ. सं. १।३७।८
७ पं. उ. सू. - ३।११
८ पं. उ. सू. - ३।३०
९ पं. उ. सू. - २।७
१० पं. उ. सू. - ३।१३
११ पं. उ. सू. - १।१४०
१२ ऋ. सं. १।६।५
१३ 'वीळु' या शब्दाचा अर्थ 'बल' असा आहे. हा शब्द वैदिक शब्दसंग्रह जो 'निघण्टु' यामध्ये बलनामांमध्ये पठित आहे. पहा.- ''निघ. दक्ष-वीळु-च्यौत्नम् इ. निघ. २।९।१५''
१४ फिषोऽन्त उदात्तः। फि. सू. १।१।

## १.९ पाणिनीयेतर व्याकरण व स्वरविवेचन -

आता पर्यंत पाणिनीय व्याकरण व त्यास पुरक अशा कात्यायनीय वार्तिक, उणादिसूत्रे, फिट्सूत्रे यांचे स्वरसिद्धीमध्ये असणारे स्थान, त्यांच्या उपस्थितीमुळे होणारी स्वरसिद्धता याचा सविस्तर परामर्श घेतला. पण हे सर्व पाणिनीय संप्रदायास अनुकूल होते. तेव्हा आता पाणिनीयेतर व्याकरणात स्वरविवेचनास स्थान होते का याचा विषयाच्या अनुषंगाने शोध घेणे गरजेचे वाटते.

पाणिनीहून पूर्वाचार्य व त्यांचे ग्रंथ आणि अर्वाचीन वैयाकरण व त्यांचे ग्रंथ असे दोन भाग पाणिनीयेतर व्याकरण संप्रदायाचे करावे लागतील. सर्वविश्रुतच आहे की, पाणिनी पूर्वी अनेक वैयाकरण होऊन गेले. खुद्द पाणिनींनीच दहा पूर्ववर्ती वैयाकरणांचा उल्लेख केलेला आहे. ज्यांच्या पूर्वी संदर्भानुसार निर्देश करण्यात आलेला होता. पण याचबरोबर प्रा. बर्नेल यांनी पाणिनीहून पूर्वी ८५ वैयाकरण होऊन गेले असे प्रतिपादन केले आहे. त्यांच्या मते, १० वैयाकरणांचा नामोल्लेख स्वत: पाणिनीय व्याकरणातच आहे, तर १६ आचार्यांचा उल्लेख वेगवेगळ्या प्राचीन ग्रंथामध्ये आढळतो. याशिवाय प्रातिशाख्य ग्रंथ व इतर वैदिक व्याकरणांत मिळून एकूण ५९ आचार्यांचा उल्लेख करता येतो[१]. याप्रमाणे पाणिनीच्या पूर्ववर्ती ८५ वैयाकरणांची गणती करता येते.

त्यापैकी ऐन्द्र व्याकरणादिक पाणिनीय पूर्ववर्ती व्याकरणांचा विचार करू -

### अ) पाणिनीय पूर्ववर्ति - व्याकरण -

१) **ऐन्द्रव्याकरण** - ऐन्द्र व्याकरणाचे कर्ता 'इन्द्र' यांच्या विषयी अधिक माहिती उपलब्ध होत नाही. पण ऐन्द्र व्याकरणाचा पाठ हा २५ हजार श्लोकात्मक होता, असे तिबेटी लेखकांच्या मते स्पष्ट होते[२]. अल्बेरुनी यांनीही ऐन्द्र-व्याकरणाचा उल्लेख केलेला आढळतो[३]. पण आज मात्र ऐन्द्र-व्याकरण उपलब्ध होऊ शकत नाही. पण या ऐन्द्र व्याकरणाचा प्रभाव मात्र अनेक काळ राहिलेला दिसतो. जसे, जैन शाकटायन[४] व्याकरणावर, दुर्गाचार्यांच्या[५] निरुक्त व्याख्येत, सरस्वती-कण्ठाभरणात[६] 'इंद्र' व 'ऐन्द्रव्याकरण' यांचा उल्लेख आढळतो.

---

१ 'Aindra School of Sanskrit Grammariomns' by A. C. Burnel, Pg. No. 4, 5

२ Journal of Ganganath Jha Research Institute, Vol-I, Ed. 4, Pg. No. 410

३ 'अल्बेरुनी का भारत', भाग २, पृ. ४०

४ पहा. जै. शा. व्या. १।२।३७

५ ''नैकं पदजातं, यथार्थ: पदमैन्द्राणाम्'' निरुक्त - दुर्गाचार्य वृत्ति-

६ 'Aindra School of Sanskrit Grammarians' by A. C. Burnel, Pg. No. 8

२) **भारद्वाज व्याकरण** - भारद्वाज व्याकरणाचे कर्ता भरद्वाज, जे आंगिरस बृहस्पतीचे पुत्र होते, असे मीमांसकांचे मत आहे[१]. इंद्राने भरद्वाजांना घोषवर्ण व उष्माण वर्ण यांचा उपदेश केल्याचा उल्लेख ऐतरेय आरण्यक ग्रंथात केलेला आहे[२]. पण भरद्वाजांचे व्याकरण अनुपलब्ध आहे.

३) **भागुरि व्याकरण** - 'अप' व 'अपि' या उपसर्गाच्या अकाराचा व हलन्त शब्दांच्या आप् प्रत्ययाचा लोप होतो, असे भागुरि आचार्यांचे मत न्यास[३], प्रक्रिया कौमुदी[४] ग्रंथामध्ये एका श्लोकाद्वारे उल्लेखित आहे. त्यावरून 'भागुरि व्याकरण' देखील अस्तित्वात असावे, जे आज उपलब्ध होत नाही.

४) **पौष्करसादि व्याकरण** - पौष्करसादीचा पाणिनींनी प्रत्यक्ष उल्लेख केलेला आढळत नाही. पण 'पौष्करसादि' हा शब्द 'न तौल्वलिभ्यः'[५] या सूत्रातील तौल्वलिगणात पठित आहे; तर 'पुष्करसद्' पद 'यस्कादिभ्यो गोत्रे'[६], 'बाह्वादिभ्यश्च'[७] आणि 'अनुशतिकादीनां च'[८] या पाणिनीय सूत्रातील गणपाठात पठित आहे. याशिवाय महाभाष्यकारांनी 'नादिन्याक्रोशे पुत्रस्य'[९] या सूत्रावरील वार्तिकात उल्लेख केलेला, तो असा 'चयो द्वितीया शरि पौष्करसादेः'[१०] या वार्तिकानुसार तरी 'पौष्करसादि' हे वैयाकरण असून त्यांचेही स्वतंत्र व्याकरण असावे. एवढेच स्पष्ट होते.

५) **चारायण- व्याकरण** - चारायण आचार्यांसंबंधी व्याकरणासंबंधी एखादे वचन उपलब्ध नाही. पण महाभाष्यात पाणिनी, व्याडी यांच्याबरोबर उल्लेख करण्यात आलेला आहे.

---

१ सं. व्या. शा. इति. भाग १, युधिष्ठिर मीमांसक, पृ. ९०
२ पहा. ऐ. आ. २.२.४
३ न्यास ६।२।३७; धातुवृत्ति, पृ. २४७
४ प्रक्रिया कौमुदी, भाग १, पृ. १८२
५ पा. सू. २।४।६१
६ पा. सू. २।४।६३
७ पा. सू. २।४।९६
८ पा. सू. ७।३।२०
९ पा. सू. ८।४।४८
१० म. भा. ८.४.४८, वा. ३

'कम्बलचारायणीया' असा उल्लेख आहे[१]. कृष्णयजुर्वेदाची चारायणीय शाखा होती, जिचे 'चारायणीय प्रतिशाख्य' जे आज उपलब्ध नाही. पण लौगाक्षि - गृह्यसूत्राचे व्याख्याकार देवपाल यांनी 'तया च चारायणीय सूत्रम्' असे म्हणून चारायणीय सूत्र उद्धृत केले आहे[२].

६) **काशकृत्स्न-व्याकरण** - पाणिनीहून पूर्ववर्ती वैयाकरणांमध्ये काशकृत्स्न याचे नाव अतिशय प्रसिद्ध आहे. 'काश्यकृत्स्न' व्याकरण होते. याचा उल्लेख महाभाष्यकारांनी 'प्रोक्तादयश्च तद्धिता:' या वार्तिकाच्या भाष्यांत 'पाणिनिना प्रोक्तं पाणिनीयम्, आपिशम्, काशकृत्स्नमिति' असा केलेला आहे[३]. 'त्रिकं काशकृत्स्नम्' असा काशिकावृत्तीत उल्लेख आहे[४], तर जैन शाकटायनाच्या अमोघवृत्तीत हेच उदाहरण 'त्रिकं काशकृत्स्नीयम्' असे आहे[५]. यावरून काशकृत्स्न व्याकरण तीन अध्यायांनी युक्त असावे. याशिवाय काशकृत्स्नरचित सूत्रांमध्ये प्रत्ययांचे अनुबंध व विकरणांच्या उदात्तादिक स्वरांवर लक्ष देण्यात आलेले होते. त्यावरून असा अंदाज काढला आहे, की त्याकाळी लौकिक भाषेतही स्वर निर्देश होत असावा, असे मीमांसकांनी मत मांडले आहे[६]. त्यावरून असे म्हंटता येईल की, काशकृत्स्न व्याकरणातही उदात्तादिक स्वराचा विचार मांडला गेला होता.

अशा प्रकारे येथे पाणिनीच्या पूर्वीच्या आचार्यांपैकी काही जणांच्या व्याकरणाचा परामर्श घेण्यात आला. पण बरेच ग्रंथ अनुपलब्ध असल्यामुळे वैदिक स्वरप्रयोगाविषयी सबळ पुरावे देता येत नाही. तरी पाणिनींनी स्वयं उल्लेखित १० वैयाकरणांपैकी काश्यप, गार्ग्य व गालव या तीन वैयाकरणांच्या व्याकरणात उदात्तादिक स्वरांचा विचार मांडलेला असावा, असे म्हणता येईल; कारण 'नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम्'[७] असा स्पष्ट स्वरविषयक उल्लेख आहे.

---

१ पहा. - म. भा. १.१.७३
२ लौगाक्षि गृह्यसूत्र ५।१, यावरील व्याख्या
३ पहा. - म. भा. पस्पशाह्निकम्, १ वा.
४ का. वृ. ५।१।८५
५ जै. शा. व्या. अमोघवृत्ती, ३।२।१६१
६ मीमांसक, वही, भाग २, पृ. ३४, ३५
७ पा. सू. ८/४/६७

**ब) अर्वाचीन व्याकरण ग्रंथ :-**

इंद्र, भरद्वाज, भागुरी वगैरे वैयाकरणांच्या ग्रंथांच्या अनुपलब्धीमुळे पाणिनीय पूर्ववर्ती व्याकरणातील स्वरविवेचन होते की, नाही याविषयी सविस्तर विचार मांडता येत नाही. किंबहुना जेवढी माहिती उपलब्ध होऊ शकते, त्या आधारे उपरोक्त विवेचन केले. आता पाणिनीच्या उत्तरवर्ती कालखंडातील अर्वाचीन वैयाकरणांनीही व्याकरणाची रचना केलेली आढळते. त्यामध्ये कातंत्र व्याकरण, चांद्र व्याकरण, जैन-शाकटायन व्याकरण, सरस्वती कंठाभरण, हैमशब्दानुशासन वगैरे व्याकरण ग्रंथांचा समावेश होतो. त्यातील स्वरविषयक विवेचनावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला जाईल.

१) **कातन्त्र व्याकरण :-** पाणिनीय परंपरेबाहेरील व्याकरण संप्रदायांमध्ये कातंत्र संप्रदाय प्राचीन मानला जातो. यालाच 'कालाप' आणि 'कौमार' म्हंटले जाते. महाभाष्यानुसार 'अद्यतनी', 'श्वस्तनी', 'भविष्यन्ती' वगैरे प्राचीन आचार्यांनी व्यवहारात आणलेल्या संज्ञा होत्या. आणि याच संज्ञा कातंत्र-व्याकरणात आढळतात. तेव्हा या कातंत्र व्याकरणाच्या प्राचीन परंपरेच्या पोषक असलेल्या आढळतात.

कातंत्र-व्याकरणाची रचना पाणिनीय रचना पद्धतीहून पूर्णपणे भिन्न आहे. यामध्ये केवळ लौकिक शब्दांची सिद्धी साधण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. काही ठिकाणी वैदिक शब्दसिद्धी केली असली, तरी ते शब्द कातंत्र-व्याकरणाच्या दृष्टीने लौकिकच आहेत. तेव्हा स्वरप्रक्रियेचा विचार येथे दूरच राहतो.

२) **चान्द्रव्याकरण :-** व्याकरणशास्त्रात मौलिभूत रचना असलेल्या 'मुनित्रय-व्याकरणावर' आलोचनात्मक टीका-टिप्पण्यांचा काळ साधारणपणे ४०० वर्षे चालू राहिला. पण पुढे महाभाष्याची सर्वथा उपेक्षा होऊ लागली. त्यावेळी 'व्याकरणागमा'चा उद्धार करण्यासाठी 'चंद्राचार्य' किंवा 'चन्दगोमी'[१] व त्यांचे शिष्य यांनी पुन्हा व्याकरणाचा प्रचार व प्रसार सुरू केला. चंद्रगोमी यांनी महाभाष्याचा उद्धार तर केलाच, पण त्याबरोबर 'चान्द्रव्याकरण' नावाने प्रसिद्ध पावलेल्या व्याकरणाची रचनाही केली.

---

१ पहा. राजतरङ्गिणी, १.१०५,

चांद्र-व्याकरण पूर्णपणे व्याकरणत्रयी 'पाणिनी-कात्यायन-पतंजली' यांच्या 'सूत्र-वार्तिक-भाष्य' यावर आधारित आहे. या व्याकरणात ६ अध्याय असून चार-चार पाद आहेत. तसेच सूत्रसंख्या ३०९९ आहे. चंद्रवृत्तीनुसार या व्याकरणाचे वैशिष्ट्य असे की यामध्ये पारिभाषिक संज्ञेचा प्रयोग नाही[१] आणि स्वरप्रक्रिया व वैदिकी प्रकिया यांनाही स्थान नाही.

तरी मीमांसकांनी चान्द्रवृत्तीच्या काही विशेष वचनांचा उल्लेख केलेला आहे, जो स्वरविवेचनावर प्रकाश झोत टाकणारा आहे. उदा. "तव्यस्य वा स्वरितत्वं वक्ष्याम:"[२], "जनिवधोरिगुपान्तानां च स्वरं वक्ष्याम:"[३], 'ओदनाट् ठट्" यावरील व्याख्येत स्पष्टपणे 'स्वरं तुं वक्ष्याम"[४] असे म्हटले आहे, तर "अनौ वस इति प्रतिषेधान्नाद्युदात्तत्वम्"[५].

चान्द्रवृत्तीत 'स्वरविशेषमष्टमे वक्ष्याम:'[६] असा स्पष्ट उल्लेख आठव्या अध्यायाच्या अस्तित्वाला, स्वरप्रक्रियेला पुष्टी देणारा आहे. चान्द्रपरिभाषापाठात 'स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत्'[७] अशी स्वरविषयक परिभाषा दिलेली आहे. यावरून स्पष्ट होते की, चान्द्रव्याकरणात आठ अध्याय असावेत, पुढील काळात अंतिम दोन अध्याय लुप्त झाले आणि त्याचबरोबर स्वरप्रक्रिया देखील विलुप्त झाली.

३) **जैनेन्द्र व्याकरण** :- आचार्य देवनंदी किंवा पूज्यपाद किंवा जिनेन्द्रबुद्धी यांनी जैनेन्द्र व्याकरणाची रचना केली[८]. जैनेन्द्रबुद्धी किंवा जिनेन्द्रबुद्धी यांची रचना असल्यामुळे त्यास 'जैनेन्द्र व्याकरण' हे नाव पडले आहे. या व्याकरणाचे दोन पाठ उपलब्ध आहेत. (१) अभयनंदी महावृत्ति-युक्त लघुपाठ (औदिच्य), (२) गुणनंदी संस्कारित बृहत्पाठ (दाक्षिणात्य).

---

१ पहा.-'चन्द्रोपज्ञमसंज्ञकं व्याकरणम्', चान्दवृत्ति, ली बिख, सू. क्र. २।२।६८ पृ. क्र. १३४,
२ चा. वृ. १।१।१०५
३ चा. वृ. १।१।१८
४ चा. वृ. ३।४।६८
५ चा. वृ. १।१।१३४
६ चा. वृ. १।१।१४५
७ चा. परि. पा. ८६
८ पहा. मीमांसक, भाग १, २ री आवृ., पृ. ५३२-५३३

१) **जैनेन्द लघुपाठ (औदिच्य)** – या लघुपाठात ५ अध्याय आहेत, व ३०३६ सूत्रे आहेत. यामध्ये पाणिनीय सूत्रांचाच आधार मानून सूत्रांची रचना करण्यात आलेली आहे. अभयनंदीने रचलेल्या 'महावृत्ति' मध्ये अनेक वार्तिके आढळतात. आणि हीच प्रत देवनंदीची मूळ रचना असावी, असे वाटते.

या लघुपाठात अनेक अल्पाक्षर कृत्रिम संज्ञा तयार केलेल्या आहेत. उदा. एप्[१] (गुण), दः[२] (आत्मनेपद), दि[३] (प्रगृह्य), बम्[४] (बहुव्रीही), षम्[५] (तत्पुरुष), ह[६] (अव्ययीभाव), इ. परंतु या संज्ञांमुळे जैनेन्द्र-व्याकरण अधिकच क्लिष्ट झाले आहे. जैनेन्द्रव्याकरणाचा मूळ आधार पाणिनीय व्याकरणच असल्यामुळे अष्टाध्यायीप्रमाणे येथेही 'पूर्वत्रासिद्धम्'[७] हे सूत्र आहे, जे आरंभीच्या साडे पाच अध्यायां प्रति अंतिम २ पादांना असिद्ध ठरविते.

याशिवाय कात्यायनीय वार्तिके व पतंजलीच्या इष्टींच्या मदतीने नवीन शब्दसिद्धी करण्यासाठी नवीन सूत्रेही निर्माण केलेली आहेत.

**जैनेन्द्र-बृहत्पाठ (दाक्षिणात्य)**

देवनंदीच्या सूत्रांनी संस्कृतमधील सर्वच शब्दप्रयोगांची सिद्धता होत नाही, असे लक्षात येताच गुणनंदी याने जैनेन्द्र-व्याकरणावर संस्कार केले व साधारणपणे ३७०० सूत्रांचा बृहत्पाठ निर्माण केला[८]. जो पुढे 'शब्दार्णव' नावाने प्रसिद्ध झाला. हा पाठ शाकटायन व्याकरणाने प्रभावित आहे. यावर सोमदेवसूरि रचित 'शब्दार्णवचन्द्रिका' व 'शब्दार्णवप्रक्रिया' अशा दोन टीका उपलब्ध आहेत.

जैनेन्द्र व्याकरणाच्या दोन्ही पाठांचा साकल्याने विचार केला तर असे लक्षात येते की, जैनेन्द्र व्याकरणास आधारभूत पाणिनीय व्याकरण असले तरी अष्टाध्यायीमध्ये सहाव्या व

---

१ जै. व्या. सू. १।१।१६
२ जै. व्या. सू. १।२।१५१
३ जै. व्या. सू. १।१।२०
४ जै. व्या. सू. १।३।८६
५ जै. व्या. सू. १।३।१९
६ जै. व्या. सू. १।३।४
७ जै. व्या. सू. ५।३।२७ तुल्य पा. सू. ८।२।१
८ 'वेदाङ्ग', कुंदनलाल शर्मा, पृ. क्र. ४५४

आठव्या अध्यायात मिळून सुमारे ४०० सूत्रांनी जी स्वरप्रक्रिया सांगितलेली आहे, तिच्यावर या दोन्ही पाठांमध्ये विचार करण्यात आलेला नाही.

तरी काही ठिकाणी स्वर उल्लेख आढळतो. जसे - 'उच्चनीचावुदात्तानुदात्तौ'[१], 'व्यामिश्रः स्वरितः'[२] या दोन सूत्रांनी उदात्त, अनुदात्त व स्वरित या संज्ञा सांगितल्या आहेत. तसेच 'ङनुदात्तेतो दः'[३], 'ञस्वरितेत कर्त्राप्ये फले'[४] व 'स्वरितेनाधिकारः'[५], 'अनुदात्ते तोऽयसूददीपदीक्षो हऽदेः'[६], 'एकाचोऽनुदात्तात्'[७] या पाच सूत्रात फक्त स्वरित, अनुदात्त यांचा शब्दप्रयोग आला आहे. तसेच येथे पाणिनीय सूत्रात उदात्तादिक स्वरांचा विशेष प्रयोग सांगितला आहे, अशी सूत्रे जैन व्याकरणात उद्‌धृत करताना तो उदात्तादिक स्वरोल्लेख गाळला आहे. उदा. 'यासुण्यो ङित्'[८], 'वृषाकप्यग्निकुसितकुसीदात्'[९], 'लुङ् लङ्‌लृङ्‌यट्'[१०], 'वाक्यस्य टेः पः'[११], येथे ही सूत्रे पाणिनीय सूत्रांशी अत्यंत समान आहेत; पण यातील उदात्तादिक स्वर उल्लेख वगळला आहे. यावरून स्पष्ट होते की, 'वैदिक स्वर विवेचन' या विषयास हातच लावण्यात आलेला नाही. केवळ लौकिक शब्दसिद्धीचाच विचार केला आहे.

४) **जैन शाकटायन व्याकरण :-**

जैन शाकटायन व्याकरणाचे रचयिता पाल्यकीर्ती होते[१२]. या व्याकरणात जैनेन्द्र व्याकरणातील त्रुटी भरून पूर्तता करण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. यामध्ये ४ अध्याय आहेत व सूत्रसंख्या ३२३६ आहे. या व्याकरणात पाणिनीय तंत्राचा पुरेपूर वापर करण्यात आलेला आहे. यात वार्तिके व इष्टींची वेगळी गरज उरलेली नाही; कारण सर्वकाही सूत्रांमध्ये

---

१ जै. व्या. सू. १।१।१३ = उच्चैरुदात्तः, नीचैरनुदात्तः पा. सू. १।२।२९-३०
२ जै. व्या. सू. १।१।१४ = समाहारः स्वरितः।१।२।३१
३ जै. व्या. सू. १।२।६१ = अनुदात्तङित आत्मनेपदम्। पा. सू. १।३।१२
४ जै. व्या. सू. १।२।६८ = स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले। पा. सू. १।३।७२
५ जै. व्या. सू. १।२।५ = पा. सू. १।३।११
६ जै. व्या. सू. २।२।१३१ = पा. सू. ३।२।१४९
७ जै. व्या. सू. ५।१।११५ = पा. सू. ७।२।१०
८ जै. व्या. सू. २।४।८४ = पहा. तुल्य. = यासुट्परस्मैपदेषूदात्तोङिच्च। पा. सू. ३।४।१०३
९ जै. व्या. सू. ३।१।४० = वृषाकप्यग्निकुसितकुसीदानामुदात्तः। पा. सू. ४।१।३७
१० जै. व्या. सू. ४।४।७० = लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः। पा. सू. ६।४।७१
११ जै. व्या. सू. ५।३।९० = वाक्यस्य टेः प्लुतः उदात्तः। पा. सू. ८।२।८२
१२ सं. व्या. शा. इति. मीमांसक, भाग १, पृ. ५४७-५४८

संकलित करण्यात आलेले आहे. या सूत्रांवर स्वत: शाकटायनाने वृत्ती लिहिलेली असून ती 'अमोघवृत्ती' नावाने प्रसिद्‌ध आहे.

लौकिक व्याकरणावरच आधारित व्याकरण असल्यामुळे वैदिक व्याकरण वा स्वर प्रक्रियेचा समावेश नाही.

५) **सरस्वती-कण्ठाभरण :-**

इ. स. ११ व्या शतकात भोजदेव यांनी 'सरस्वती कण्ठाभरण' या व्याकरण ग्रंथाची रचना केली. ही रचना व्याकरण ग्रंथांमधील अत्यंत विशाल व विस्तृत अशी आहे. सरस्वती कण्ठाभरणात भोजदेवाने वार्तिके, महाभाष्याप्रमाणे इष्टि, गणपाठ, उणादिसूत्र, फिट्सूत्र या सर्वांचे संकलन करून त्यांना स्वतंत्रपणे न मांडता स्वरचित सूत्ररूपातच मांडलेले आढळते.

भोजदेवाने आपले व्याकरण पाणिनीय व चान्द्र व्याकरण या दोहोंच्या आधारावर उभे केले आहे. सरस्वतीकण्ठाभरणात एकूण आठ अध्याय आहेत, ज्यामध्ये ६४३१ सूत्रे आहेत. तसेच परिभाषा, लिंगानुशासन, उणादिसूत्रे, फिट् सूत्रे यांचाही समावेश करण्यात आलेला आहे. प्रथम सात अध्यायांमध्ये लौकिक शब्दांचे विवेचन आहे आणि आठव्या अध्यायात वैदिक शब्दांचे विवेचन केलेले आहे.

आठव्या अध्यायात एकूण चार पादात मिळून ८२९ सूत्रे वैदिक व्याकरणावर रचण्यात आलेली आहेत. प्रथम व द्वितीय पादांमध्ये ३३० सूत्रांमध्ये वैदिकी प्रक्रिया सांगण्यात आलेली आहे, तर तृतीय व चतुर्थ पादांमध्ये ४९९ सूत्रांनी स्वर प्रक्रिया सांगण्यात आलेली आहे. स्वरप्रक्रियेतील पहिलेच सूत्र वार्तिकाचे अनुकरण आहे. 'स्वर: सतिशिष्टे बलीयान विकरणस्य'[१], तर 'स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत्'[२] येथे परिभाषा सूचित केली आहे. काही ठिकाणी पाणिनीय सूत्रे जशीच्या तशी स्वीकारलेली दिसतात. उदा. 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[३], 'चित:'[४], 'झल्युपोत्तमम्'[५], 'तित्स्वरितम्'[६], 'अनुदात्ते चे'[७], 'लिति'[८], 'तिङतिड:'[९], 'एकादेश उदात्तेनोदात्त:'[१०] वगैरे.

---

१ सर. कण्ठा. ८।३।१ = पहा.-सतिशिष्टस्वरबलीय. वा. ६।१।१५८ वा. १

२ सर. कण्ठा. ८।३।४ = हल्स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत् परि.

३ सर. कण्ठा. ८।३।५ = पा. सू. ६।१।१५८

४ सर. कण्ठा. ८।३।३१ = पा. सू. ६।१।१६३

५ सर. कण्ठा. ८।३।५६ = पा. सू. ६।१।१८०

६ सर. कण्ठा. ८।३।६२ = पा. सू. ६।१।१८५

७ सर. कण्ठा. ८।३।७० = पा. सू. ६।१।१९०

८ सर. कण्ठा. ८।३।७२ = पा. सू. ६।१।१९३

९ सर. कण्ठा. ८।३।२०४ = पा. सू. ८।१।२१

१० सर. कण्ठा. ८।४।२३३ = पा. सू. ८।२।५

काही ठिकाणी पाणिनीय सूत्रात बदल करून स्वतंत्र सूत्र तयार केलेले आहे. उदा. 'यत्रोदात्तालोप: स उदात्त'[१], 'प्रत्ययस्यादि[२] धातोरन्त:'[३], 'उदात्तयणो हल्पूर्वात्'[४], 'समासस्यान्त'[५].

तिसऱ्या पादांमध्ये 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[६] या सूत्रापासून ते 'चावतद्धिते'[७] यापर्यंत साधारणस्वर, धातुस्वर, प्रातिपदिकस्वर, प्रत्ययस्वर सांगून 'प्रातिपदिकस्यान्त:'[८] या सूत्रापासून 'शेषं सर्वमनुदात्तम्'[९] पर्यंत फिट्सूत्रे संकलित केली आहेत. त्यातही 'फिषोऽन्त उदात्त'[१०] असे म्हणण्याऐवजी 'प्रातिपदिकस्यान्त'[११] असा बदल केला आहे.

'तिङो गोत्रबुव.'[१२] पासून ते 'प्रत्ययान्ते च'[१३] पर्यंत 'तिङन्त स्वर' सांगितले आहेत.

चतुर्थ पादाची सुरवात 'समासस्यान्त'[१४] या सूत्राने करून 'उत्पुच्छे वा'[१५] या पर्यंत 'समासस्वर' सांगितले आहेत.

सरस्वतीकण्ठाभरणात तिसऱ्या व चवथ्या पादात मिळून सांगितलेल्या ४९९ सूत्रांमधून केवळ भ. दी. यांनी वै. सि. कौ. मध्ये 'स्वरप्रकियेत' संकलित केलेली ३२८ पाणिनीयसूत्रे व ८१ फिट्सूत्रे अशी ४१६ सूत्रे वगळली, तर सरस्वतीकण्ठाभरणातील स्वरप्रक्रिया सूत्रसंख्या ८३ होईल. थोडक्यात, १/४ हिस्साच नव्याने सांगण्यात आलेला आहे, असे म्हणावे लागेल.

---

१ सर. कण्ठा. ८।३।१२ = पा. सू. अनुदात्तस्य च यत्रोदात्तलोप:।६।१।१६१
२ सर. कण्ठा. ८।३।१५ = आद्युदात्तश्च। पा. सू. ३।१।३
३ सर. कण्ठा. ८।३।१६ = धातो:। पा. सू. ६।१।१६२
४ सर. कण्ठा. ८।३।४९ = पा. सू. ६।१।१७४
५ सर. कण्ठा. ८।४।१ = समासस्य ६।१।२२३
६ सर. कण्ठा. ८।३।५
७ सर. कण्ठा. ८।३।१११
८ सर. कण्ठा. ८।३।११२
९ सर. कण्ठा. ८।३।१९९
१० फि. सू. १।१
११ सर. कण्ठा. ८।३।१११
१२ सर. कण्ठा. ८।३।२०२
१३ सर. कण्ठा. ८।३।२४९
१४ सर. कण्ठा. ८।४।१
१५ सर. कण्ठा. ८।४।२२६

अष्टाध्यायीमध्ये अनुपलब्ध सूत्रे जी सरस्वतीकण्ठाभरणची स्वकीय ठरतील अशी काही सूत्रे सांगता येतील. उदा. 'शीलिकामिभिक्ष्याचरिभ्यो णः'[१], 'देवः सूतिहतिजूतिषु'[२], 'मौद पैप्यलादे वा'[३], 'मरुतद्वृद्धसूतशयादीनां छन्दसि'[४], इ. परंतु. या सूत्रांची संख्या अत्यल्प आहे. तेव्हा निष्कर्ष हाच निघतो की, पाणिनीय सूत्रांच्या उपयोगिते विना स्वरसिद्धी अशक्य. तसेच परवर्ति वैयाकरणांनी त्यांच्याच सूत्रांचा आधार घेऊन आपल्या ग्रंथांची रचना केली.

याशिवाय पाणिनीयेतर व्याकरणात हैमशब्दानुशासन, सारस्वत व्याकरण, बोपदेवांचा मुग्धबोध यांचा समावेश होत असला तरी ही व्याकरणे लौकिक शब्दसिद्धीसाठी रचली गेली. तेव्हा वैदिक शब्द व स्वरसिद्धीसाठी पाणिनीय व्याकरणच उपकारक ठरते, हेच खरे.

**१.१० प्रबंधामागील भूमिका व स्वरप्रक्रिया :-**

आतापर्यंत संस्कृत व्याकरणशास्त्राची पार्श्वभूमी पाहता लौकिक व वैदिक संस्कृत यामधील अंतर[५], व्याकरणशास्त्रातील वैदिक व्याकरणाचे स्थान[६] स्पष्ट करून स्वरविषयक सामान्य विचार[७] मांडला. ज्यामध्ये उदात्तादिक स्वरांच्या व्याख्या करून त्याविषयीचे विभिन्न ग्रंथातील विचार, मते स्पष्ट केली. त्यानंतर प्रबंधाचा विषय जो स्वरसिद्धी त्याचा ऊहापोह करताना स्वरसिद्धी म्हणजे काय[८] अर्थात स्वरसिद्धीची व्याख्या करून स्वरसिद्धीची ढोबळ-मानाने होणारे प्रकार[९] स्पष्ट केले. तसेच विषयाच्या अनुषंगाने स्वरसिद्धीस पोषक अशा पाणिनीय सूत्रे, वार्तिके, फिट्सूत्रे व उणादिसूत्रे यांच्यातील स्वरविवेचनाचा मागोवा घेतला[१०] व जे विवेचन पुढील काळात प्रक्रिया ग्रंथाकारांनी केलेले नाही, त्यावर स्वरदृष्ट्या प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला. याचबरोबर स्वरांची उपपत्ती सांगण्याचा प्रयत्न फक्त पाणिनीय

---

१ सर. कण्ठा. ८।४।५
२ सर. कण्ठा. ८।४।५८
३ सर. कण्ठा. ८।४।७२
४ सर. कण्ठा. ८।४।१२७
५ पहा. - १.१, पृ. २
६ पहा. - १.२, पृ. ४
७ पहा. - १.३, पृ. ६
८ पहा. - १.४, पृ. ८
९ पहा. - १.४ पृ. ११
१० पहा. - १.५ - १.९

व्याकरण संप्रदायात झाला आहे, की पाणिनीयेतर संप्रदायातही स्वरप्रक्रिया सांगण्यात आलेली आहे याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. यातून इतकेच स्पष्ट करावयाचे होते की, पाणिनी महर्षींनी साधारणपणे सुमारे ४०० स्वरविषयक सूत्रांनी जे स्वरविवेचन केलेले आहे, त्याहून अधिक विवेचन पुढील काळात झालेले नाही. किंबहुना या विषयाच्या क्लिष्टतेमुळेच प्रक्रिया कालखंडात 'स्वरप्रक्रिया' व 'वैदिकी प्रक्रिया' हे अष्टाध्यायीचे भाग अध्ययनाध्यापन-प्रक्रियेच्या बाहेरच राहिले. पण वेदवाङ्मयाच्या दृष्टीने पाहता स्वरशुद्धता किती महत्त्वाची आहे, हे 'इन्द्रशत्रु'[१] इ. उदाहरणांवरून स्पष्ट आहे. तसेच 'सस्वरता' हेच खरे वैदिक वाङ्मयाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. आणि हे लक्षात घेऊन लक्ष्यैकचक्षुष्क असलेल्या पाणिनी महर्षींनी वैदिक शब्दांच्या सिद्धीसाठी साधारणपणे ५८९-६००[२] सूत्रांची निर्मिती केली.

तेव्हा येथे आमची भूमिका अत्यंत स्पष्ट आहे की, स्वरसिद्धी सांगताना म्हणजे एखादा शब्द आद्युदात्त असेल, याचा अर्थ त्या शब्दाचे पहिले अक्षर उदात्त असेल उदा. 'होता'[३], किंवा शेवटचे अक्षर उदात्त असेल उदा. 'अग्नि'[४], अथवा एखाद्या शब्दाचा मुख्य स्वर स्वरित असेल उदा. 'क्व'[५], इ. तर त्या त्या उदात्तादिक स्वराची त्या-त्या स्थानीची व्याकरणशास्त्राद्वारे उपपत्ती सांगून तो स्वर त्या स्थानी सिद्ध करणे. यावरून स्पष्ट आहे की, ही स्वरसिद्धी व्याकरणशास्त्राच्या आधारावर दिली जाणार आहे आणि म्हणूनच अष्टाध्यायी पासून ते अर्वाचीन व्याकरण ग्रंथांपर्यंत सर्व व्याकरण ग्रंथांचे स्वर दृष्ट्या परीक्षण उपोद्घाताच करून घेतले आहे. याशिवाय दुसरे कारण असे स्वरसिद्धीचा अफाट विस्तार पाहता पुढे विषय केवळ 'तिङन्त' स्वरांपुरता मर्यादित करण्यात येणार असल्यामुळे व याविषयीची प्रथमतः व्यवस्थित मांडणी केली जात असल्यामुळे उक्तानुक्ततेचा विचार सुरवातीसच मांडणे गरजेचे वाटले.

---

१ पहा. पा. शि. श्लो. ५२, म. भा. पस्पा. १, गौणप्रयोजनं
२ भ. दीं. नी दिलेली वैदिकी व स्वरप्रक्रिया मिळून
३ पहा. - "होता कविक्रतुःसत्यः". ऋ. सं. १।१।५
४ पहा. - "अग्निमीळे पुरोहितं." ऋ. सं. १।१।१
५ पहा. - "क्व नूनं कद्वो." ऋ. सं. १।३८।२

तसे पाहिले तर प्रक्रिया कालखंडात वै. सि. कौ. ग्रंथात 'स्वरप्रक्रिया' भागात या विषयाची मांडणी केलेली आहे, पण तरी काही महत्त्वाच्या सूत्रांकडे स्वरदृष्ट्या दुर्लक्ष झाले असे वाटते. उदा. 'लुङलङलृङक्ष्वडुदात्त'[१] व 'आटश्च'[२] ही दोन सूत्रे भ. दी. नी धातुस्वर या तिङन्तस्वर या दोन्ही ठिकाणी दिलेली नसून[३] 'तिङन्त व लकारार्थ प्रकिया' या भागात दिलेली आहे[४]. जेथे केवळ या सूत्रांची व्याख्या करून अडागम व आडागमाचे विधान केले आहे. पण वास्तविक पाहता या दोन सूत्रांमुळे तिङन्तस्वरामध्ये धातुस्वर, विकरणस्वर व प्रत्ययस्वर याबरोबर 'आगमस्वर' या नवीन प्रकाराचा समावेश करावयास पाहिजे, जे केलेले नाही. तेच पुढे या प्रबंधात स्पष्ट करून त्यांची व्यवस्थित सोपपत्तिक सिद्धता करण्याचा प्रयत्न करणार आहे.

**ऋग्वेदीय प्रथम मंडलाची निवड :-**

स्वरसिद्धी सांगण्यासाठी ऋग्वेदाची निवड करण्यात आलेली आहे. ऋग्वेदाची रचना ही सर्वात प्रथम करण्यात आलेली आहे. तसेच मॅक्समूलर[५], वेबर[६], जॅकोबी[७], विंटरनित्स[८] या विद्वानांनी ऋग्वेद रचना काळ वेगवेगळा मानला असला तरी सर्वानुमते ऋग्वेद सर्वात प्राचीन ग्रंथ आहे हे निश्चित. तसेच भारतीय प्राचीन परंपरेनुसार वेद नित्य आहेत व सृष्टीच्या आरंभीपासून वेदोत्पत्ती झाली. यास ऋग्वेदातील पुरुषसूक्तातच प्रमाण मिळते -

''तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋच: सामानि जज्ञिरे।।
छान्दांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत।।''[९]

---

१ पा. सू. ६।४।७१
२ पा. सू. ६।४।७२
३ पहा. - वै. सि. कौ. भ. दी. भाग ६, स्वरप्रक्रिया,
४ पहा. - वै. सि. कौ. भ. दी. भाग ४, तिङन्त व लकारार्थ प्रक्रिया, संपा. म. दा. साठे
५ इ. स. पू. १२०० मॅक्समूलर
६ इ. स. पू. १२०० वा १५००, वेबर
७ वेदमंत्ररचना काळ - ४५९० इ. स. पू., जॅकोबी,
८ इ. स. पू. ४५०० - ६०००, यांच्या मध्ये,
९ ऋ. सं. १०.९०.९

तेव्हा स्वरसिद्धी सांगताना, तिची उदाहरणे म्हणून शब्दांचा शोध घेताना ऋग्वेदांसारखे मोठे भांडार सोडून अन्यत्र शोध घेणे म्हणजे समोरील पवित्र गंगाजलास अव्हेरून एखाद्याने पाण्यासाठी अन्यत्र शोध घेण्यासारखे आहे. म्हणून ऋग्वेदाचीच स्वरसिद्धी सांगण्याचा प्रपंच आरंभीला. वेद सस्वर आहेत हेही महत्त्वाचे. ऋग्वेदाची दोन प्रकारे रचना स्वीकृत आहे. १) मंडल रचना व २) अष्टक रचना. यापैकी मंडल रचनेनुसार ऋग्वेदाची १० मंडले असून १०२८ सूक्ते आहेत. तर अष्टक रचनेनुसार ८ अष्टके असून ६४ अध्याय आहेत. व २००६ वर्ग आहे, जी रचना सायणभाष्यात स्वीकृत आहे[१]. अशी स्थिती असताना स्वरसिद्धी करताना अधिकाधिक शब्दांची स्वरसिद्धता व्हावी या हेतूने मंडल रचना स्वीकारली. मंडल रचनेनुसार प्रथम मंडलात १९१ सूक्तांचा समावेश होतो, तर अष्टक रचनेनुसार प्रथम अष्टकात १२१ सूक्तांचा समावेश होतो. तेव्हा मंडल रचनेचा अध्याहार केल्याने अष्टक रचनेपेक्षा ७० सूक्ते अधिक अभ्यासली जातात, म्हणून ऋग्वेदीय प्रथम मंडल स्वीकारले.

याशिवाय ऋग्वेदीय प्रथम मंडल स्वीकारण्यामागे अजूनही एक कारण आहे. ते असे की, ऋग्वेदातील प्रथम मंडलात येणारे शब्द, समास, तिङन्त, निपात वगैरे पुढे द्विरुक्त होतीलच, पण सुरुवातीस त्यांची येथे सिद्धता केलेली असल्यामुळे पुढे ते शब्द कोणत्याही मंडलात आले तरी आमच्या प्रबंधात ते आधीच स्वरसिद्ध झालेले असतील. उदा. याति, अवन्तु, असि इ. तिङन्त. आणि 'तिङन्तस्वर' असा विषय मर्यादित केलेला असला तरी उपोद्घातात केलेले स्वरविषयक विवेचन पुढील काळात या विषयावर संशोधन करणाऱ्यांसाठी उपयोगी होईल. येथे केवळ प्रातिपदिकस्वरादिकांच्या विषयाचा श्रीगणेशा केलेला आहे. वास्तविकपणे सर्वच प्रकारच्या शब्दांची स्वरसिद्धी सांगणे हा अत्यंत मोठा विषय होत असल्यामुळेच त्याला मर्यादित करणे आवश्यक असल्याने त्यातीलच एकच प्रकार निवडून ऋग्वेदीय प्रथम मंडल स्वरसिद्ध केले जाणार आहे.

**तिङन्तस्वरच का ?**

ऋग्वेदीय प्रथम मंडल निवडी मागील कारणमीमांसा केली. त्यानंतर प्रश्न निर्माण होतो की, स्वरसिद्धीच्या प्रक्रियेनुसार व प्रकारानुसार प्रातिपदिकस्वर, धातुस्वर, समासस्वर वगैरे

---

१ पहा. ऋग्वेद संहिता, सायणभाष्यसहिंता, प्रका. चौखंबा विद्याभवन, वाराणसी, आवृत्ती १९९७

प्रकार होत असताना 'तिङन्तस्वर'च का घेण्यात आले. यामागीलही कारण स्पष्ट आहे की, संहितेच्या स्वर-नियमानुसार तिङन्त ही सर्वानुदात्त असतात[१]. मग प्रश्न असा येतो, जेव्हा एखादे तिङन्त पादारंभी असेल त्यावेळी त्याच्या पूर्वी निश्चितपणे तिङन्तभिन्न रूप असत नाही तेव्हा त्या तिङन्तावर कोठे उदात्तादिक स्वर येतील अर्थात धातुस्वर असेल की, विकरणस्वर की प्रत्ययस्वर? आणि हीच मुख्य समस्या डोळ्यासमोर ठेवून प्रबंधाची रचना केलेली आहे. तसे पाहिले तर एखादे तिङन्त रूप सिद्ध केल्यानंतर लगेचच ते पादारंभी नसताना वा इतर अपवाद वगळता ते सर्वानुदात्त म्हणून घोषित केले जाते, त्याच्या मूळ प्रकृती-स्वरांचा विचार केला जात नाही. किंबहुना अशा सर्वानुदात्त तिङन्ताची व्याख्या करताना सायणाचार्यांसारखे विद्वान भाष्यकार "तिङतिङ इति तिङन्तत्वान्निघात:"[२] असे म्हणून सर्वानुदात्त घोषित करून मोकळे होतात. किंवा एखादे ठिकाणी तिङन्त सर्वानुदात्त नसेल तर तेथे सर्वानुदात्तत्व का झाले नाही एवढेच सांगतात[३] पण त्या तिङन्ताचा कोणता स्वर आहे. याची चर्चा करताना दिसत नाही. तर कधी कधी तिङन्ताचा कोणता स्वर आहे म्हणजे धातुस्वर, प्रत्ययस्वर इ. सांगतात[४]. पण तो कसा शेष राहिला वा त्याची सर्वांगीण चर्चा करताना आढळत नाहीत. उदा. 'जुहूमसि'[५] हे उदाहरण घेऊ. येथे प्रत्ययस्वर आहे[६], हे कोणीही पाहताच क्षणी सांगू शकेल पण येथे 'ह्वेञ् स्पर्धायां शब्दे' या धातूहून बहुलेकरून 'श्लु' झाला आहे[७]. पण 'श्लु' झाल्यामुळे अभ्यस्त संज्ञा प्राप्त होते[८]. मग प्रश्न निर्माण होतो की, 'मस्' हा प्रत्यय लसार्वधातुक आहे. मग अभ्यस्तांचा आदिस्वर वा अन्त्यस्वर उदात्त होतो असे दोन सूत्रांनी सांगितले आहे[९]. त्यांनी येथे का कार्य झाले नाही व अभ्यस्तस्वराचा का बाध झाला? अशा अनेक समस्यांचे समाधान व्हावे म्हणूनच तसा दुर्लक्षित असा 'तिङन्तस्वर' प्रकार निवडला.

---

१ तिङतिङ। पा. सू. ८।१।२८
२ पहा. ऋ. सा. भा. १।१।
३ 'हि चेति सूत्रेण प्रतिषिद्धे सति प्रत्ययस्वर:'।, पहा. ऋ. सा. भा. १।२।४
४ पहा. ऋ. सा. भा. १।४।१
५ पहा. ऋ. सं. १।४।१
६ आद्युदात्तश्च। पा. सू. ३।१।३
७ बहुलं छन्दसि.। पा. सू. २।४।७६
८ उभे अभ्यस्त। पा. सू. ६।१।५
९ अभ्यस्तानामादि:। पा. सू. ६।१।१८९ व अनुदात्ते च। पा. सू. ६।१।१९०

त्यामुळे येथे स्पष्ट करता येईल की अभ्यस्तस्वर तेव्हाच आढळतो जेव्हा अजादिलसार्वधातुक प्रत्यय[१] असतो किंवा अनुदात्त लसार्वधातुक म्हणजे असा प्रत्यय जो उदात्त नसून लसार्वधातुक[२] आहे. म्हणजे हलादि पित् प्रत्यय मिप्, सिप्, तिप् वगैरे. 'मस्' हा या दोन्ही प्रकारात न बसणारा प्रबळ प्रत्ययस्वराने[३] उदात्त होऊन त्यांचा बाध करतो, अशाच प्रकारे तिङ्न्त स्वरांचे अत्यंत सूक्ष्म निरीक्षण करून सहजतेने कोणीही तिङन्त स्वर सिद्ध करू शकेल अशा प्रकारे पुढे प्रबंधात तिङन्त स्वराचे विवेचन केले आहे. ज्यामुळे नवाधीत वैयाकरण जो अनधीत स्वर प्रक्रिया आहे असा या प्रबंधाद्वारे सुगम्यतेने तिङन्तस्वर जाणून स्वरनिर्णय करू शकेल. तेव्हा याच उद्देशाने 'केवल तिङन्त'च निवडण्यात आलेली आहेत.

**१.११ प्रबंध रचना व व्याख्यान पद्धती :-**

**अ) प्रबंध रचना** – प्रबंधाची रचना करताना 'तिङन्तस्वर' ऋग्वेदातील प्रथम मंडलातील स्वरसिद्ध करावयाचे आहे हे लक्षात घेऊन पूर्ववर्ती आचार्यांनी केलेल्या विभागणीचा अभ्यास करून त्यात स्वरदृष्ट्या अपेक्षित बदल करून प्रकरणे तयार केलेली आहेत. तिङन्त म्हटले की त्याचे साधारणपणे तीन अवयव होतात – १) धातू, २) विकरण व ३) प्रत्यय. या क्रमानेच स्वरांची विभागणीही केली जाणार आहे. म्हणून सर्वप्रथम तिङन्तांचा विचार करू.

तिङन्त म्हणजे तिङ् प्रत्यय ज्यांच्या अंती आहेत, असे ते क्रियारूप ते तिङन्त होय[४]. यामध्ये लकार स्थानी होणारे 'तिप्तस्.[५]' या सूत्राने विहित तिङ् प्रत्यय अभिप्रेत आहेत. लकार ग्रहणाने दशो लकार अपेक्षित आहेत. ऋग्वेदातील प्रथम मंडलात येणारी दाही लकारातील तिङन्तांचा येथे समावेश करण्यात येणार आहे. आता लट् स्थानी होणारे 'शतृ' व 'शानच्' प्रत्ययान्त रूपे[६] किंवा लिट् स्थानी होणारा 'क्वसु' प्रत्ययान्त[७] रूपे यांचा मात्र येथे समावेश

---

१ पहा. – पा. सू. ६।१।१८९

२ पहा. – पा. सू. ६।१।१९०

३ आद्युदात्तश्च। पा. सू. ३।१।३

४ "तिङ् अन्तं यस्य, तत् तिङन्तम्"

५ पा. सू. ३।४।७८

६ लटः शतृशानचावप्रथमा.। पा. सू. ३।२।१२४

७ लिटः कानज्वा। पा. सू. ३।२।१०६ व क्वसुश्च । पा. सू. ३।२।१०७

नाही. या प्रत्ययांना कृदन्त संज्ञा आहे[१]. त्यामुळे दशो लकारस्थ तिङ् प्रत्ययान्त रूपे स्वीकार्य आहेत.

संहितेच्या नियमानुसार तिङन्त ही साधारणपणे सर्वानुदात्त असतात व काही अपवादात्मक स्थितीत उदात्तादिक स्वरविशिष्ट असतात, हे लक्षात घेऊन तिङन्तांची स्वरसिद्धी करताना संपूर्ण प्रबंध दोन कांडांमध्ये विभागावा लागेल –

१) उदात्तकांड

२) अनुदात्त कांड.

**उदात्तकांड :-**

उदात्तकांडामध्ये तिङन्तावर उदात्त हा मुख्य स्वर असताना तो कोठे येतो म्हणजे धातूच्या ठिकाणी असतो, विकरणाच्या की प्रत्ययाच्या याचा अभ्यास करून अनुक्रमे पुढीलप्रमाणे प्रकरणे केली जातील –

१) धातुस्वर

२) विकरण स्वर

३) प्रत्यय स्वर

यानंतर लुङ्, लङ्, लृङ् या तीन लकारात होणारा अडागम वा आडागम हा सर्व पूर्ववर्ती धातू, विकरण व प्रत्यय या स्वरांचा बाध करून शेष राहतो, हे सिद्ध करण्यासाठी स्वतंत्र असे 'आगमस्वर' प्रकरण केले जाईल.

याचबरोबर वेदामध्ये ज्या त्या धातूंनी जी ती विहित गणविकरणे होतातच असे नाही तर बहुलेकरून विकरणे होतात. तेव्हा 'श्लु' विकरण झालेले असताना धातू अभ्यस्त संज्ञक होता. मग त्यांच्या अभ्यस्तस्वराचा विचार करण्यासाठी 'अभ्यस्तस्वर' असे नवे प्रकरण केले जाणार आहे.

---

१ कृदतिङ्। पा. सू. ३।१।९३ ने तिङ्भिन्न प्रत्ययांना 'कृत्' संज्ञा सांगितली आहे, त्यानुसार 'शतृ-शानच् व क्वसु' यांना या सूत्राने कृत् संज्ञा होऊन ती 'कृदन्त' म्हणून धातुरूपे ओळखली जातात.

धातूंबरोबर कधी कधी उपसर्गही जोडलेले असतात, तेव्हा जर सोपसर्ग धातू असेल उपसर्गाच्या स्वराची काय व्यवस्था किंवा तिङन्तावर उदात्तादिक स्वर येतील की उपसर्गावर याची सिद्धता 'गतिनिघातस्वर' या स्वतंत्र प्रकरणात केली जाईल.

याशिवाय अशी काही तिङन्त वेदात आढळून येतात ज्यांची सिद्धता पूर्वोक्त वा पाणिनीय सूत्रांनी होऊ शकत नाही, त्यांच्या स्वरांची सिद्धताही व्हावी म्हणून 'संकीर्णस्वर' प्रकरण स्वतंत्र करण्यामागील प्रयोजन आहे.

थोडक्यात, उदात्तकांडात तिङन्तावर आढळणारा 'उदात्त' हा मुख्य स्वर कोठे येतो हे अभ्यासून पुढीलप्रमाणे प्रकरणे केली जातील -

१) धातुस्वर २) विकरणस्वर ३) प्रत्ययस्वर

४) आगमस्वर ५) अभ्यस्तस्वर ७) गतिनिघातस्वर

७) संकीर्णस्वर

**अनुदात्तकांड :-**

साधारणपणे १००० हून तिङन्ते ऋग्वेदीय प्रथम मंडलात सर्वानुदात्त आढळतात. त्यामुळे या सर्वानुदात्त तिङन्ताचा समावेश स्वतंत्र व्हावा म्हणून 'अनुदात्तकांड' निर्माण केले. या अनुदात्तकांडातील सर्व तिङन्ते सर्वानुदात्त असतील हे स्पष्टच आहे. मग वेगळे काय सांगितले जाणार आहे, असा प्रश्न निर्माण होतो, तर तेथे त्या तिङन्ताचा रूपपरिचय देऊन सर्वानुदात्त होताना पूर्वोक्त उदात्तकांडातील धातुस्वर इ. कोणत्या स्वराचा बाध करून ते तिङन्त सर्वानुदात्त झालेले आहे, याची चर्चा या अनुदात्तकांडात स्वतंत्र तळटीपा देऊन केली जाईल. जी सायणभाष्यात निघातस्वर सिद्धी आढळत नाही. यामुळे येथे उदात्तादिक स्वरांचा बाध कसा होईल, तसेच प्रकृतिस्वरत्व देखील समजून येण्यास मदत होईल, अशी आशा वाटते. याशिवाय लट् वगैरे लकारानुसार तिङन्त सूची परिशिष्टात जोडली जाईल.

**परिशिष्ट :-**

प्रबंधास पुरक अशी परिशिष्टे स्वतंत्रपणे जोडली जाणार आहेत. ज्यामध्ये सर्वप्रथम सार्वधातुक व आर्धधातुक दश लकाराचे तिङ् प्रत्यय सस्वर सिद्ध केलेले दिले जातील.

त्यानंतर 'भू सत्तायाम्' या धातूची सस्वर दशलकारातील रूपांचे परिशिष्ट जोडले जाईल. यामुळे तिङन्तस्वराची स्पष्ट कल्पना येण्यास मदत होईल. त्यानंतर प्रबंधात सिद्ध केलेल्या तिङन्तांच्या धातूंची 'धातुसूची' दिली जाईल. पण ही धातुसूची न करता प्रत्यक्ष 'सस्वर-पाणिनीय-धातुपाठ'च तयार करण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. ज्यामुळे उपदेशी काळी धातू उदात्त, अनुदात्त कसे ओळखावे हे स्पष्ट होईल. यानंतर स्वरविषयक पाणिनीयसूत्रे, स्वरविषयक वार्तिक, शांतनवाचार्यांची फिट्सूत्रे दिली जातील; ज्यामुळे अभ्यासकांना, संशोधकांना अन्यत्र शोध घ्यावा लागणार नाही. तिङन्तरूपे अभ्यासताना काही तिङन्तातील मूळ धातू पाणिनीय धातुपाठात आढळत नाहीत. तर त्यांचे संकलन 'निघण्टु' या प्राचीन वैदिक शब्द संग्रहात आढळते. म्हणून स्वतंत्र असे 'नैघण्टुक धातुपाठ' नावाचे परिशिष्ट सुद्धा जोडले जाईल. याशिवाय उदात्तकांडातील तिङन्तांची व अनुदात्त तिङन्ताची सूची जोडून कोणतेही रूप सहजतेने शोधून त्याची स्वरसिद्धी पाहता येईल. अशा प्रकारे प्रबंध उदात्त व अनुदात्त अशा दोन कांडात विभागून आणि आवश्यक अशा परिशिष्टांनी परिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. ज्यामुळे नवीन अभ्यासकांना, विद्यार्थी, प्राध्यापक व संशोधक यांना निश्चितच 'वैदिक स्वरसिद्धी' या विषयाबाबत माहिती पुरवून मार्गदर्शन करणारा प्रबंध ठरेल अशी त्याची संरचना, मांडणी करण्याचा प्रयत्न आहे.

याचबरोबर परिशिष्टात जोडलेली 'सस्वर धातुपाठ', 'सस्वर प्रत्यय', 'सस्वर भू धातुरूपे', 'नैघण्टुक धातुपाठ' ही परिशिष्टे अत्यंत मौलिक मार्गदर्शन करण्याचे कार्य करतील, असा विश्वास वाटतो.

**ब) व्याख्यान पद्धती :-** प्रबंधात वर्णनात्मक संशोधन पद्धतीचा स्वीकार करण्यात आलेला आहे. उदात्तकांडात केल्या जाणाऱ्या स्वरसिद्धीमध्ये प्रयोजित सूत्रांची व्याख्या करून त्यांच्या द्वारे कशा प्रकारे त्या विशिष्ट स्वराची सिद्धी होते हे स्पष्ट केले जाणार आहे. प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभीच त्या प्रकरणाची निर्मिती, त्या स्वराची स्वतंत्र आवश्यकता याचेच विवेचन करून पुढे स्वरसाधक सूत्रे अष्टाध्यायीतून उद्धृत करून त्यांची स्वरदृष्ट्या व्याख्या व

विवेचन केले जाईल[१]. त्यानंतर जर तेथे एखाद्या वार्तिकाने सिद्धता होत असेल तर त्याचा अंगीकार करून त्याची आवश्यकता व त्या वार्तिकाने होणारी स्वरसिद्धी याचे विवेचन केले जाईल[२]. सूत्रे, वार्तिके यांच्या व्याख्यानानंतर 'स्वरसिद्धीप्रक्रिया' सांगितली जाईल[३]. ज्यामुळे सूत्रे कोणत्या क्रमाने प्रवृत्त होतात व स्वरसिद्धी कशी होते, ते स्पष्ट होईल. प्रक्रिया सांगितल्यानंतर प्रत्यक्ष स्वरसिद्धी केली जाईल[४]. यामध्ये जो स्वर सिद्ध केला जात असेल, त्याचे प्रातिनिधिक स्वरूपातील तिङन्त घेऊन त्याची सविस्तर स्वरसिद्धी केली जाईल. त्यामुळे स्वरसिद्धी नव्याने शिकणाऱ्यांना स्वरसंचार कसा होतो, ते स्पष्टपणे कळू शकेल. उदा. 'असि' हे धातुस्वराचे उदाहरण आहे. याची क्रमवार रूपसिद्धी सांगत स्वरांकनही सांगितले जाईल[५] व 'असि' आद्युदात्त सरूप स्वरसिद्ध होईल. त्यानंतर मात्र त्यासारख्या इतर तिङन्ताचा रूप परिचय केवळ दिला जाईल; कारण स्वरसिद्धी 'असि' वगैरे निवडलेल्या प्रातिनिधिक तिङन्तप्रमाणेच असेल. त्यामुळे द्विरुक्ती दोष टळेल. त्याचबरोबर प्रत्येक तिङन्ताविषयी तळटीपांमध्ये आवश्यक ती माहिती ससूत्र सांगितली जाईल. रूपसिद्धीविषयी देखील सांगितले जाईल. स्वरसिद्धीच्या सौकर्यासाठी अधिकाधिक तळटीपा देऊन विषय निवेदन स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला जाईल, जेणेकरून मनात कोणत्याही प्रकारचा संदेह राहणार नाही.

## १.१२ उदात्तकांडातील प्रकरणे :-

'उदात्तकांड' हा विषय 'प्रबंधरचना' या मागील भागात उदात्तकांडाची स्वतंत्र रचना का करावी लागली याची चर्चा केलेली आहे. तसेच तेथे उदात्तकांडातील प्रकरणे कशी केली जाणार आहेत, याविषयी थोडक्यात माहिती दिलेली होती. येथे त्यातील प्रकरणाविषयी अधिक स्पष्टपणे चर्चा करू.

---

१ पहा. - उदात्तकांड, धातुस्वर; स्वरसाधक सूत्रे व विवेचन १.१:१,

२ पहा. - उदात्तकांड, धातुस्वर; स्वरसाधक सूत्रे, ३.४

३ पहा. - उदात्तकांड, धातुस्वर; स्वरसिद्धि-प्रक्रिया १:२,

४ पहा. - उदात्तकांड, धातुस्वर; प्रत्यक्ष स्वरसिद्धि १.३

५ पहा. - उदात्तकांड, धातुस्वर; पिदनुदात्त धातुस्वर १.३:१,

१) **धातुस्वर :**

या प्रकरणामध्ये तिङन्तावर उदात्त स्वर असतो व तो धातू विकरण व प्रत्यय यापैकी धातूवर आढळतो, तेव्हा त्यास 'धातुस्वर' म्हटले आहे. आता प्रश्न असा येतो की, स्वर प्रक्रियेनुसार प्रथम धातुस्वर होतो पण त्यानंतर लकारस्थानी प्रत्यय होतो व तो प्रत्ययस्वराने उदात्त होतो. त्यावेळी धातुस्वर असताना (सति) प्रत्ययस्वर नव्याने झालेला (शिष्ट) राहतो, तो बलवान होऊन धातुस्वराचा बाधक होत असताना मग 'धातुस्वर' कसा सिद्ध होईल? याची सिद्धता या 'धातुस्वर' प्रकरणात करण्यात येणार आहे. तसेच प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष राहतो म्हणून त्यास 'प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर' म्हटले आहे. पित् - असा विकरण व प्रत्यय समोर असताना जो धातुस्वर राहील, त्यास 'पिदनुदात्तधातुस्वर' असे म्हटले आहे व या प्रकरणात या दोन स्वरांची सिद्धता सांगून ऋग्वेदीय तिङन्त संकलित करून स्वरसिद्ध केली जातील.

२) **विकरणस्वर :**

ऋग्वेदीय प्रथम मंडळातील तिङन्त जेव्हा एकत्रित केली तेव्हा लक्षात येते की, काही तिङन्तांमध्ये 'विकरण स्वर' देखील आढळून येतो. मग हा 'विकरणस्वर' कसा सिद्ध होईल यासाठी प्रकरणाची रचना केलेली आहे. याप्रकरणात विकरणस्वरूप जे प्रत्यय होतात उदा. चुरादिगणाहून होणार 'णिच्'[१] प्रत्यय किंवा दिवादिगणाहून होणारा 'श्यन्'[२] हे अनुक्रमे 'चित्' व 'नित्' आहेत. त्यावरून 'चित्-विकरणस्वर' व 'नित् विकरणस्वर' असे दोन प्रकार कल्पिले आहेत व त्यांची उदाहरणे संकलित करून ती या प्रकरणात स्वरसिद्ध केली जातील. यानंतर 'सामान्य विकरणस्वर' या शीर्षकाखाली अन्य प्रकारे विकरणस्वर आढळणाऱ्या तिङन्ताची स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न केला जाईल.

---

१ सत्याप-पाश-रूप० चुरादिभ्यो णिच् । पा. सू. ३।१।२५

२ दिवादिभ्यो श्यन् । पा. सू. ३।१।६९

३) **प्रत्ययस्वर :**

धातुस्वर, विकरणस्वर सांगून झाल्यानंतर या दोहोंचाही बाधक असा प्रत्ययस्वर सिद्ध करण्यासाठी 'प्रत्ययस्वर' हे स्वतंत्र प्रकरण केले आहे. जेव्हा प्रत्ययस्वर धातुस्वराचा बाध करून स्वयं उदात्त राहतो, तेव्हा त्यास 'धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर' म्हटले आहे. तर विकरणस्वराचा बाध करणाऱ्यास 'विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर' म्हटले आहे व दोन्ही प्रकारच्या तिङन्ताचे वर्गीकरण करून त्यांचे स्वरसिद्ध करून दाखविले जाणार आहेत. याचबरोबर स्वतंत्र असा 'चित् प्रत्ययस्वर' देखील तिङन्तामध्ये आढळतो व तो सिद्ध करण्यासाठी स्वतंत्रपणे त्याचे विवेचन व सिद्धता दिली जाणार आहे. याप्रमाणे प्रत्ययस्वर प्रकरणात १) धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर, २) विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर व ३) चित्स्वर अशा तीन प्रत्ययस्वरांची स्वरसिद्धी दिली जाईल.

४) **आगमस्वर :**

पाणिनीय व्याकरणात एक विशेष सूत्ररचना महर्षींनी उपयोगात आणलेली आहे, ती म्हणजे 'विप्रतिषेधे परं कार्यम्'[१] अर्थात दोन सूत्रांमध्ये विप्रतिषेध निर्माण झाले की, त्यातील जे सूत्र पर असेल, त्याचे कार्य केले जाते. अगदी थोडी अशीच रचना ही प्रकरणे तयार करताना डोळ्यासमोर आहे. त्यानुसार धातुस्वर-विकरणस्वर-प्रत्ययस्वर व आगमस्वर हे उत्तरोत्तर प्रबळ होत जातात म्हणून त्याचप्रमाणे प्रत्ययस्वरांनंतर 'आगमस्वर' हे नवीन प्रकरण तयार केले. या प्रकरणामध्ये लुङ्, लङ् व लृङ् या तीन लकारात हलादिधातूहून होणारा 'अडागम' व अजादिधातूहून होणारा 'आडागम' हे दोन्ही आगम कसे उदात्त होतात व पूर्वीच्या धातू, विकरण, प्रत्यय इ. स्वरांचा बाध करतात, याची सिद्धता मांडली जाणार आहे. त्यामुळे या तीन लकारात केवळ 'आगमस्वरच' असतो, हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. आणि म्हणूनच 'आगमस्वर' असा स्वतंत्र स्वर प्रस्थापित, प्रतिष्ठित केला जाईल.

---

१ पहा. - पा. सू. १।४।२

५) **अभ्यस्त स्वर :**

'अभ्यस्तस्वर' हा अत्यंत नवा स्वर मांडण्याचा प्रयत्न येथे केला जात आहे. अर्थात हा स्वर पाणिनीय सूत्रांनी पूर्वी उक्त आहे. पण तो आजपर्यंत स्वतंत्रपणे मांडलेला नाही. तो येथे सर्वांसमोर आणण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. वास्तविक पाहता जुहोत्यादिगण-पठित धातूंच्या बाबतीच 'अभ्यस्त स्वर' आढळला असता; पण वैदिक तिङन्ताचा अभ्यास करताना वेदामध्ये विकरणे बहुलेकरून होतात; त्यामुळे या 'अभ्यस्तस्वरा'ची कक्षाही रूंदावते. तेव्हा 'अभ्यस्तस्वर' कधी आढळतो, ते सिद्ध करण्याचे काम या प्रकरणात केले जाणार आहे.

६) **गतिनिघातस्वर :**

उपसर्गांना गतिसंज्ञा दिलेली आहे, अशी गतिसंज्ञक साधारणपणे अव्युत्पन्न पक्षी फिट्सूत्रांनी आद्युदात्त असतात, पण त्यांचा तिङन्ताशी योग असताना मात्र ती सर्वानुदात्त होतात. ते गतिसंज्ञक पद केव्हा सर्वानुदात्त होते, हेच सिद्ध करण्याचा प्रयत्न या प्रकरणात केला जाणार आहे. तसेच त्यावेळी तिङन्तस्वराची काय स्थिती राहील याचाही विचार या प्रकरणात केला जाईल.

७) **संकीर्णस्वर :**

ऋग्वेदीय प्रथम मंडलातील तिङन्त रूपांची स्वरसिद्धी सांगणे हा विषय असल्यामुळे 'संकीर्णस्वर' असे स्वतंत्र प्रकरण करावे लागते. या प्रकरणात अशी तिङन्त संकलित केली जाणार आहेत; ज्यांच्या स्वरामध्ये पूर्वोक्त स्वराचा बाध होतो, किंवा पूर्वोक्त स्वरांच्या नियमास अपवाद सापडतो, इ. सर्व तिङन्त या प्रकरणात संकलित करून त्या त्या स्वरांची व्यवस्था लावून स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न केला जाणार आहे.

वेदवाङ्मय हे सस्वर आहेत, व ते तसेच वर्षानुवर्षे मात्रादिकांचाही फेरफार न होऊ देता जतन करण्यात आलेले आहेत. वेदातील स्वरांच्या उच्चारणाविषयी शिक्षाग्रंथांनी[१],

---

१ पा. शि. ५२

महाभाष्यकारांनीही[१] देखील 'इन्द्रशत्रु' उदाहरण दिलेले आहे. 'इन्द्रशत्रु' या पदातील स्वराच्या चुकीच्या उच्चारणामुळे वृत्राचा विनाशक इंद्र उत्पन्न झाला, जो की इंद्राचा नाश व्हावा म्हणून यज्ञ आरंभिलेला होता. पण वास्तविक पाहता 'इन्द्रशत्रु' या पदामध्ये जर उदात्त स्वर कोठे येईल, त्याची उपपत्तीच जर ठाऊक नसेल, तर योग्य उच्चारण होईलच कसे ?

उदात्तादिक स्वरांची उपपत्ती ही व्याकरणशास्त्रांद्वारे देता येते. जसे 'इन्द्रशत्रु' हे सामासिक पद आहे. यातील 'इन्द्र' हे पद 'ऋज्रेन्द्रा.'[२] या उणादिसूत्राने 'रन्' प्रत्ययान्त निपातित केलेले असून 'ञ्नित्यादिर्नित्यम्'[३] सूत्राने 'आद्युदात्त' आहेत. तर 'शत्रु' पद 'रशातिभ्यां क्रुन्'[४] या उणादिसूत्राने 'क्रुन्' प्रत्ययान्त सिद्ध होऊन नित्त्वामुळे आद्युदात्त होईल. तेव्हा 'इन्द्र' यातील इकार व 'शत्रु' यातील शकार उदात्त होतील, जेव्हा 'इन्द्रस्य शत्रु, इन्द्रशत्रु' असा षष्ठी तत्पुरुष[५] समास केला जाईल, तेव्हा 'समासस्य'[६] या सूत्राने 'इन्द्रशत्रु' हे षष्ठी समासान्त पद अन्तोदात्त होईल.

तर 'इन्द: शत्रुः यस्य सः, इन्द्रशत्रुः' असा 'बहुव्रीही' समास[७] केला, तर 'बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम्'[८] या सूत्राने 'इन्द्रशत्रु' हा बहुव्रीही समासान्त पदातील पूर्वपदाचे म्हणजे 'इन्द्र' पदाचे प्रकृतिस्वर कायम राहतील म्हणजे 'इन्द्र' शब्दाचे आद्युदात्तत्व कायम राहील.

परंतु हा सामासिक स्वरातील बदल ठाऊक नसल्यामुळे 'इन्द्रशत्रु' पद अन्तोदात्त उच्चारले व ते षष्ठी समासान्त झाल्यामुळे अनर्थ ओढवला. असा अनर्थ ओढावू नये; म्हणूनच स्वरांची उपपत्ती समजून घेणे आवश्यक आहे. आणि तेव्हाच वेदांचेही शुद्ध उच्चारण केले जाऊ शकेल. तेव्हा या उद्देशानेच प्रस्तुत प्रबंधात स्वरांची उपपत्ती सांगण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. ही स्वरसिद्धी व्याकरणशास्त्राच्या आधारे देता येईल आणि म्हणूनच

---

१ म. भा. पस्शा. १।१।१
२ पं. उ. सू. २।२९
३ पा. सू. ६।१।१९७
४ पं. उ. सू. ४।१०४
५ षष्ठी । पा. सू. २।२।८
६ पा. सू. ६।१।२२३
७ अनेकमन्यपदार्थे । पा. सू. २।२।२४
८ पा. सू. ६।२।१

अष्टाध्यायीमध्ये पाणिनी महर्षींनी सुमारे ४०० सूत्रांनी वैदिक स्वरसिद्धी सांगण्याचा प्रयत्न केला आहे. त्याशिवाय या स्वरसिद्धीस उपकारक ठरणारी उणादिसूत्रे, फिट्सूत्रे ही सुद्धा महत्त्वाची आहेत आणि म्हणून विषय प्रवेश करण्यापूर्वीच येथे उपोद्घातात त्यांच्या स्वरसिद्धीशी असलेल्या संबंधावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला. तर पाणिनीय सूत्रांमधील उक्त, अनुक्त व दुरुक्ततेचा विचार करणाऱ्या कात्यायनीस वार्तिकांचाही स्वरसिद्धीच्या दृष्टीने ऊहापोह केला; त्यामुळे त्यांचे स्वरसिद्धीतील महत्त्व स्पष्ट होतेच; पण त्याशिवाय कात्यायनाची सूक्ष्म निरीक्षण दृष्टी व सखोल संशोधनशीलता दृग्गोचर होते.

याशिवाय पाणिनीयेतर व्याकरणे रचण्यात आलेली आहेत. त्यामध्ये स्वरविवेचनास महत्त्व दिले गेली की नाही याचाही शोध येथे घेण्यात आलेला आहे; ज्यांचा निष्कर्ष स्पष्टपणे डोळ्यासमोर येतो की, उत्तरवर्ति वैयाकरणाचार्यांनी वैदिक व्याकरणाचा क्लिष्टतेमुळे परित्याग केलेला आढळतो, तर भोजदेवांसारख्या विद्वानांनी आपल्या व्याकरणात वैदिक व्याकरणास स्थान दिले असले, तरी ते पूर्णपणे पाणिनी महर्षींचे पादानुध्यानच आहे, हे उघडच आहे.

उपरोक्त विवेचनावरून स्पष्ट होते की, स्वरांची उपपत्ती सांगताना अग्रक्रमाने अष्टाध्यायी, वार्तिके, फिट्सूत्रे, उणादिसूत्रे यांचाच उपयोग होईल. आणि म्हणून प्रस्तुत प्रबंधामध्ये या सर्वांचे एकत्रित संकलन करून स्वरदृष्ट्या सखोल विवेचन केले जाणार आहे. ज्यामुळे वैदिक व्याकरणासारख्या दुर्लक्षित विषयाकडे वळू पाहणाऱ्या विद्यार्थी, अभ्यासक, संशोधक, जिज्ञासू या सर्वांना एकाच ठिकाणी सर्वकाही उपलब्ध होऊ शकेल व स्वरसिद्धीच्या अध्ययन-अध्यापनास पुन्हा एकदा गती मिळू शकेल.

तसेच स्वरसिद्धीमध्येही 'तिङन्तस्वरसिद्धी' हा विषय तिङन्तांच्या सर्वानुदात्त उपलब्धीमुळे दुर्लक्षिला गेलेला आहे. त्यामुळे तिङन्ताच्या स्वरांचा विचार येथे प्रबंधात सविस्तरपणे केला जाणार असून पूर्वाचार्यांनी सांगितलेल्या तिङन्तस्वरांच्या प्रकारांमध्ये अधिक स्पष्टता आणण्यासाठी व अधिक तिङन्तस्वर व्यवस्थित सिद्ध करता यावेत म्हणून तिङन्तस्वरांची फेररचना करून नवीन नित् विकरण स्वर, चित् विकरण स्वर, आगम स्वर, अभ्यस्तस्वर यांची मांडणी करून स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. यासाठी

ऋग्वेदीय प्रथम मंडलातील तिङन्तांचे संकलन करून पूर्वी सांगितल्याप्रमाणे धातुस्वरादी सहा प्रकारामध्ये विभागणी करून स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न करणार आहोत.

महत्त्वाची बाब म्हणजे वैदिक स्वरसिद्धी करताना अनेक ठिकाणी प्रत्यय, विकरण, स्वर इ. अनेक व्यत्यय येतात. त्याचा निर्वाह 'व्यत्ययो बहुलम्'[१] असे म्हणून केला जातो. किंबहुना आजपर्यंत तसा केला जात असे, पण या प्रबंधामध्ये तिङन्त स्वरसिदधी सांगताना स्वरव्यत्यय आला, तर या स्वरव्यत्ययाचा सर्वांगीण विमर्श करून त्यावर उपाय सुचविण्याचा प्रयत्न केला जाणार आहे. यामध्ये सूत्रातील दुरुक्तता, दूर करण्यासाठी स्वरचित वार्तिकांची यथासंभव रचना करण्याचाही प्रयत्न केला जाणार आहे. ज्यामुळे 'व्यत्ययो बहुलम्' म्हणून निर्वाह करावा लागणार नाही व सूत्रातील कमतरता दूर होऊन व्याकरणशास्त्र सर्वांगीण परिपूर्ण होईल. शिवाय या दुरुह विषयाच्या अध्ययनास देखील योग्य दिशा लाभेल.

वरील सर्व बाबींचा समावेश करून प्रस्तुत प्रबंध तिङन्तास्वरसिद्धी बाबतीतच नव्हे, तर वैदिकस्वरसिद्धी क्षेत्रात आमूलाग्र बदल, परिवर्तन घडविणारा तसेच वैदिक वाङ्मयाच्या संस्वरतेच्या परंपरेची जपणूक करण्यासाठी मार्गदर्शक व्हावा, या दृष्टीने परिपूर्ण करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न करणार आहोत. तसेच स्वरसिदधी विषयातील एक आदर्श ग्रंथ म्हणून विद्वान आलोचक, समीक्षक, संशोधक, जिज्ञासू, अभ्यासक या सर्वांपुढे सादर करण्याचा प्रयत्न करणार आहे.

---

१ पा. सू. ३।१।८५

# उदात्तकांड

**प्रास्ताविक -**

वेदामध्ये प्रामुख्याने तीन स्वर आढळून येतात. ते म्हणजे उदात्त, अनुदात्त व स्वरित. यापैकी 'उदात्त' व 'स्वरित' हे दोन विशेष आहेत. अनेक उदाहरणांमध्ये उदात्त हाच स्वर मुख्य स्वर असतो व शेष सर्व स्वर अनुदात्त असतात. उदा. 'अग्निम्'[१] या ठिकाणी 'ग्नि' हे अक्षर उदात्त आहे व शेष सर्व अनुदात्त आहेत, त्यामुळे 'अग्नि' पदातील मुख्य स्वर उदात्त हाच आहे. तर कधी कधी एकाच पदात हे तीनही स्वर आढळून येतात. उदा. यज्ञस्य[२]. येथे अनुक्रमे अनुदात्त, उदात्त व स्वरित असे तीन स्वर आहेत. मग येथे स्वरित हा मुख्य स्वर का नाही? अशी शंका उत्पन्न होऊ शकते. याचे समाधन असे की, येथे अनुदात्ताचा स्वरित झालेला आहे, तो मूळ स्वरित किंवा जात्यस्वरित नाही. त्यामुळे 'यज्ञस्य' या पदामध्ये 'उदात्त' हाच मुख्य स्वर आहे.

स्वरित मुख्य स्वर असलेले पद आढळते का ?

तर हो. 'स्वरित' मुख्य स्वर असलेलेही पद आढळते. वेदामध्ये जात्यस्वरिताची अनेक उदाहरणे आहेत. उदा. ''कन्या उ नामभि.''[३], ''स्व १ र्ण चित्रं.''[४], इ. येथे 'कन्या' व 'स्व:' ही जात्यस्वरिताची उदाहरणे आहेत. त्यापैकी 'कन्या' शब्दातील अन्त्यस्वर स्वरित आहे तो 'तिल्यशिक्यकार्ष्मर्यकन्या.'[५] या फिट् सूत्राने सिद्धही करता येतो, तसाच 'स्व:' देखील 'न्यङ्स्वरो स्वरितो'[६] या फिट् सूत्राने जात्यस्वरित सिद्ध करता येतो.

याचबरोबर अजूनही एक स्वर आढळतो. तो म्हणजे एकश्रुती.ही एकश्रुती स्वरिता पुढील अनुदात्त स्वरांची होते. उदा. होतारम्[७]. येथे 'र' एकश्रुती आहे. उपरोक्त चारही स्वर

---

१ ऋ. सं. १।१।१
२ ऋ. सं. १।१।१
३ ऋ. सं. १।१६१।५
४ ऋ. सं. १।१४८.१
५ फि. सू. ४।८
६ फि. सू. ४।६
७ ऋ. सं. १।१।१

एकाच पदात एकत्र आढळू शकतात. उदा. पुरोहितम्[१] येथे अनुक्रमे अनुदात्त - उदात्तस्वरित - एकश्रुती असे चारही स्वर एकत्र आहेत.

मग चारही स्वर एकत्रित असताना त्यातील मुख्य स्वर कसा ओळखावा ?

ज्या स्वरामुळे त्या पुढील अनुदात्तादित स्वरांमध्ये बदल घडून येतो, तो मुख्य स्वर समजावा. जसे. 'पुरोहितम्' येथे 'रो' हा उदात्त असून त्यापुढील 'हितम्' या अनुदात्त पदातील 'हि' चा स्वरित झाला व त्यामुळे 'त' ची एकश्रुती झाली. जर हा उदात्त नसता तर कोणताच बदल झाला नसता; म्हणून येथे 'उदात्त' हा मुख्य स्वर आहे, हे सिद्ध होऊ शकते.

मग तिङन्तावरही असे उदात्त, अनुदात्त, स्वरित, एकश्रुती हे चारही स्वर आढळतात. उदा. '**अ**सि'[२], येथे 'उदात्त व स्वरित' आहेत. '**य**जति'[३] येथे 'उदात्त-स्वरित-एकश्रुती' असे तीन स्वर आहेत. तर 'हि**नो**ति'[४] येथे 'अनुदात्त-उदात्त-स्वरित' असे तीन स्वर आहेत. तर 'रु**ण**धामहै'[५] या ठिकाणी 'अनुदात्त-उदात्त-स्वरित-एकश्रुती-एकश्रुती' असे चारही स्वर आहेत. पण या सर्व उदाहरणात उदात्त हाच मुख्य स्वर आहे.

तिङन्तावर उदात्त हाच मुख्य स्वर असतो व तो कसा येतो याचीच चर्चा करण्यासाठी प्रस्तुतचे 'उदात्तकांड' कल्पिले आहे. अशा प्रकारे उदात्त स्वरयुक्त तिङन्त ऋग्वेदीय प्रथम मंडळातून एकत्रित करून त्या त्या तिङन्तांवर उदात्त हा मुख्य स्वर कोठे आलेला आहे, त्याची व्युत्पत्ती सांगून त्या उदात्त तिङ्न्ताची स्वरसिद्धी येथे केली जाईल.

तत्पूर्वी तिङन्तांची स्वरसिद्धी करण्याचा विषय ठरविला आणि ऋग्वेदातील प्रथम मंडलात तिङन्तांचा शोध घेऊन ती संकलित केली तेव्हा ती दोन प्रकारात आढळली. १) उदात्ततिङन्त २) अनुदात्ततिङन्त. त्यापैकी उदात्ततिङन्ताची स्वरसिद्धी येथे सांगितली जाईल. पण तिङन्त ही साधारणपणे सर्वानुदात्तच आढळतात. मग उपरोक्त असि, यजति वगैरे तिङन्तांवर उदात्त स्वर कधी येईल याची थोडी चर्चा करू.

---

१ ऋ. सं. १।१।१
२ ऋ. सं. १।१।४
३ ऋ. सं. १।२६।३
४ ऋ. सं. १।१८।४
५ ऋ. सं. १।८।२

तिङन्त उदात्त कधी होईल म्हणजेच सर्वानुदात्त तिङन्ताचा निषेध हा अपवाद कोठे आढळेल, असा प्रश्न निर्माण होतो. या सर्वानुदात्ताचा प्रतिषेध कधी होईल हे महर्षी पाणिनींनी सूत्रांमध्ये विस्ताराने सांगितले आहे. 'न लुट्'[१] या सूत्रापासून ते 'यद्वृत्तान्नित्यम्'[२] या सूत्रांपर्यंत ३७ सूत्रांनी तिङन्तावर उदात्त येईल व सर्वानुदात्ताचा बाध होईल असे सांगितले आहे.

येथे तिङन्तस्वरसिद्धीचा विषय असल्यामुळे उपरोक्त विषयावर अधिक चर्चा न करता उदात्ततिङन्त होण्यास कारण ठरणारी काही प्रमुख सूत्रे सांगून त्यांचे विवेचन करू.

**उदात्ततिङन्त स्थापक पाणिनीय सूत्रे व विवेचन :-**

**१) तिङतिङः ।८।१।२८।**

यासूत्राचे सविस्तर विवेचन पुढे अनुदात्त कांडात केले जाईल. येथे 'अपादादौ' या पदाची अनुवृत्ती येत असल्यामुळे जे तिङन्त पादारंभ नसते, ते सर्वानुदात्त होते. म्हणजे पर्युदासाने जे पादारंभी असेल ते उदात्त आढळते. उदा.''सचस्वान:स्वतये।''[३], ''स्यामेदिन्द्र.''[४], ''गमद्वाजेभि.''[५], ''रोचन्ते रोचनादिवि।''[६] वगैरे अनेक उदाहरणे आहेत. येथे अनुक्रमे 'सचस्व', 'स्याम', 'गमत्', 'रोचन्ते', इ. उदाहरणांवर उदात्त हा मुख्य स्वर आहे.

तसेच 'अतिङ्' म्हणजे 'तिङन्त नसलेले' असे म्हटल्याने तिङन्त असेल तर देखील पुढील तिङन्त उदात्त राहील. उदा. ''इहि मत्सि''[७] येथे 'इहि' या तिङन्तापुढे 'मत्सि' आले आहे. त्यामुळे उदात्त आहे.

**२) निपातैर्यद्यदिहन्तकुविन्नेच्चेच्चण्कच्चिद्यत्र युक्तम् ।८।१।३०**

जर यत्-यदि-हन्त-कुवित्-नेत्-चेत्-चण्-कच्चित्-यत्र या निपातांशी तिङन्त युक्त असेल तर सर्वानुदात्त होत नाही. उदा. ''मंहते मघम्''[८], ''यत्र रथेन गच्छथ:''[९], ''यत्र गाव:

---

१ पा. सू. ८।१।२९
२ पा. सू. ८।१।६६
३ ऋ. सं. १।१।९
४ ऋ. सं. १।४।६
५ ऋ. सं. १।५।३
६ ऋ. सं. १।६।१
७ ऋ. सं. १।६।१
८ ऋ. सं. १।११।३
९ ऋ. सं. १।२२।४

पिबन्ति नः।''[१], इ. इकाणी 'मंहते', 'गच्छथः' व 'पिबन्ति' उदात्त तिङन्त आहे कारण यांच्या अनुक्रमे 'यदि' व 'यत्र' या निपातांशी संबंध आहे.

३) **हि च ।८।१।३४**

'हि' याच्याशी संबंधित तिङन्त अनुदात्त होत नाही. उदा. ''हि दृक्षसे संजग्मानो.''[२], ''न हि ... इन्वतः''[३], ''हि ष्ठा सुदानवः''[४], ''हि स्थोवसे.''[५], ''उशन्ति हि।''[६] वगैरे उदाहरणे प्रथम मंडलात आहेत, जी पुढे सिद्ध केली जाणार आहेत.

४) **यद्वृत्तान्नित्यम् ।८।१।८६**

यद् सर्वनामाचे कोणतेही रूप असेल, तर त्या वाक्यातील तिङन्त कधीही सर्वानुदात्त होत नाही.

या प्रकारातील बरीच उदाहरणे आढळून येतात. यातील काही उदाहरणे पाहू. उदा. ''यं यज्ञमध्वरं विश्वतः परि भूरसि।''[७], ''यस्य संस्थे न वृण्वते.''[८], ''य एकश्चर्षणीनां वसूनामिसरज्यति।''[९], ''ये आशत.''[१०], '' यः कुक्षि . . . पिन्वते।''[११], ''यदग्ने यासि.''[१२] इ. उदाहरणांमध्ये 'यम्', 'यस्य', 'य', 'ये', 'यत' इ. वेगवेगळ्या 'यद्' सर्वनामाच्या विभक्त्यन्त रूपांशी संबद्ध तिङन्त उदात्त राहिले आहे.

इतरही अनेक सूत्रे आहेत. पण त्यांचे विवेचन वै. सि. कौ. ग्रंथात केलेले आहे. तसेच त्यावर विशेष विवेचन करण्याची आवश्यकता नाही, फक्त वैदिक उदाहरणे तेथे देता येतील. येथे केवळ परिचय व्हावा म्हणून नामनिर्देश केला आहे. तसेच प्रस्तुत प्रबंधात पुढे स्वरसिद्ध

---

१ ऋ. सं. १।२३।१८
२ ऋ. सं. १।६।७
३ ऋ. सं. १।१०।८
४ ऋ. सं. १।१५।२
५ ऋ. सं. १।१७।२
६ ऋ. सं. १।२।४
७ ऋ. सं. १।१।४
८ ऋ. सं. १।५।४
९ ऋ. सं. १।७।९
१० ऋ. सं. १।८।६
११ ऋ. सं. १।८।७
१२ ऋ. सं. १।१२।४

केली जाणारी तिङन्ते बहुतांशी 'पादारंभी असलेली' आहेत अथवा 'यद् सर्वनाम युक्त' आहेत. म्हणून त्याच सूत्रांना स्पष्ट केले.

तेव्हा वरील विवेचनावरून तिङन्त उदात्त कधी होऊ शकते हे स्पष्ट होऊ शकेल.

**उदात्तकांडातील स्वरप्रकरणे :-**

तिङन्तावर 'उदात्त' हा मुख्य स्वर सिद्ध करण्याचा प्रसंग आलेला असताना हा उदात्त कोठे येईल हे पहावे लागते. यासाठी तिङन्ताची जी ३ (तीन) मुख्य अंगे धातू - विकरण - प्रत्यय यांच्या अनुषंगाने उदात्त कोठे येईल याची स्वरसिद्धी सांगणे सुलभ होईल म्हणून त्यानुसार धातुस्वर, विकरणस्वर व प्रत्ययस्वर असे तिङन्तस्वराचे प्रकार कल्पिले, पण याशिवाय लङ्, लुङ्, लृङ् लकारात होणारे अडादिकागम यांचाही स्वरात समावेश करावा लागतो, तसेच सोपसर्ग धातू आढळतात. तसेच ऋग्वेदीय प्रथम मंडलातील उदात्ततिङन्तांची निरीक्षणे करताना अभयस्त धातूंवरही उदात्त स्वर आढळला आणि सर्वांच्या संकलनातून तिङन्तस्वराचे सहा प्रकार कल्पिले - १) धातुस्वर, २) विकरणस्वर, ३) प्रत्ययस्वर, ४) आगमस्वर, ५) अभ्यस्तस्वर, ६) गतिनिघातस्वर.

पण याशिवाय ऋग्वेदात अशी ही काही उदाहरणे आढळली जी उपरोक्त स्वरात आढळत नाहीत, त्यांची स्वरसिद्धी करण्यासाठी सातवा प्रकार म्हणून 'संकीर्ण स्वर' मानला.

अशा प्रकारे उदात्तकांडात ऋग्वेदातील प्रथम मंडलात आढळून आलेली उदात्त तिङन्ते पुढील सात तिङन्तस्वर प्रकरणात विभागून यानंतर क्रमश: त्यांची स्वरसिद्धी सांगितली जाईल. थोडक्यात ही तिङन्तस्वराची प्रकरणे पुढील प्रमाणे -

१) धातुस्वर २) विकरणस्वर

३) प्रत्ययस्वर ४) आगमस्वर

५) अभ्यस्तस्वर ६) गतिनिघातस्वर

७) संकीर्णस्वर

## प्रकरण पहिले

# धातुस्वर


| अ. क्र. | शीर्षक | पृ. क्र. |
|---|---|---|
| १.० | प्रास्ताविक | ७७ |
| १.१ | पिदनुदात्त-धातुस्वर | ७८ |
| १ | स्वरसाधक सूत्रे व विवेचन | ७८ |
| २ | स्वरसिद्धी प्रक्रिया | ८१ |
| ३ | प्रत्यक्ष स्वरसिद्धी | ८१ |
| १.२ | प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर | ९८ |
| १ | अदुपदेश धातू | ९८ |
| २ | अनुदात्तेत् व ङित् धातू | ९८ |
| ३ | स्वरसाधक पाणिनीय सूत्र | ९९ |
| ४ | स्वरसिद्धी प्रक्रिया | १०१ |
| १.३ | मूल्यमापन | १२१ |

# प्रकरण पहिले

# धातुस्वर

## १.० प्रास्ताविक -

उदात्तकांडातील तिङन्तस्वरांचे परीक्षण करताना असे आढळून येते की, या तिङन्तांमध्ये प्रकृतिस्वरत्व असते. हे प्रकृतिस्वरत्व म्हणजे त्या तिङन्तांमध्ये धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर, आगमस्वर, उपसर्गस्वर किंवा अभ्यसस्वर या सहा प्रकारच्या स्वरांपैकी एका प्रकारचे स्वरत्व असते. ते स्वरत्व त्या तिङन्तामध्ये कसे येते; त्यामागील कारणे कोणती याचा सविस्तर ऊहापोह प्रस्तुत प्रकरणात होणार आहे. त्यातही जेव्हा तिङन्तामध्ये धातुस्वर आढळतो, त्या धातुस्वराचा सविस्तर अभ्यास करावयाचा आहे. त्यामुळे तिङन्त उदात्त असताना त्याच्यामध्ये कधी धातुस्वर आढळतो हे स्पष्ट होईल. म्हणूनच या प्रकरणात 'धातुस्वर' या स्वर प्रकाराचे विवेचन करीत आहे.

वास्तविक पाहता, जेव्हा तिङन्तामध्ये उदात्त हा मुख्य स्वर धातूवर असतो, तेव्हा त्यास 'धातुस्वर' असे म्हणतात. तेव्हा धातूंच्या स्वरांचे येथे विवेचन केले जाणार आहे. प्रथमत: सर्वसाधारण नियम असा की, धातूंचा अन्त्यस्वर उदात्त असतो.[१] पण संस्कृतात साधारणपणे सुमारे २००० धातू आहेत[२], तर काही काही धातुपाठात ही संख्या २०१५ देखील आढळते[३]. तर भट्टोजी दीक्षिताने वै.सि.कौ. अंतर्गत संकलित केलेल्या धातूंची संख्या १९४३ आहे[४]. त्या धातूंपैकी जागृ, दरिद्रा, चकासृ, वगैरे धातू या सामान्य नियमाने अन्तोदात्त आढळतात; पण एकाच् असे अस्, वृध् वगैरे धातू मात्र हल्स्वरविधीच्या बाबतील हल् अविद्यमान असते.[५] त्यामुळे आद्युदात्त आढळतात. पण तिङन्त हे तिङादिक प्रत्ययांविना सिद्ध होत नाही व प्रत्ययस्वर हा बलवान असतो.[६] मग असे असताना तिङन्तामध्ये धातूवर केव्हा उदात्त येतो हे जाणून घेण्यासाठी धातुस्वराचे दोन प्रकार पाडावे लागतात -

---

१ धातो: ।६।१।१६२। पा.सू.

२ वै.सि.कौ., संपा. का. वा. अभ्यंकर, जाने. १९६८, पृ.क्र. ६१२, भाग ४,

३ म.मु.पा. धातुपाठ, संपा. डॉ. नरेश झा, सन २०००,

४ वै.सि.कौ., संपा. का. वा. अभ्यंकर, जाने. १९६८, पृ.क्र. ३६४, भाग ४,

५ 'हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवति।', पारिभाषिक:, स्वामीदयानंद व्याख्या, वैदिक पुस्तकालय, अजमेर, पृ.क्र. ७४.

६ धातू उदात्त झाल्यानंतर प्रत्ययस्वर होतो व सतिशिष्ट करुन बलवान ठरतो.

१) पिदनुदात्त धातुस्वर व २) प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर. या दोन उपप्रकारामुळे लक्षात येऊ शकते की, धातुस्वर तिङन्तामध्ये कधी आढळून येतो, आणि याचेच विवेचन या प्रकरणात पुढे केले जाणार आहे.

## १.१ पिदनुदात्त - धातुस्वर -

"जेव्हा तिङन्तामध्ये होणारे विकरण व तिङ् प्रत्यय दोन्ही पित् असल्यामुळे अनुदात्त होऊन[१] धातूचा उदात्त स्वर शेष राहतो, तेव्हा त्यास 'पिदनुदात्त धातुस्वर' म्हणतात."

येथे धातू हा उदात्त झाल्यानंतर लकार स्थानी होणारे तिङ् प्रत्यय त्या प्रत्ययांपैकी तिप्, सिप्, मिप् हे प्रत्यय पित् असल्यामुळे अनुदात्त होतात.[२] तर वेदामध्ये सार्वधातुक व आर्धधातुक अशी दोन्ही संज्ञा बहुलकरुन होत असल्यामुळे सार्वधातुकात धातूहून कर्तरी अर्थी होणारे शप्[३] विकरण देखील पित्त्वामुळे अनुदात्त होते आणि त्यामुळे पूर्वप्राप्त धातूवरील उदात्त तिङन्तात कायम राहतो. हा धातुस्वर केवळ शप् व तिपादिक प्रत्ययांच्या पित्त्वामुळे शेष राहतो, म्हणून त्यास 'पिदनुदात्त-धातुस्वर' म्हटले आहे.

### १.१.१ स्वरसाधक सूत्रे व विवेचन -

**अ) धातोः ।६।१।१६२।**

धातूचा अन्त्य स्वर उदात्त असतो.

हा सर्वसाधारण नियम आहे. येथे धातूचा 'अन्त्य' स्वरच उदात्त असतो असे का म्हटले अशी शंका येऊ शकते. त्याचे समाधान असे की, अन्त्य स्वर उदात्त होतो, असे म्हटल्याने जागृ, दरिद्रा, चकास्, सारख्या बह्वच् धातूंचा अन्त्य स्वर उदात्त होतो; अन्यथा प्रथम स्वर उदात्त झाला असता. तसेच णिजन्त, यङन्त, क्यजन्त यांच्यापासून होणारी क्रियापदातील धातू अन्तोदात्त होतात.[४]

---

१ अनुदात्तौ सुप्पितौ। पा.सू. ३।१।४।

२ छन्दस्युभयथा। पा.सू. ३।४।११७।

३ कर्तरि शप्। पा.सू. ३।१।६८।

४ चुरादिभ्यो णिच्।३।१।२५ ने व हेतुमति च ३।१।२६ ने णिच् होतो, तर धातोरेकाचो हलादेः क्रियासमभिहारे यङ्।३।१।२२ ने यङ्; सुप आत्मनःक्यच्।३।१।८। ने क्यच् हे प्रत्यय होऊन होणारे शब्द; सनाद्यन्ता धातवः।३।१।३२ ने क्यच् हे प्रत्यय होऊन होणारे शब्द; सनाद्यन्ता धातवः।३।१।३२ पे धातुसंज्ञक होतात व प्रस्तुत सूत्राने त्यांच्या अन्त्य स्वर उदात्त होऊन ते अन्तोदात्त होतात.

याशिवाय दुसरी एक शंका उपस्थित होते की, उपदेशकाळी[१] धातुपाठात धातू सस्वर सांगितलेले असून पुन्हा धातूचा अन्त्यस्वर उदात्त होतो असे सांगण्यामागचे प्रयोजन काय? तर या शंकेचे समाधान असे - धातुपाठात उपदेशी जे धातूंना स्वरत्व सांगितले आहे; ते विशिष्ट विधिनिमित्त आहे. जसे 'गम्लृ गतौ' हा धातू अनुदात्त व उदात्त लृकारेत् असा पठित आहे. येथे धातू अनुदात्त सांगण्यामागचे कारण म्हणजे आर्धधातुक वलादिप्रत्ययास इडागम होऊ नये[२] हा आहे. तर उदात्तलृकारेत् पठणाचा उद्देश धातूहून परस्मैपद[३] व्हावे हे आहे. पण प्रयोगाव्यस्थेत हा धातू अनुदात्त न राहता उदात्त व्हावा यासाठी पुन्हा या प्रस्तुत सूत्राने प्रयोगावस्थेत धातूच्या अन्त्यस्वराला उदात्तत्व सांगितले आहे. पण हे असे सांगितले नसते तर धातुपाठात उपदेश काळी अनुदात्त असणारे सगळे धातू शिबन्त तिपादिक पित् प्रत्यय युक्त असताना कायम सर्वानुदात्त राहिले असते. असे होऊ नये; म्हणून धातुस्वर उदात्त होतो म्हटले आहे; म्हणूनच 'गच्छन्ति' असे आद्युदात्त तिङन्त सिद्ध होऊ शकते.

**ब) अनुदात्तौ सुप्पितौ।३।१।४।**

सुप् विभक्ती प्रत्यय व पित् प्रत्यय अनुदात्त असतात.

प्रस्तुत सूत्राने प्रत्ययस्वर आद्युदात्त असतो[४], हे सांगणाऱ्या सूत्राचा अपवाद सांगितला आहे. सुप् प्रत्यय म्हणजे सु औ जस्[५] इ. प्रथमादि प्रत्यय हे अनुदात्त असतात. त्यामुळे प्रातिपदिकाचा प्रकृतिस्वर कायम राहतो. उदा. - दे॒वेन॑ येथे 'इन' हा 'टा' या विभक्तीला झालेला आदेश आहे.[६] तो प्रस्तुत सूत्राने अनुदात्त झाल्याने 'देव' या अन्तोदात्त कायम राहून गुणरूप एकादेश होऊन 'देवेन' हे मध्योदात्त सुबन्त सिध्द होते.

---

१ 'उपदेश' याचे सार्थ विवेचन पहा. - संस्कृत भाषा नैपुण्यम्, प्रका. - शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, पृ.क्र.६०.

२ एकाच उपदेशेऽनुदात्तात् पा. सू.।७।२।१०

३ शेषात्कर्तरि परस्मैपदम् पा. सू.।१।३।७८

४ आद्युदात्तश्च। पा.सू. ३।१।३।

५ स्वौजसमौट्.। पा.सू. ४।१।२।

६ टाङसिङसामिनात्स्याः। पा.सू. ७।१।१२

या सूत्राचा दुसरा भाग म्हणजे पित् प्रत्यय. 'प्रत्यय:[१]' या अधिकारात सांगितलेल्या प्रत्ययांपैकी पकारेत् असलेले प्रत्यय अनुदात्त होतात. तिङन्तामध्ये पित् प्रत्ययांचा समावेश होतो, तो असा – लट् लकारात – तिप् सिप् मिप्[२] तर ङित् लकारात तिपादिकांच्या इकाराचा लोप होतो[३], त्यामुळे स्वराचा प्रश्नच निर्माण होत नाही. पण लोट् लकारात तु, पित् होतो व त्यामुळे अनुदात्तही. तसेच "आनि आव आम" व "ऐ आवहै आमहै" या सहा प्रत्ययांना आडागम होतो व तो पित् सांगितला[४]. त्यामुळे ते प्रस्तुत सूत्राने अनुदात्त होतात हे विशेष आहे. स्वरशास्त्राच्या दृष्टीने या प्रत्ययांना पित्‌च सांगण्यामागचे हेच मुख्य प्रयोजन आहे. तसेच या पित्त्वामुळे तिङन्तामध्ये धातुस्वर कायम राहतो. तेव्हा स्वरसिद्धीच्या दृष्टीने एक महत्त्वाचे सूत्र आहे, हे नक्की !

**क) उदात्तादनुदात्तस्य स्वरित:।८।४।६६।**

उदात्तापुढील अनुदात्ताचा स्वरित होतो.

येथे उदात्त जो कोणत्याही सूत्राने प्राप्त झालेला असेल, त्याच्या पुढे जर अनुदात्त स्वर असेल तर तो स्वरित होतो. उदात्तापुढे अनेक अनुदात्त असतील तर त्यातील पहिल्या अनुदात्ताचाच स्वरित होतो. त्यामुळे 'गच्छति' सारख्या उदाहरणात 'तिप्' अनुदात्तच राहतो 'च्छ' मात्र स्वरित होतो.

येथे एक शंका उपस्थित होऊ शकते – पदात एकच स्वरित वा उदात्त स्वर राहून शेष अनुदात्त होतात[५], मग येथे तसे का झाले नाही? याचे समाधान असे – प्रस्तुत स्वरित हा जात्यस्वरित नसून उदात्तवर्ती स्वरित आहे. शिवाय निघात सांगणारे सूत्र अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८। ने सपाद सप्ताध्यायीतील असून 'उदात्तादनुदात्तस्य स्वरित।८।४।६६' त्रिपादीतील असिद्ध[६] असल्यामुळे याने सांगितलेला स्वरित झालाच नाही असे समजून शेष निघात होत नाही व स्वरित कायम राहतो.

---

१ प्रत्यय:। पा.सू. ३।१।१।
२ तिप्तस्झि.। पा.सू. ३।४।७८।
३ नित्यं ङित:। पा.सू. ३।४।९९
४ आडुत्तमस्य पिच्च। पा.सू. ३।४।९२।
५ अनुदात्तं पदमेकवर्जम्। पा.सू. ६।१।१५८
६ पूर्वत्रासिद्धम्। पा.सू. ८।२।१

ड) **स्वरितात्संहितायामनुदात्तानाम्।१।२।३९।**

संहितेत उदात्ताच्या पुढील अनुदात्ताला स्वरित झाल्यानंतर त्यापुढील अनुदात्तांची एकश्रुती[१] होते.[२]

हा अत्यंत व्यापक नियम आहे. यातील 'अनुदात्तानाम्' असे बहुवचन सांगण्यामागे खास प्रयोजन आहे; ते असे - येथे जर एकवचन वापरले असते तर स्वरितापुढील अनुदात्तांपैकी एकाच पहिल्या अनुदात्ताची एकश्रुती झाली असते. पण बहुवचनाच्या निर्देशामुळे स्वरितापुढील सर्व अनुदात्तांची एकश्रुती होते. म्हणूनच जेव्हा तिङन्त अनुदात्त असते, तेव्हा त्यामागे जर एखादे स्वरित पद आले तर पूर्ण सर्वानुदात्त तिङन्ताची एकश्रुती होते. उदा.- ''स इद्देवेषुं गच्छति।।''[३] तर धातुस्वर तिङन्तात अन्त्यस्वराची एकश्रुती होते. उदा. - ''अग्निमीळे''[४]

**१.१.२ स्वरसिद्धी प्रक्रिया -**

धातूस्वर तिङन्तामध्ये धातुस्वर शेष राहताना पुढील प्रमाणे स्वरप्रक्रिया आढळते. प्रथम धातुस्वर अन्तोदात्त होतो. त्यानंतर लकार स्थानी होणारा पित् प्रत्यय प्रत्ययस्वराने प्राप्त आद्युदात्ताचा बाध करुन अनुदात्त होतो. तर ह्यानंतर होणारे शप् विकरण वा लेट् लकारातील अडागम वा आडागम[५] अनुदात्त होतो[६], व धातुस्वर जो उदात्त तो शेष राहतो. अशा प्रकार पिदनुदात्त धातुस्वर सिद्ध होतो.

**१.१.३ प्रत्यक्ष स्वरसिद्धी -**

यापुढे १)'असि' या तिङन्ताची स्वरसिद्धी प्रक्रिया दाखवून पुढील तिङन्ताची स्वरप्रक्रिया तद्वद् असल्यामुळे एक प्रातिनिधिक स्वरसिद्धी देऊन उर्वरित तिङन्ताची रूपे सांगून तळटीपेत स्वरसिद्धीविषयक स्पष्टीकरण दिलेले आहे.

---

१ मनोरमाकारांनी एकश्रुतीलाच 'प्रचय' संज्ञा दिलेली आहे. 'एकश्रुति:प्रचय इति' तर सायणाचार्यांनी ''एकश्रुत्यंप्रचयनामकं भवति'' असे म्हटले आहे. (ऋ.सं.सा.भा.१।१।१) तर शौनकानेही 'प्रचय' हेच नाव दिले आहे. ''स्वरितादनुदात्तानां परेषां प्रचय: स्वर'' (ऋ.प्राति.३।११।१)

२ वै.सि.कौ. संपा. का. दा. अभ्यंकर, भाग ६, ऑग. १९७२, पृ.क्र.२९

३ ऋ. सं. १।१।४

४ ऋ. सं. १।१।१

५ लेटोऽडाटौ।३।४।९४

६ ''आगमा अनुदात्ता भवन्ति'':, प्रका. वै. पुस्त. अजमेर, पृ.क्र. ११२

## २.३ सामान्य विकरण स्वर

| | | |
|---|---|---|
| १) | इरज्यति | प्रस्तुत तिङन्त 'इरज ईर्ष्यायाम्' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन. |
| | इरज ईर्ष्यायाम् | भूवादयो धातवः।१।३।१ ने धातुसंज्ञा. |
| | इरज् | धातोः।६।१।१६२।[१] ने धातुस्वर अन्तोदात्त; व अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८। ने शेष अनुदात्त. |
| | इरज् + लट् | वर्तमाने लट्।३।२।१३२। ने लट् |
| | इरज् + तिप् | तिप्तस्झि०।३।४।७८। ने तिप् |
| | इरज् + ति | अनुदात्तौ सुप्पितौ।३।१।४।[२] ने अनुदात्त |
| | इरज् + यक् + ति | कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७।[३] ने यक् विकरण |
| | इरज् + य + ति | आद्युदात्तश्च।३।१।३।[४] ने यक् उदात्त |
| | इरज्यति | अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८।[५] ने सतिशिष्ट स्वर बलवान ठरुन शेष अनुदात्त. |
| | इरज्यति | उदात्तादनुदात्तस्य स्वरितः।८।४।६६।[६] ने स्वरित व स्वरसिद्धी पूर्ण. |
| २) | रुणधामहै[७] | प्रस्तुत तिङन्त 'रुधिर् आवरणे' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. लोट् लकार उत्तम पुरुष बहुवचन. |

---

१ सार्थ विवेचन, पृ. क्र. ७८

२ "सुप् व पित् प्रत्यय अनुदात्त होतात" त्यानुसार तिप् हा पित् प्रत्यय अनुदात्त.

३ "कण्ड्वादिगणपठित धातूहून स्वार्थी यक् प्रत्यय नित्य होतो" या नुसार 'यक्' विकरण रूप प्रत्यय; प्रत्ययस्वराने आद्युदात्त.

४ सार्थ विवेचन, पृ. १२८

५ सार्थ विवेचन, पृ. १५९

६ सार्थ विवेचन, पृ. ८०

७ रुधादिभ्यश्नम्।३।१।७८। ने श्नम्, मिदचोन्त्यात्परः।१।१।४७। ने उपान्त्यपदी; आडुत्तमस्य पिच्च।३।४।९२। ने आडागम, टित आत्मनेपदानां टेरे।३।४।७९ ने एत्व; एत ऐ।३।४।९३। ने ऐत्व; 'आमहै' प्रत्यय पित्त्वामुळे अनुदात्त; 'श्नम्' चा विकरणस्वर शेष.

३) सपर्यति[१] — प्रस्तुत तिङन्त 'सपर पूजायाम्' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४) हिनोति[२] — प्रस्तुत तिङन्त 'हि गतौ वृद्धौ च' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५) सृजामि[३] — प्रस्तुत तिङन्त 'सृज विसर्गे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन.

६) शक्नवाम[४] — प्रस्तुत तिङन्त 'शक्लृ शक्तौ' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

७) युज्यसे[५] — प्रस्तुत तिङन्त 'युजिर् योगे' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

८) सुनु[६] — प्रस्तुत तिङन्त 'षुञ् अभिषवे' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

९) ऋणोः[७] — प्रस्तुत तिङन्त 'ऋणु गतौ' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

---

१ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक् विकरण उदात्त; तिप् पित्त्वाने अनुदात्त व विकरणस्वर शेष.

२ स्वादिभ्यः श्नुः।३।१।७३। ने श्नु विकरण; आद्युदात्तश्च।३।१।३। ने उदात्त; धातुस्वराचा निघात, तिप्च्या पित्त्वामुळे विकरणस्वर शेष.

३ तुदादिभ्यः शः।३।१।७७। ने 'श' विकरण; ते आद्युदात्तश्च।३।१।३। ने उदात्त; अपित्त्वामुळे क्ङितिच।१।१।५। ने गुणनिषेध; मिप् च्या पित्त्वामुळे विकरणस्वर शेष.

४ स्वादिभ्यः श्नुः।३।१।७३। ने श्नु विकरण; आद्युदात्तश्च।३।१।३। ने उदात्त; धातुस्वराचा निघात; आडुत्तमस्य पिच्च।३।४।९२। ने आडागम व 'आम' प्रत्यय पित् त्यामुळे 'अनुदात्तौ सुप्पितौ।३।१।४। ने अनुदात्त; विकरणस्वर शेष.

५ सार्वधातुके यक्।३।१।६७। ने कर्मणी अर्थी यक्; आद्युदात्तश्च।३।१।३। ने आद्युदात्त; क्ङितिच।१।१।५। ने उपधागुणनिषेध; 'से' प्रत्यय अदुपदेशाने 'तास्यनुदात्तेन्ङिद०।६।१।१८६। ने अनुदात्त होऊन विकरणस्वर शेष.

६ स्वादिभ्यः श्नुः।३।१।७३। ने श्नु विकरण; आद्युदात्तश्च ३।१।३। ने उदात्त होऊन धातुस्वराचा निघात; उतश्च प्रत्ययाद्-संयोगपूर्वात्।६।४।१०६ ने हिलोप; विकरणस्वर शेष.

७ तनादिकृञ्भ्यः उः।३।१।७९। ने 'उ' विकरण; आद्युदात्तश्च।३।१।३। ने उदात्त; धातुस्वराचा निघात; इतश्च।३।४।१००। ने सिप्च्या इकाराचा लोप; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५। ने अडागमाभाग; विकरणस्वर.

१०) कृणोषि[१] — प्रस्तुत तिङन्त 'कृञ् हिंसायाम्' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

११) वनोषि[२] — प्रस्तुत तिङन्त 'वनु याचने' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

१२) सृज[३] — प्रस्तुत तिङन्त 'सृज विसर्गे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

१३) शृणोति[४] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

१४) स्तविष्यामि[५] — प्रस्तुत तिङन्त 'ष्टुञ् स्तुतौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लृट् लकार उत्तम पुरुष एकवचन.

१५) वच्यन्ते[६] — प्रस्तुत तिङन्त 'वच परिभाषणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

१६) भिनत्[७] — प्रस्तुत तिङन्त 'भिदिर् विदारणे' या 'रुधादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

---

१ स्वादिभ्यः श्नुः।३।१।७३। ने श्नु; सिप्च्या पित्त्वामुळे विकरणस्वर शेष.

२ तनादिकृञ्भ्यः३।३।१।७९। ने 'उ' विकरण व उदात्त सिप्च्या पित्त्वामुळे विकरणस्वर शेष.

३ तुदादिभ्यः शः।३।१।७७। ने 'श' विकरण व उदात्त; अतो हेः।६।४।१०५। ने हिलोप; विकरणस्वर.

४ श्रुवः शृ च।३।१।७४। ने श्रु हून 'श्नु' विकरण व 'शृ' असा आदेश; आद्युदात्तश्च।३।१।३। विकरण उदात्त; सार्वधातुकार्धधातुकयोः।७।३।८४। ने गुण; तिप्च्या पित्त्वाने विकरणस्वर शेष.

५ लृट् शेषे च।३।३।१३। ने लृट् लकार; मिप्; सार्वधातुकसंज्ञा; स्यतासी लृलुटोः।३।१।३३। ने 'स्य' विकरण; आद्युदात्तश्च।३।१।३। उदात्त; धातुस्वराचा निघात; 'स्य' ला आर्धधातुकसंज्ञा; आर्धधातुकस्येड्वलादेः।७।२।३५। ने इडागम व तो अनुदात्त; धातूला गुण, अवादेश; मिप्च्या पित्त्वामुळे विकरणस्वर शेष.

६ सार्वधातुके यक्।३।१।६७। ने यक्; वचिस्वपियजादीनां किति।६।१।१५। ने संप्रसारण प्राप्त पण; वाच्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति या परिभाषेने संप्रसारण झाले नाही; 'अन्ते' प्रत्यय अदुपदेशाने 'तास्यनुदात्तेन्ङिदु०।६।१।१८६। ने अनुदात्त विकरणस्वर शेष.

७ रुधादिभ्यः श्नम्।३।१।७८। ने श्नम्; विकरणस्वर उदात्त; इतश्च।३।४।१००। ने तिप्च्या इकाराचा लोप; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५। ने अडागाचा अभाव; हल्ङ्याब्भ्योदीर्घात्सुत्यपृक्तस्य।६।१।६८। ने तकारलोप; विकरणस्वर शेष.

१७) वृणक्षि[१] — प्रस्तुत तिङन्त 'वृजी वर्जने' या 'रुधादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

१८) कृणव:[२] — प्रस्तुत तिङन्त 'कृञ् हिंसायाम्' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

१९) कृणोति[३] — प्रस्तुत तिङन्त 'कृञ् हिंसायाम्' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

२०) सपर्यामि[४] — प्रस्तुत तिङन्त 'सपर पूजायाम' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन.

२१) विदत्[५] — प्रस्तुत तिङन्त 'विद्लृ लाभे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

२२) दुवस्यन्ति[६] — प्रस्तुत तिङन्त 'दुवस् परितापपरिचरणयो:' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

२३) स्पृशन्ति[७] — प्रस्तुत तिङन्त 'स्पृश संस्पर्शे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

---

१ रुधादिभ्य: श्नम्।३।१।७८। ने श्नम् विकरणस्वर उदात्त; सिप् अनुदात्त; व्रश्चभ्रस्जसृज०।८।२।६६ ने जकाराचा षत्व; षढो: क सि:।८।२।४१।ने षकाराचे कत्व व क + षि = क्षि तयार. विकरणस्वर शेष.

२ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरण व्यत्यय किंवा क्रयादिभ्य: श्ना।३।१।८१। ने 'श्न' विकरण स्वर उदात्त; लेटोऽडाटौ।३।४।९४ ने अडागम व अनुदात्त; श्नाभ्यस्तयोरात:।६।४।११२। ने आकारलोप; उदात्तयणो०।६।१।१७४ ने अडागम उदात्त: विकरणस्वर.

३ स्वादिभ्य: श्नु।३।१।७३। ने श्नु विकरणस्वर उदात्त; तिप्च्या अनुदात्ताने विकरणस्वर शेष.

४ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक्, धातुस्वराचा बाध होऊन विकरणस्वर उदात्त; सिप्च्या अनुदात्तत्वाने विकरणस्वर शेष.

५ इतश्च।३।४।१००। ने इकारलोप; पुषादिद्युताद्लृदित: परस्मैपदेषु।३।१।५५। ने च्लिस्थानी अङादेश; व तो आद्युदात्त; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५ ने अडागमाचा अभाव; विकरणस्वर शेष.

६ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक् विकरणस्वर उदात्त; 'अन्ति' प्रत्यय 'अदुपदेशामुळे' 'तास्यनुदात्ते०।६।१।१८६ ने अनुदात्त व विकरणस्वर शेष

७ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने 'श' विकरणस्वर उदात्त; 'अन्ति' प्रत्यय अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङि।६।१।१८६ ने अनुदात्त होऊन विकरणस्वर शेष.

२४) विदा:[१] — प्रस्तुत तिङन्त 'विद्लृ लाभे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

२५) चृतन्ति[२] — प्रस्तुत तिङन्त 'चृती हिंसाग्रन्थनयो:' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

२६) इच्छन्त[३] — प्रस्तुत तिङन्त 'इष इच्छायाम्' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

२७) सृजत्[४] — प्रस्तुत तिङन्त 'सृज विसर्गे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

२८) जुनासि[५] — प्रस्तुत तिङन्त 'जु गतौ' या 'सौत्र धातूचे' प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

२९) सपर्यान्[६] — प्रस्तुत तिङन्त 'सपर पूजायाम्' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

३०) जुषस्व[७] — प्रस्तुत तिङन्त 'जुषी प्रीतिसेवनयो:' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

---

१ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने 'श' विकरणस्वर; लेटोऽडाटौ।३।४।९४। ने आडागम व अनुदात्त; इतश्च लोप: परस्मैपदेषु।३।४।९७। ने सिप्च्या इकाराचा लोप; विकरणस्वर शेष.

२ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने 'श' विकरणस्वर; अदुपदेशाने प्रत्यय अनुदात्त व विकरणस्वर शेष.

३ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने व्यत्ययाने आत्मनेपद; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।३।७५। ने अडागमाभाव;विकरणस्वर शेष.

४ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने 'श' विकरण व विकरणस्वर उदात्त; इतश्च।३।४।१००। ने इकारलोप; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५। ने अडागमाभाग व विकरणस्वर शेष.

५ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन कर्तरि शप्।३।१।६८। च्या शपाचा बाध करुन 'श्ना' व विकरणस्वर उदात्त; सिप्च्या पित्त्वादनुदात्तामुळे विकरणस्वर शेष.

६ कड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक् प्रत्यय विकरण, लिङर्थे लेट्।३।४।७। ने लेट्; झोऽन्त।७।१।३। ने अन्तादेश आडागम व तो अनुदात्त, लेटोऽडाटौ। ने ३।४।९४। इतश्च लोप: परस्मैपदेषु।३।४।९७ ने विकल्पाने इकारलोप संयोगान्तस्य लोप:।८।२।२३। ने तकारलोप; सवर्णदीर्घ; विकरणस्वर शेष.

७ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने श विकरण; क्ङिति च।१।१।५। ने गुणनिषेध; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्ल०।६।१।१८६ ने 'स्व' अनुदात्त; त्यामुळे विकरणस्वर शेष.

| | |
|---|---|
| ३१) युनज्मि[१] | प्रस्तुत तिङन्त 'युजिर योगे' या 'रुधादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन. |
| ३२) वृज्यते[२] | प्रस्तुत तिङन्त 'वृजी वर्जने' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन. |
| ३३) शोभसे[३] | प्रस्तुत तिङन्त 'शुभ शोभार्थे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन. |
| ३४) ऋणधत्[४] | प्रस्तुत तिङन्त 'ऋधु वृद्धौ' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन. |
| ३५) तुज्यते[५] | प्रस्तुत तिङन्त 'तुज हिंसायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन. |
| ३६) चियन्तु[६] | प्रस्तुत तिङन्त 'चिञ् चयने' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन. |
| ३७) जुषेथाम्[७] | प्रस्तुत तिङन्त 'जुषी प्रीतिसेवनयो:' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन. |

---

१ रुधादिभ्य: श्नम्।३।१।७८। ने श्नम् विकरण; विकरणस्वर उदात्त; मिपूच्या पित्त्वानुदात्तामुळे विकरणस्वर शेष.

२ सार्वधातुके यक्।३।१।६७। ने यक्; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्व०।६।१।१८६ ने 'ते' प्रत्यय अनुदात्त; म्हणून विकरणस्वर शेष.

३ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने श; 'वाच्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति' या परिभाषेने गुणनिषेध असताना गुण; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिददु०।६।१।१८६ ने 'से' प्रत्यय अनुदात्त; त्यामुळे विकरणस्वर शेष.

४ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने बहुलेकरुन श्नम् विकरण; लेटोऽडाटौ।३।४।९४। ने अडागम व अनुदात्त इतश्च लोप: परस्मैपदेषु।३।४।९७। ने विकल्पाने इकारलोप; त्यामुळे विकरणस्वर शेष.

५ सार्वधातुके यक्।३।१।६७। ने यक्; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्व०।६।१।१८६ ने 'ते' प्रत्यय अनुदात्त; म्हणून विकरणस्वर शेष.

६ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन 'स्वादिभ्य: श्नु:।३।१।७३। ने प्राप्त 'श्नु' चा बाध करुन 'श' विकरण; अपित्त्वामुळे क्ङितिच।१।१।५। ने गुण निषेध; अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ।६।४।७७। ने इयङ् आदेश; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्व०।६।१।१८६ ने 'अन्तु' प्रत्यय अनुदात्त; त्यामुळे विकरणस्वर शेष.

७ तुदादिभ्य: श:।३।१।७७। ने 'श' विकरण व उदात्त; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिददु०।६।१।१८६ ने इथाम् प्रत्यय अनुदात्त गुण व विकरणस्वर शेष.

३८) कृणवाम[१] — प्रस्तुत तिङन्त 'कृञ् हिंसायाम्' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

३९) दुवस्यथः[२] — प्रस्तुत तिङन्त 'दुवस् परितापपरिचणयोः'या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन.

४०) शृणोतु[३] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४१) सुनोति[४] — प्रस्तुत तिङन्त 'षुञ् अभिषवे' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४२) पृणाति[५] — प्रस्तुत तिङन्त 'पॄ पालनपूरणयोः' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४३) स्तृणोषि[६] — प्रस्तुत तिङन्त 'स्तृञ् आच्छादने' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

४४) वनोति[७] — प्रस्तुत तिङन्त 'वनु याचने' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४५) ऋणवः[८] — प्रस्तुत तिङन्त 'ऋणु गतौ' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

---

१ स्वादिभ्यः श्नुः।३।१।७३। ने श्नु व उदात्त; आडुत्तमस्य पिच्च।३।४।९२। ने मस् प्रत्यय आडागम व प्रत्यय पित्; अनुदात्तौ सुप्पितौ।३।१।४। ने अनुदात्त; गुण व अवादेश; विकरणस्वर शेष.

२ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक्; व उदात्त; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिदद०।६।१।१८६ ने 'थः' प्रत्यय अनुदात्त; त्यामुळे विकरणस्वर शेष.

३ श्रु धातूला शृ इत्यादिक कार्ये शृणोति प्रमाणे पहा. त.टी.क्र.१३.४, पुढे स्थानिवद्भावाने 'तु' प्रत्यय देखील पित् असल्याने अनुदात्त व विकरणस्वर शेष.

४ पहा कृणोति प्रमाणे त.टी.क्र. १९.३, पृ. क्र.१४४

५ प्वादीनां ऱ्हस्वः।७।३।८०। ने ऱ्हस्व; क्रयादिभ्योः श्ना।३।१।८१। ने श्ना व उदात्त; तिप्च्या अनुदात्तामुळे विकरणस्वर शेष.

६ पहा० – 'कृणोषि' प्रमाणे, त. टी. क्र. १०.१, पृ. क्र.१४३

७ पहा० – वनोषि प्रमाणे, त. टी. क्र. ११.२, पृ. क्र.१४३

८ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन 'श' विकरण; अदुपदेशत्व; त्यामुळे 'तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्व०। ६।१।१८६ ने 'वः' अनुदात्त ''वाच्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति'' परिभाषेने अजन्तांगाचे दीर्घत्व-अभाव; विकरणस्वर शेष.

४६) वच्यते[१] — प्रस्तुत तिङन्त 'वच परिभाषणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४७) सपर्यतः[२] — प्रस्तुत तिङन्त 'सपर पूजायाम्' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष द्विवचन.

४८) रिहन्ति[३] — प्रस्तुत तिङन्त 'रिह कत्थनयुद्धनिन्दाहिंसादानेषु' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प.लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

४९) जुषन्त[४] — प्रस्तुत तिङन्त 'जुषी प्रीतिसेवनयोः' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प.लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

५०) अनक्ति[५] — प्रस्तुत तिङन्त 'अञ्ज् व्यक्तिम्रक्षणकान्तिगतिषु' या 'रुधादिगणस्थ'धातूचे प.प.लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५१) उरुष्यति[६] — प्रस्तुत तिङन्त 'उरुस रक्षणे' या 'कण्ड्वादिगणस्थ'धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५२) पुनाति[७] — प्रस्तुत तिङन्त 'पूञ् पवने' या 'क्र्यादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५३) करिष्यथ[८] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लृट् लकार मध्यम पुरुष बहुवचन.

---

१ पहा० – 'वच्यन्ते' प्रमाणे, त. टी. क्र. १५.६, पृ. क्र.१४३

२ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक् व उदात्त; अदुपदेशत्व त्यामुळे तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशा०।६।१।१८६ ने 'तः' प्रत्यय अनुदात्त व विकरणस्वर शेष.

३ पहा० – 'चृतन्ति' प्रमाणे – त. टी. क्र. २५.२, पृ. क्र.१४५

४ पहा० – 'इच्छन्त' प्रमाणे – त. टी. क्र. २६.३, पृ. क्र.१४५

५ रुधादिभ्यः श्नम्।३।१।७८। ने श्नम्; व उदात्त तिप् पित्त्वामुळे अनुदात्त व विकरणस्वर शेष.

६ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक्; व उदात्त तिप् च्या पित्त्वानुदात्तामुळे विकरणस्वर शेष.

७ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक्; व उदात्त तिप् च्या पित्त्वानुदात्तामुळे विकरणस्वर शेष.

८ लृट् शेषे च।३।३।१३। ने लृट्, 'थ' प्रत्यय; स्यतासी लृलुटोः।३।१।३३ ने 'स्य' विकरण व त्याने धातुस्वराचा बाध करुन उदात्त; आर्धधातुकसंज्ञेने ऋद्धनोःस्ये।७।२।७० ने इडागम व तो अनुदात्त; गुण रपर; अदुपदेशत्वाने तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्व.।६।१।१८६ ने 'श' प्रत्यय अनुदात्त; विकरणस्वर शेष.

५४) कृणोमि[१] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन.

५५) पृच्छामि[२] — प्रस्तुत तिङन्त 'प्रच्छ ज्ञीप्सायाम्' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन.

५६) रिणाति[३] — प्रस्तुत तिङन्त 'री गतिरेषणयो:' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५७) मृळत[४] — प्रस्तुत तिङन्त 'मृड सुखने' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन.

५८) मिनाति[५] — प्रस्तुत तिङन्त 'मीञ् हिंसायाम्' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५९) विपन्यामहे[६] — प्रस्तुत तिङन्त 'विपन स्तुतौ' या 'कण्ड्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

६०) जुरतम्[७] — प्रस्तुत तिङन्त 'जॄ वयोहानौ' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष द्विवचन.

६१) जुनाम[८] — प्रस्तुत तिङन्त 'जु गतौ' या 'सौत्र' धातूचे प.प. लोट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

---

१ पहा. - कृणोति-प्रमाणे- त.टी.क्र. १९.३, पृ. क्र.१४४

२ तुदादिभ्य:श:।३।१।७७। ने श विकरण व उदात्त, श च्या अपित्त्वामुळे ङित्त्व 'ग्रहिज्यावयि.।६।१।१६ ने संप्रसारण पूर्वरूप, मिप्च्या पित्त्वामुळे विकरण स्वर शेष.

३ पहा. - 'पृणाति' प्रमाणे - त.टी.क्र. ४२.५, पृ. क्र.१४७

४ तुदादिभ्य:श:।३।१।७७। ने श विकरण व उदात्त, ''द्वयोचास्य स्वरयोर्मध्यमेत्य सम्पद्यते स डकारो ळकार:'' ऋक्.प्राति.१।२१।२। ने डकाराचा ळकार; अदुपदेशत्वाने 'त' प्रत्यय अनुदात्त; त्यामुळे विकरणस्वर शेष.

५ पहा. - 'पृणाति' प्रमाणे - त.टी.क्र. ४२.५, पृ. क्र.१४७

६ कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७। ने यक् व उदात्त; अदुपदेशाने 'महे' प्रत्यय तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१।१८६। ने अनुदात्त; अत्तो दीर्घो यञि।७।३।१०१। ने दीर्घ; विकरणस्वर शेष.

७ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन 'श' विकरण व विकरणस्वर उदात्त; बहुलं छन्दसि।७।१।१०३। ने ओष्ठ्यपूर्वक नसताना ही बहुलेकरुन 'जॄ' धातूला 'उद्' आदेश; अदुपदेशत्वाने 'तम्' प्रत्यय अनुदात्त व विकरण स्वर शेष.

८ आडुत्तमस्य पिच्च।३।४।९२। ने आडागम होऊन 'आम' प्रत्यय पित् व अनुदातौ सुप्पितौ।३।१।४। ने तो अनुदात्त; व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरण व्यत्यय येऊन 'श्ना' विकरण; व धातुस्वराचा बाध करुन उदात्त; अक: सवर्णे दीर्घ:।६।१।१०१। ने दीर्घरुपैकादेश व एकादेश उदात्तेनोदात्त।८।२।५। ने उदात्त; त्यामुळे विकरणस्वर शेष.

६२) वृश्च[१] — प्रस्तुत तिङन्त 'ओव्रश्चू छेदने' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

६३) क्षपः[२] — प्रस्तुत तिङन्त 'क्षप क्षान्त्याम्' या 'चुरादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन.

६४) वेविज्यते[३] — प्रस्तुत तिङन्त 'ओविजी भयचलनयोः' या 'तदादिगणस्थ' धातूचे आ.प. यङन्त, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

६५) सनेम[४] — प्रस्तुत तिङन्त 'षण संभक्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

६६) दद[५] — प्रस्तुत तिङन्त 'दद दाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

६७) करिष्यसि[६] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लृट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

## २.७ मूल्यमापन :

धातुस्वरानंतर आढळून येणारा स्वर म्हणजे 'विकरणस्वर' लट्, लोट्, लङ् व विधिलिङ् या चार लकारात विकरणे होतात. तर 'लेट्' या वैदिक लकारात बहुलेकरून विकरणे होतात.[७] प्रस्तुत प्रकरणात विकरणस्वर हा तुदादिगणस्थ धातू, दिवादिगणस्थ धातू,

---

१ तुदादिभ्यः शः।३।१।७७। ने श विकरण व उदात्त; ग्रहिज्यावयिव्यधिवष्टिविचतिवृश्चति.।६।१।१६ ने संप्रसारण; संप्रसारणाच्च।६।१।१०८। ने पूर्वरूप; अतो हेः।६।४।१०५। ने हिलोप; विकरणस्वर शेष.

२ इतश्च।३।४।१००। ने सिपच्या इकाराचा लोप; व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन 'श' विकरण व उदात्त; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५। ने अडागमाचा अभाव; विकरण स्वर शेष.

३ धातोरेकाचो हलादेः क्रियासमभिहारे यङ्।३।१।२२ ने यङ्; आद्युदात्तश्च।३।१।३। ने उदात्त; सन्यङो।६।१।९। ने द्वित्व; गुणो यङ्लुकोः।७।४।८२। ने गुण; अदुपदेशत्वाने 'ते' प्रत्यय तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६ ने अनुदात्त; विकरणस्वर शेष.

४ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन 'श' विकरण व उदात्त; नित्यं ङितः।३।४।९९ ते मसच्या सकराचा लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१४३। ने यासुडुदात्त; अतो येयः।७।२।८०। इयादेश व 'इम' प्रत्यय अदुपदेशत्वाने तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६। ने अनुदात्त, विकरणस्वर शेष.

५ व्यत्ययो बहुलम्।३।९।८५ ने शप् विकरणाचा बाध करून 'श' विकरण; विकरणस्वर; तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'हि' प्रत्यय अनुदात्त; अतो हेः।६।४।१०५ ने हिलोप; विकरणस्वर शेष.

६ पहा. – 'करिष्यथ' प्रमाणे – त.टी.क्र. ५३.८, पृ. क्र.१४८

७ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५

चुरादिगणस्थ धातू तसेच धातुसाधित धातू व नामसाधित धातू, कर्मणी यक् प्रत्ययान्त धातू यांच्या मध्ये विकरणस्वर आढळतो.

वास्तविक पाहता विकरणस्वर हा सतिशिष्ट स्वर होऊन प्रत्यय स्वरापेक्षा बलवान होत नाही,असा वार्तिककारांचा नियम आहे.[१] त्यानुसार विकरणस्वर आढळणे शक्य नाही. पण या नियमास ''श, श्यन्, अय (णिच् शप्) यङ्, क्यच्, यक्, स्य, तास्'' ही विकरणे अपवाद ठरतात. हे पुढील वर्गीकरणावरुन स्पष्ट करता येते -

१) **नित् विकरणस्वर -**

नित् विकरणस्वराचा विचार करताना येथे 'दिवादिगणस्थ' धातूंचा समावेश होतो. येथे श्यन् असे नित् विकरण होते. नित् स्वराने आद्युदात्त बनते.[२] धातू व विकरण मिळून अंग संज्ञा आहे. त्यामुळे 'श्यन्' विकरणामुळे धातू अदुपदेश होतात व त्यापुढील अपित् प्रत्यय उदात्त न होता अनुदात्तच राहतात. त्यामुळे श्यन् विकरणान्त तिङन्त जरी आद्युदात्त दिसत असली, तरी तेथे विकरणस्वर असतो. यावरून पुढील नियम मांडता येईल -

- ''दिवादिगणस्थ धातूंपुढे लसार्वधातुक प्रत्यय असताना विकरणस्वर असून ती तिङन्ते आद्युदात्त[३] असतात.''

उदा. सिध्यति, ईयते, जायते, अस्यथ, पुष्यति, विध्यत्, जायेमहि, मन्यसे, ईयसे, रीयते, पुष्यसि.

२) **चित्-विकरणस्वर -**

चित्-विकरणस्वरात १) चुरादिगणस्थ धातू, २) ण्यन्त अर्थात प्रयोजक रूपे, ३) नामधातू या तीन उपप्रकारांचा समावेश होतो. यातील एकेकाचा विचार करू.

१) ''चुरादिगणस्थ धातूंपुढील लसार्वधातुक प्रत्ययस्वरांचा बाध होऊन विकरणस्वर आढळतो.''

उदा. जंभय, बर्हय:, स्तनयन्ति, अर्थयासे, मादयस्व, मादयध्वम्, चोदयासि, मादयासे, मादयथे, पारयात्, मर्चयति, छदयाथ, चितयन्ते, पारय, जंभयतम्, अर्दयत्.

---

१ पहा. - प्रक. ३, पृ. क्र.१६०

२ ञ्नित्यादिर्नित्यम्।६।१।१९७

३ आद्युदात्त म्हटले कारण येथे सामान्य विकरणप्रत्ययस्वराने उदात्त न होतो, 'ञ्नित्यादिर्नित्यम्।६।१।१९७' ने अंगाचा आदिस्वर उदात्त हातो; म्हणून.

२) "प्रयोजक रूपांमध्येही लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होऊन विकरणस्वर आढळतो."

उदा. सादय, वर्तयथ, तर्पय, रमयत्, सूदयत्, इषयन्त, ईंखयन्ति, शुभयन्ते, वर्धयामः, धापयेते, वर्धयतम्, ईक्षयत्, रणयन्त, नदयन्त, स्पाशयस्व, इलयत.

३) "नामसाधित धातूपुढील लसार्वधातुक प्रत्ययाच्या स्वराचा बाध होऊन क्यच् विकरणस्वर शेष राहतो."

उदा. वाजयामः, चनस्यतम्, नमस्यन्ति, पृतन्यसि, वृषायसे, मुषायत्, नमस्यन्त, अघायति, प्रुषायन्ते, मथायति, दशस्यतम्, गातुयन्ति, प्रुषायन्त, अपस्यात्.

वरील तीनही प्रकारात अय (णिच् + शप्) असेच अदन्त अंग तयार होते; त्यामुळे त्यापुढील तस् वगैरे अपित् प्रत्यय जे प्रत्ययस्वराने उदात्त होणार होते; ते अनुदात्त राहतात[१] व विकरणस्वर शेष.

### ३) सामान्य विकरणस्वर -

सामान्य विकरणस्वर हा विकरणप्रत्ययस्वर 'आद्युदात्त'[२] सूत्रानेच उदात्त राहतो. यामध्ये तुदादिगणस्थ, कण्ड्वादिगण, स्वादिगण, रुधादिगण, तनादिगण, क्र्यादिगण, कर्मणी रूपे यांचा समावेश होतो, ते क्रमशः पाहू.

१) "तुदादिगणस्थ धातूंपुढील लसार्वधातुक प्रत्ययस्वर स्वराचा बाध होऊन विकरणस्वर आढळतो."

उदा. सृजामि, सृज, विदत्, स्पृशन्ति, विदाः, चृतन्ति, इच्छन्त, सृजत्, जुषस्व, शोभसे, जुषेथाम्, रिहन्ति, जुषन्त, पृच्छामि, मृळत, वृश्च.

२) "कण्ड्वादिगणस्थ धातूंपुढील लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होऊन विकरणस्वर शेष राहतो."

उदा. इरज्यति, सपर्यति, सपर्यामि, दुवस्यन्ति, सपर्यान्, दुवस्यथः सपर्यतः, उरुष्यति, विपन्यामहे.

---

१ तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्व.६।१।१८६ ने अनुदात्त होतात.

२ पा. सू. ३।१।३

३) "स्वादिगण, रुधादिगण, तनादिगण, क्रयादिगण यातील धातूंमुढे पित्[१] लसार्वधातुक प्रत्यय असताना विकरणस्वर आढळतो."

उदा. अ) स्वादिगण - हिनोति, शक्नवाम, सुनु, कृणोषि, कृणोति, कृणवाम, शृणोतु, सुनोति, स्तृणोषि.

ब) रुधादिगण - रुणधामहै, भिनत्, वृणक्षि, युनज्मि, अनक्ति,

क) तनादिगण - ऋणोः, वनोषि, वनोति.

ड) क्रयादिगण - पृणाति, पुनाति, रिणाति, मिनाति.

४) "यक्[२] प्रत्ययान्त कर्मणी रूपांमध्ये ही विकरणस्वर आढळतो."

उदा. युज्यसे, वच्यन्ते, वृज्यते, तुज्यते, वच्यते.

५) "लृट् लकारातदेखील 'स्य' कालवाचक विकरणस्वर शेष राहतो."

उदा. स्तविष्यामि, करिष्यथ, करिष्यसि.

६) "यङन्त रूपे देखील विकरणस्वर युक्त असतात."

उदा. वेविज्यते.

## वैदिक नियम

"विकरणव्यत्ययाने जे विकरण होईल, तसा स्वर आढळून येतो"

उदा. जुनासि (क्र्यादि - श्ना), ऋणधत् (श्नम्), चियन्तु (श), ऋणव (श), जुरतम् (श), जुनाम (श्ना), क्षपः (श), सनेम (श), दद (श).

थोडक्यात, असे म्हणता येईल की, 'श्यन्, श, अय (णिच् + शप्), यक् (कड्वादि), यक् (कर्मणी), यङ्, स्य (लृट)' ही विकरणे असताना प्रत्ययस्वराचा बाध[३] होऊन विकरणस्वर शेष राहतो. तर 'श्नु, उ, श्नम्, श्ना' ह्या विकरणांपुढे पित् प्रत्यय

---

१ पित् म्हटले; कारण अनुदात्तौ सुप्पितौ।३।१।४। ने अनुदात्त होतात व विकरणस्वर राहतो. पण 'लसार्वधातुक' म्हटले असते, तर अपित् चे देखील ग्रहण झाले असते, जे येथे अपेक्षित नाही, म्हणून ही अतिव्याप्ती टाळण्यासाठी 'पित्' प्रयोग केला आहे.

२ सार्वधातुके यक् ।३।१।६७

३ 'श्यन्, श, अय, यक्, यङ्, स्य' ही विकरणे लागल्यानंतर धातू अंग अदन्त होते व त्यास अदुपदेश मानून पुढे 'तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६।' ने प्रत्ययस्वराचा बाध होऊन अनुदात्त होतो व विकरणस्वर शेष राहतो.

असतानाच विकरणस्वर आढळतो. तर वेदामध्ये वरील पैकी जे विकरण होईल, त्याप्रमाणे वर सांगितल्याप्रमाणे त्यास नियम लागू होईल. याप्रमाणे विकरणस्वराचा लौकिक व वैदिक प्रयोग सिद्ध होईल.

## प्रकरण तिसरे

# प्रत्यय स्वर


| अ. क्र. | शीर्षक | पृ. क्र. |
|---|---|---|
| ३.० | प्रास्ताविक | १५५ |
| ३.१ | धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर | १५७ |
| ३.२ | विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर | १५७ |
| ३.३ | चित्–प्रत्ययस्वर | १५८ |
| ३.४ | स्वरसाधक सूत्रे व विवेचन | १५९ |
| ३.५ | स्वरसिद्धी प्रक्रिया | १६१ |
| ३.६ | प्रत्यक्ष स्वरसिद्धी | १६१ |
| ३.७ | मूल्यमापन | १८५ |

# प्रकरण तिसरे

## प्रत्यय स्वर

### ३.० प्रास्ताविक -

उदात्त हा मुख्य स्वर तिङन्तावर असताना पडणारे जे विभाग आहेत त्यापैकी धातुस्वर व विकरणस्वर या दोन प्रकारांचा अभ्यास मागील प्रकरणात केलेला आहे. 'विकरणस्वर' या प्रकरणात विकरण म्हणजेच विकरणप्रत्यय असा अर्थ अभिप्रेत होता. मात्र या प्रकरणात प्रत्यक्ष 'प्रत्यय' म्हणून स्वतंत्र असलेल्या प्रत्ययाधिकारात सांगितलेल्या प्रत्ययांचा अभ्यास करावयाचा आहे. या प्रत्ययस्वराची कक्षा फार विस्तीर्ण आहे. कारण प्रत्ययाधिकार[१] हा तीन, चार व पाच या तीन अध्यायांना व्यापणारा आहे. या तीन अध्यायात एकूण सूत्रे १८२१ आहेत. म्हणजे अष्टाध्यायीचा सुमारे निम्मा भाग प्रत्ययाधिकाराने व्यापलेला आहे.[२] या पूर्ण भागातील उक्त प्रत्ययांना त्यांचा प्रथम स्वर उदात्त असतो,[३] असा सर्वव्यापक नियम घालून दिलेला आहे. अर्थात यास पित्, चित्, नित्, ञित्, रित्, लित् वगैरे इत्संज्ञक वर्ण असलेले प्रत्यय अपवाद आहेत, तरी या प्रत्ययस्वराचे क्षेत्र व्यापक आहे, असे म्हणणे गैर ठरत नाही.

या प्रकरणात प्रत्ययाधिकारातील जे तिङ्[४] प्रत्यय यांचाच येथे विचार केला गेला आहे. कारण तिङ् प्रत्यय लागून तयार होणाऱ्या तिङन्तांचाच अभ्यास करणे आहे. तेव्हा या तिङ् प्रत्ययात १८ प्रत्ययांचा समावेश होतो.[५] पैकी 'तिप्, सिप्, मिप्' हे परस्मैपदी[६] पित् असल्यामुळे अनुदात्त ठरतात, येथे प्रत्ययस्वराचा बाध होतो. तर उरलेले 'तस्, झि, थस्, थ, वस्, मस्' हे सहा प्रत्यय प्रत्ययस्वराने उदात्त होतात. तर उरलेले 'तङ्' प्रत्याहारातील ९ प्रत्यय आत्मनेपद[७] संज्ञक असून अपित् असल्याने तेही उदात्तच होतात. शिवाय 'झि' स्थानी

---

१ प्रत्ययः। पा. सू. ३।१।१।

२ पाणिनीय व्याकरणाचे अंतरंग, वा. बा. भागवत, पृ. क्र. २१,

३ आद्युदात्तश्च। पा. सू. ३।१।३।

४ तिप्तस्झिसिप्थस्थमिब्वस्मस्ताऽताञ्झथासाथान्ध्वमिड्वहिमहिङ् । पा. सू. ३।४।७८

५ 'एते अष्टादशलादेशाःस्युः' पहा. वरदराज, ल. सि. कौ. संपा. पं. हरेकान्तमिश्र, पृ. क्र. २५२.

६ लः परस्मैपदम्। पा. सू. १।४।९९

७ तङानावात्मनेपदम्। पा. सू. १।४।१००

अन्तादेश होतो[१] व 'अन्ति' प्रत्यय प्रत्यय होतो. वास्तविक पाहता प्रत्ययस्वराने 'झि' आद्युदात्त होऊन 'अन्ति' हा प्रत्यय अन्तोदात्त व्हावयास पाहिजे, पण तसे होत नाही. कारण दोन्ही कार्ये एकदम प्राप्त झाली असताना परत्त्वामुळे[२] अन्तादेश प्रथम होतो व प्रत्ययस्वराने आद्युदात्त होऊन सिद्धी होते. तसेच लिङ् लकारात होणारा यासुट् आगम हा उदात्त असतो.[३] त्यामुळे होणारे ''यात् याताम् युः'' इत्यादी प्रत्यय आगमामुळे जरी उदात्त होत असले तरी ते प्रत्यय म्हणून ओळखले जातात, म्हणून त्यांच्या बाबतीत प्रत्ययस्वर सांगितला आहे.

लोट् लकारात तिप्प्रत्ययाच्या ठिकाणी उकारादेश होतो[४] व 'तु' हा प्रत्यय तयार होतो. पण हा प्रत्यय उदात्त होत नाही; कारण तिप् च्या स्थानी हा झाल्याने स्थानिवद् तो समजून अनुदात्तच राहतो. यास ज्ञापक 'सेर्ह्यपिच्च'[५] हे सूत्र आहे. कारण जर असे स्थानिवद्भावाने[६] अनुदात्त स्वरत्व येत नसते तर सूत्रात 'अपित्' म्हणण्याचे कारणच नव्हते. पण 'अपित्' म्हटल्याने हे सिद्ध होते की, 'हि' हा सिप् च्या स्थानी होत असल्याने तो देखील पित् समजला जाऊन अनुदात्त होऊ नये. तर तो प्रत्ययस्वराने उदात्त व्हावा. म्हणूनच 'हि' प्रत्यय उदात्त होतो.

याचप्रमाणे लोट् लकारातच उत्तम पुरुषास आडागम सांगितला आहे व तो पित् म्हटला आहे[७]. त्यामुळे 'आनि, आव, आम, ऐ, आवहै, आमहै' हे सहा प्रत्यय पित् होतात. या पित्त्वामुळे धातूमध्ये विशेष गुणादिक कार्ये घडतात. तसेच स्वराच्या बाबतील हे प्रत्यय सर्वानुदात्त होतात. येथे शंका उत्पन्न होते की, ''वस्, मस्, ए वहि, महि'' हे प्रत्यय तर मूळात अपित् असल्याने ते आद्युदात्त व्हावयास हवेत. तसेच आडागमाच्या पित्त्वामुळे अनुदात्ताची प्राप्ती होते[८], मग संपूर्ण प्रत्ययच कसा अनुदात्त होतो? याचे समाधान असे - जरी 'वस् मसादिक' उदात्ताच्या आदिस्थानी अनुदात्त आडागम होत असला तरी 'आडुत्तमस्य

---

१ झोऽन्तः। पा. सू. ७।१।३।

२ विप्रतिषेधे परं कार्यम्। पा.सू. १।४।२ ने परत्वाने सिद्ध होते किंवा दोन्ही कार्य नित्य असल्याने प्रथम नित्यविधीचा बाध होऊन उत्तरनित्यनिधी होते व 'शब्दान्तरस्य च प्राप्तुवन्विधिरनित्यो भवति' परिभाषेनेही सिद्ध होतो.

३ यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च। पा.सू. ३।४।१०३।

४ एरुः। पा.सू. ३।४।८६

५ पा.सू. ३।४।८७

६ स्थानिवदादेशोऽनल्विधौ। पा.सू. १।१।५६

७ आडुत्तमस्य पिच्च। पा.सू. ३।४।९२

८ अनुदात्तौ सुप्पितौ। पा.सू. ३।१।४ ने अनुदात्त

पिच्च"[१] या सूत्राने अपित् प्रत्ययांना अपवाद सांगितल्याने वस्मसादिप्रत्ययांचा उदात्तस्वर हे अंतरंग कार्यास पित्त्वाचा अपवाद बलवान ठरुन[२] संपूर्ण प्रत्ययच पित् होतो, व हे प्रत्यय सर्वानुदात्त होतात. त्यामुळे तेथे प्रत्ययस्वर आढळत नाही. तेथे धातुस्वर वा विकरणस्वर आढळतो.[३]

थोडक्यात, या प्रकरणात अपित् प्रत्ययांचा विचार करून जे प्रत्यय प्रत्ययस्वराने उदात्त ठरुन धातुस्वराचा बाध करतात त्यांना 'धातुस्वरबाधक' म्हटले तर जे प्रत्यय विकरणस्वराचा बाध करून उदात्त ठरतात, त्यांना 'विकरणस्वरबाधक' म्हटले आहे. याशिवाय चित् प्रत्यय असल्याने त्यासही प्रत्ययस्वरात घेऊन तिङन्तांची विभागणी केलेली आहे.

### ३.१ धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर :

प्रत्ययस्वराने उदात्त झाल्यानंतर तो अदुपदेशादिक[४] कोणत्याही कारणाने अनुदात्त न होता सतिशिष्ट स्वर होऊन बलवान होतो व धातुस्वराचा बाध करुन स्वत: तिङन्तामध्ये उदात्त म्हणून कायम राहतो, त्यास 'धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर' म्हटले आहे.

वास्तविक पाहता स्वरसिद्धी प्रक्रियेप्रमाणे प्रथम धातुस्वर उदात्त[५] होतो व नंतर होणारा प्रत्यय स्वर हा नेहमीच त्याचा बाध करुन उदात्त होतो. पण येथे अदुपदेश, ङित् वा अनुदात्तेत, वगैरे कारणांनी तो अनुदात्त होत नाही असा प्रत्ययस्वर अभिप्रेत आहे. हा प्रत्ययस्वर धातुस्वराचा बाधक ठरतो, व प्रत्ययावर उदात्त स्वर येऊन अन्तोदात्त तिङन्त सिद्ध होते.

### ३.२ विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर :

जेव्हा प्रत्ययस्वर हा त्याच्यानंतर सार्वधातुकात प्राप्त होणाऱ्या शपादिक विकरणस्वरांचा बाध करून स्वत: उदात्त राहतो, तेव्हा त्यास 'विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर' म्हटले आहे.

---

१ पा.सू. ३।४।९२

२ "पूर्वपरनित्यान्तरङ्गापवादनामुत्तरोत्तर बलीय:।" परिभाषिक:, वै. पुस्त. अजमेर, पृ. क्र. ४०

३ पहा. - विकरणस्वर - रुणधामहै पृ. क्र. १४१ शक्नवाम - पृ. क्र. १४२

४ तास्यनुदात्तेन्ङिददु.।६।१।१८६ ने अनुदात्त होतात, ते नियम लागू न होणारे प्रत्यय अभिप्रेत आहेत.

५ धातो:। पा.सू. ६।१।१६२

प्रस्तुत प्रत्ययस्वराचा प्रकार विकरणस्वराचा बाध करणाऱ्या वार्तिकावरून पडलेला आहे. स्वरप्रक्रियेनुसार प्रथम धातुस्वर त्यानंतर प्रत्यय व प्रत्ययस्वर, त्यानंतर सार्वधातुक संज्ञेने विकरणस्वर प्राप्त होतो. पण प्रत्ययस्वर उदात्त असताना प्राप्त विकरणस्वर हा सतिशिष्ट ठरतो व तो प्रत्ययस्वराचा बाध करेल; तसे होऊ नये म्हणून वार्तिककारांनी हा सतिशिष्टतेचा नियम विकरणस्वराला सांगितला नाही.[१] त्यामुळे विकरणस्वर हा प्रत्ययस्वरापेक्षा बलवान न ठरल्याने प्रत्ययस्वर त्याचा बाध करून स्वत: उदात्त होतो व ही तिङन्ते देखील अन्तोदात्तच सिद्‌ध होतात.

### ३.३ चित्-प्रत्ययस्वर :

'च्' हे इत् संज्ञक व्यंजन ज्या प्रत्ययास लावले आहे, तो प्रत्यय अन्तोदात्त होतो[२], तेव्हा त्यास 'चित्-प्रत्ययस्वर' म्हटले जाते.

मागील 'विकरणस्वर' या प्रकरणात सांगितलेला व हा चित् प्रत्यय स्वर हा फारसा फरक नाही. फक्त मागील प्रकरणातील स्वर हा विकरणप्रत्ययासाठी सांगितलेला होता. हा प्रत्ययास सांगितलेला आहे. थोडक्यात चित् प्रत्यय हा सामान्य प्रत्ययस्वराचा बाध करतो. म्हणून त्याचे स्वतंत्र ग्रहण केले आहे. तिङन्तात हा चित् प्रत्यय बहूत करून लिट् लकाराच्या आत्मनेपदी प्रत्ययात आढळतो[३]. लिट् लकारात धातूला द्वित्व अभ्यासादिक कार्ये होतात. पण हे प्रत्यक्ष आर्धधातुक[४] संज्ञक असल्याने अभ्यास उदात्त होत नाही, प्रत्ययावरच उदात्त स्वर राहतो. म्हणून याचे या प्रकरणात ग्रहण केले आहे. तर णलादिक लित् प्रत्ययस्वराचे या प्रकरणात ग्रहण केले नाही. कारण लित् स्वराने द्वित्व भागातील दुसऱ्या भागास उदात्त होतो[५] जो 'अभ्यस्त' संज्ञक[६] असतो. म्हणून त्याचा संग्रह 'अभ्यस्तस्वर' या पुढील प्रकरणात समावेश केला आहे.

---

१ पहा. सार्थ विवेचन पृ. क्र.१६०
२ चित:। पा.सू. ६।१।१६३
३ लिटस्तझयोरेशिरेच्। पा.सू. ३।४।८१
४ लिट् च। पा.सू. ३।४।११५
५ लिति:। पा.सू. ६।१।१९३
६ उभे अभ्यस्तम्। पा.सू. ६।१।५

## ३.४ स्वरसाधक सूत्रे व विवेचन :

अ) आद्युदात्तश्च[१]।३।१।३

ब) चित:[२]।६।१।१६३

क) **'अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८।'**

पदामध्ये ज्या अक्षराला उदात्त अथवा स्वरित सांगितला असेल तर ते अक्षर सोडून बाकीची त्या पदातील अक्षरे अनुदात्त होतात[३].

स्वरविधि-विषयक हे परिभाषा सूत्र आहे. येथे 'पदम् एकवर्जम्' या पदाचा 'एक पद वगळून' असा अर्थ न घेता, 'एका पदामध्ये ज्याला उदात्त वा स्वरित सांगितलेला आहे ते 'एकपद वगळून' असा अर्थ समजावा. त्यामुळे जेव्हा धातुस्वर अन्तोदात्त होतो[४] व त्यानंतर प्रत्यय होऊन तो प्रत्ययस्वर उदात्त होतो[५] तेव्हा एकाच पदात दोन उदात्तांची प्राप्ती होते. तेव्हा मागाहून सांगितलेला स्वर उदात्त राहून प्रस्तुत परिभाषेने उर्वरित सर्व पदे अनुदात्त होतात व प्रत्ययस्वर कायम राहतो.

थोडक्यात प्रस्तुतचे परिभाषा सूत्र स्वरविषयक नियम सांगणाऱ्या प्रत्येक सूत्रांना उपयोगी पडणारे आहे. त्यामुळे शब्दात सांगितलेला विशिष्ट असा जो आद्युदात्त, मध्योदात्त, अन्तोदात्त वा स्वरित स्वर असेल त्या स्वराबरोबरच राहिलेले इतर स्वर अनुदात्त होऊन तो विशिष्ट स्वर कायम राहतो.

पण पदामध्ये जेव्हा एक उदात्त पूर्वीच प्राप्त झालेला असताना दुसरा उदात्त वा स्वरित प्राप्त होतो, तेव्हा प्रस्तुत परिभाषेने नक्की कोणता स्वर शेष राहून बाकीचे अनुदात्त होणार हे स्पष्ट केलेले नाही, म्हणून पुढील वार्तिकाची गरज भासते -

---

१ सार्थ विवेचन पृ. क्र. १२८

२ सार्थ विवेचन पृ. क्र. १२८

३ "यस्मिन् पदे यस्योदात्तः स्वरितो वा विधीयते तमेकमचं वर्जयित्वा शेषं तत्पदम् अनुदात्ताच्कंस्यात्" पहा. भट्टोजी दीक्षितकृत वृत्ती, वै.सि.कौ., संपा का. वा. अभ्यंकर, ऑगस्ट १९७२, पृ. क्र. १, भाग ६

४ धातोः। पा.सू. ६।१।१६२

५ अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८ वरील वार्तिक, पहा. वै.सि.कौ., संपा का.वा.अभ्यंकर, भाग ६,ऑगस्ट १९७२, पृ.क्र.२

### ड) सतिशिष्टस्वरबलीयस्त्वमन्यत्र विकरणेभ्य इति वाच्यम्[१] (वा.)

एक स्वर उदात्त वा स्वरित असताना (सति) मागाहून सांगितलेला (शिष्ट) दुसरा स्वर पूर्वीच्या स्वरापेक्षा अधिक बलवान होतो. विकरणस्वराला मात्र हा नियम लागू होत नाही, असे विधान करावे.[२]

प्रस्तुत वार्तिकाचे विवेचन दृष्ट्या दोन भाग करणे आवश्यक आहे. 'सतिशिष्ट स्वर हा पूर्वीच्या स्वरापेक्षा बलवान असतो', हा एक भाग झाला. तर 'विकरणस्वराला हा नियम लागू होत नाही' हा दुसरा भाग. प्रथमतः पहिल्या भागाचा विचार करू. एकाच पदात दोन उदात्त व स्वरित प्राप्त असताना व प्रस्तुत वार्तिकानुसार मागाहून सांगितलेला म्हणजे सतिशिष्ट बलवान ठरतो व पूर्वीचा स्वर 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[३] ने अनुदात्त होतो.

वार्तिकाचा दुसरा भाग महत्त्वाचा आहे. याने विकरणस्वराचा बाध केला आहे. कारण सार्वधातुकात प्रत्ययानंतर धातूहून विकरण होते[४]. त्यामुळे प्रत्ययस्वर आद्युदात्त असताना (सति) मागाहून सांगितलेला विकरणस्वर (शिष्ट) बलवान ठरू लागतो; पण तसे होऊ नये म्हणून हा निषेध सांगितला आहे. त्यामुळे प्रत्ययस्वरच बलवान ठरून ते तिङन्त अन्तोदात्त होते.

हा विकरणस्वराचा निषेध मात्र श, श्यन्, अय[५], य[६] वगैरे अदन्त विकरणांना लागू होत नाही; कारण या विकरणासह धातूचे अंग अदुपदेश मानले जाऊन त्यापुढील प्रत्यय उदात्त न होता अनुदात्त होतो[७]; त्यामुळे या विकरणस्वरांचा बाध होत नाही व तेथे विकरणस्वर आढळतो.

---

१ पहा. - मराठी भाषांतर, वै.सि.कौ., संपा का. वा. अभ्यंकर, भाग ६,ऑगस्ट १९७२, पृ. क्र. २

२ पहा. - मराठी भाषांतर, वै.सि.कौ., संपा का. वा. अभ्यंकर, भाग ६,ऑगस्ट १९७२, पृ. क्र. २

३ पा.सू. ६।१।१५८

४ 'कर्त्रर्थे सार्वधातुके परे धातोः शप् स्यात्' कर्तरि शप्।३।१।६८ या वरील वरदराज यांची वृत्ती, यात य, श्यन्, इ. विकरणे शपाची बाधक आहेत. त्यावरून धातूहून होते.

५ पहा. विकरणस्वर, पृ.क्र. १२७

६ 'य' पदाने येथे सार्वधातुके यक्।३।१।६७, व कण्ड्वादिभ्यो यक्।३।१।२७, धातोरेकाचो हलादेः क्रियासमभिहारे यङ्।३।१।२२ यांचा अंतर्भाव केला आहे. तर 'वगैरे' पदाने स्यतासी लृलुटोः।३।१।३३ ते 'स्य' चा अंतर्भाव केला आहे. 'स्य' हे कालविकरण आहे. इतर गणविकरणे आहेत.

७ तास्यनुदात्तेन्ङिद०। पा. सू. ६।१।१८६

पण श्नु, श्नम्, उ, श्ना या विकरणांनाच हा नियम लागू होतो व प्रस्तुत वार्तिकाने प्रत्ययस्वर बलवान ठरून विकरस्वराचा बाध होतो. यावरूनच विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर हा प्रकार मानला आहे.

**३.५ स्वरसिद्धी प्रक्रिया :**

प्रथम धातुस्वर उदात्त होतो; त्यानंतर विकरणालोपादिक कारणांमुळे प्रत्ययस्वर उदात्त राहतो. तर दुसऱ्या विकरणस्वर बाधक प्रकारात धातुस्वर उदात्त झाल्यानंतर प्रत्ययस्वर होतो व तो धातुस्वराचा बाध करून कायम राहतो नंतर होणारे विकरण व स्वर सतिशिष्ट ठरून प्रत्ययस्वराचा बाध करतात पण विकरणस्वराचा बाध होऊन प्रत्ययस्वर शेष राहतो. तर तिसऱ्या प्रकारात धातुस्वरानंतर होणारा प्रत्ययस्वर हा आद्युदात्त न होता, चित्त्वामुळे अन्तोदात्त होऊन शेष राहतो बाकीच्या स्वरांचा निघात होतो.

**३.६ प्रत्यक्ष स्वरसिद्धी :**

प्रत्यक्ष स्वरसिद्धी पुढील प्रमाणे - ३.१ धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर ३.२ विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर; ३.३ चित्-प्रत्ययस्वर

## ३.१ धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर

| | | |
|---|---|---|
| १) | श्रुधी | प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| | श्रु श्रवणे | भूवादयो धातवः।१।३।१। ने धातुसंज्ञा |
| | श्रु | धातोः।६।१।१६२।[१] ने धातुस्वर उदात्त |
| | श्रु + लोट् | लोट् च।३।३।१६२।[२] ने लोट् आज्ञार्थी |
| | श्रु + सिप् | तिप्तस् झि.।३।४।७८। ने सिप् |
| | श्रु + हि | सेर्ह्यपिच्च।३।४।८७।[३] ने 'हि' आदेश |
| | श्रु + शप् + हि | व्यत्ययो बहुलम्।३।१।८५।[४] ने विकरणव्यत्यय येऊन शप् |
| | श्रु + शप् + हि | आद्युदात्तश्च।३।१।३।[५] ने प्रत्यय उदात्त |
| | श्रु + शप् + हि | अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८। ने प्रत्ययस्वर सतिशिष्ट राहून शेष अनुदात्त |
| | श्रु + हि | बहुलं छन्दसि।२।४।७३।[६] ने शपाचा लोप |
| | श्रुधि | श्रुशृणुपृकृवृभ्यश्छन्दसि।६।४।१०२।[७] ने 'धि' आदेश |
| | श्रुधी | अन्येषामपि दृश्यते।६।३।१३७।[८] ने छान्दस दीर्घत्व व स्वरसिद्धी पूर्ण. |

---

१ सार्थ विवेचन..... पृ. क्र. ७८

२ ''विधि, निमंत्रण, आमंत्रण, अधीष्ट, संप्रश्न आणि प्रार्थना या अर्थी धातूहून लोट् लकार होतो'' यानुसार प्रार्थनार्थी लोट्

३ ''लोटाच्या 'सि' प्रत्ययाच्या ठिकाणी 'हि' आदेश होतो व अपित् होतो'' या अपित्त्वामुळे पुढे प्रत्ययस्वराने उदात्त होईल.

४ ''वेदामध्ये विकरणे बहुलेकरुन होतात'' म्हणजे जेथे जे विकरण उक्त आहे तेथे ते होतेच असे नाहीतर अनक्त विकरणही होते; यानुसार येथे 'श्नु' होण्याऐवजी 'शप्'

५ सार्थ विवेचन..... पृ. क्र. १२८

६ 'वेदामध्ये शपाचा बहुलेकरुन लोप होतो' यानुसार येथे लोप झाला.

७ श्रु, शृ, णु, पृ, कृ, वृ या धातूंपुढील 'हि' प्रत्ययाला 'धि' असा आदेश होतो त्यानुसार 'धि' आदेश व स्थानिवद्भावाने उदात्त.

८ 'वेदामध्ये इतर शब्दांचा शेवटचा अच् दीर्घ होतो' यानुसार हे तिङन्त दीर्घ.

| | | |
|---|---|---|
| २) | उशन्ति[१] | प्रस्तुत तिङन्त 'वश कान्तौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ३) | विद्याम[२] | प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| ४) | वोचेयुः[३] | प्रस्तुत तिङन्त 'वच परिभाषणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. आशीर्लिङ् प्रथम पुरुष बहुवचन |
| ५) | युक्ष्वा[४] | प्रस्तुत तिङन्त 'युजिर् योगे' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ६) | कृष्वा[५] | प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ७) | विद्मा[६] | प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| ८) | कृधी[७] | प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |

---

१ अदिप्रभृतिभ्य:शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; प्रत्ययस्वराने अन्ति आद्युदात्त;ग्रहिज्यावसिव्यधि.।६।१।१६ ने वश धातूला संप्रसारण; सम्प्रसारणाच्च।६।१।१०८। ने पूर्वरूप एकादेश; प्रत्ययस्वर शेष.

२ अदिप्रभृतिभ्य:शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडागम व तो उदात्त; शेष अनुदात्त; नित्यं ङितः।३।४।९९ ने सकारलोप; 'याम' प्रत्ययस्वर शेष, अनुदात्त मकाराचा उदात्तानुदात्तस्य स्वरितः।८।४।६६। ने स्वरित

३ आशिषि लिङ्लोटौ।३।३।१७३। ने आशीर्लिङ्, झेर्जुस।३।४।१०८। ने जुसादेश; लिङ्याशिष्यङ्।३।१।८६। ने अङ् प्रत्यय व उदात्त; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३। ने यासुडागम व उदात्त; अतो येयः।७।२।८०। ने इयादेश; लोपो व्योर्वलि।६।१।६८। ने यकार लोप; अङ्च्या अदुपदेशत्वाने तास्यनुदात्तेन्ङिददु.।६।१।१८६ ने इयुः प्रत्यय अनुदात्त; म्हणून अङ् प्रत्ययस्वर शेष, वचउम।७।४।३०। ने उमागम व गुण झालेला आहे.

४ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन शप् विकरण व त्याचा 'बहुलं छन्दसि।२।४।७३' ने लोप; चोः कुः।८।२।३०। ने जकारास कुत्व; खरिच।८।४।५५। ने कुत्व; आदेशप्रत्यययोः।८।३।५९। ने 'ष्व' युक् + ष्व = क्ष्वा द्व्यचोऽतस्तिङः।६।३।१३५। ने दीर्घत्व; प्रत्ययस्वर शेष.

५ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन 'शप' व त्याचा 'बहुलं छन्दसि।२।४।७३' ने लोप; आदेशप्रत्यययोः।८।३।५९। ने षत्व; द्व्यचोऽतस्तिङः।६।३।१३५ ने दीर्घत्व; प्रत्ययस्वर शेष

६ अदिप्रभृतिभ्यः शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; नित्यं ङितः।३।४।९९ ने मस् च्या सकाराचा लोप; प्रत्ययस्वर उदात्त; द्व्यचोऽसतस्तिङः।६।३।१३५ ने दीर्घत्व; प्रत्ययस्वर शेष

७ पहा – 'श्रुधी' प्रमाणे त.टी.क्र. १ ते ७, पृ. क्र.१६२

| | | |
|---|---|---|
| ९) | विदु:[१] | प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| १०) | भूयाम[२] | प्रस्तुत तिङन्त 'भू सत्तायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| ११) | हुवे[३] | प्रस्तुत तिङन्त 'ह्वेञ् स्पर्धायां शब्दे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन |
| १२) | ऋधाथे[४] | प्रस्तुत तिङन्त 'ऋधु वृद्धौ' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| १३) | छिन्धि[५] | प्रस्तुत तिङन्त 'छिदिर् द्वैधीकरणे' या 'रुधादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| १४) | हत[६] | प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन |
| १५) | याथन[७] | प्रस्तुत तिङन्त 'या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष बहुवचन |

---

१ विदो लटो वा।३।४।८३ ने सि स्थानी विकल्पाने उस् प्रत्यय; अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२। ने शप्लुक्, प्रत्ययस्वर उदात्त व शेष

२ विधिनिमन्त्रामन्त्रणाधीष्ट.।३।३।१६१। ने प्रार्थनार्थी लिङ् नित्यं ङित:।३।४।९९ ने मस्च्या सकाराचा लोप; बहुलं छन्दसि।२।४।७३। ने शपाचा लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३। ने यासुडागम व उदात्त ङित्वामुळे क्ङितिच।१।१।५। ने गुणनिषेध प्रत्ययस्वर शेष

३ बहुलं छन्दसि।६।१।३४। ने ह्वे धातूला बहुलेकरुन संप्रसारण; सम्प्रसारणाच्च।६।१।१०८। ने पूर्वरुपैपदेश बहुलं छन्दसि।२।४।७७। ने उवङादेश प्रत्ययस्वर

४ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन शप् व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७३ ने लोप; प्रत्ययस्वर शेष

५ रूधादिभ्य:श्नम्।३।१।७८। ने श्नम्; सेर्ह्यपिच्च।३।४।८७। हि आदेश व अपित्त्वामुळे उदात्त; हुझल्भ्योहेर्धि:।६।४।१०१। ने 'धि' आदेश; श्नसारल्लोप:।६।४।१११। ने विकरणाच्या अकाराचा लोप; झरो झरि सवर्णे।८।४।६५ ने पूर्वधकारलोप; प्रत्ययस्वर शेष

६ अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२। ने शपाचा लोप; तस्थस्थमिपां तान्तन्ताम:।३।४।१०१। ने तादेश व उदात्त; ङित्वामुळे अनुदात्तोपदेशवनतितनोत्यादि.।६।४।३७ ने नकारलोप; प्रत्ययस्वर शेष

७ अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२। ने शपाचा लोप; तप्तनप्तनथनाश्च।७।१।४५ ने थनादेश व प्रत्ययस्वराने उदात्त शेष अनुदात्त; उदात्तादनुदात्तस्य स्वरित:।८।४।६६ ने नकार स्वरित

१६) मंसीमहि[१] — प्रस्तुत तिङन्त 'मन ज्ञाने' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. आशीर्लिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

१७) शेपे[२] — प्रस्तुत तिङन्त 'शप आक्रोशे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार उत्तम पुरुष एकवचन

१८) विद्युः[३] — प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन

१९) दृश्येयम्[४] — प्रस्तुत तिङन्त 'दृशिर् प्रेक्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. आशीर्लिङ् लकार उत्तम पुरुष एकवचन

२०) स्याम[५] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

२१) पाहि[६] — प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

२२) कृण्वे[७] — प्रस्तुत तिङन्त 'कृवि हिंसाकरणयोश्च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन

---

१ आशिषि लिङ्लोटौ।३।३।१७३। ने आशीर्लिङ्; लिङः सीयुट्।३।४।१०२। ने सीयुडागम; लोपोव्योर्वलि।६।१।६६। ने यकारलोप; नश्चापदान्तस्य झलि च।८।३।२४ ने अनुस्वार; प्रत्ययस्वर शेष

२ लिटि धातोरनभ्यास्यय।६।१।८। ने द्वित्व; टित आत्मनेपदानां टेरे।३।४।७९। ने इटला 'एत्व' उदात्त; अत एकहल्मध्येऽनादेशादेर्लिटि।६।४।१२०। ने अभ्यासलोप व उपधेला एत्व प्रत्ययस्वर शेष

३ झेर्जुस।३।४।१०८ ने जुस् आदेश; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३। ने यासुडुदात्त; लिङ सलोपोऽनन्त्यस्य। ७।२।७९ ने सलोप; उस्यपदान्तात्।६।१।९६ ने पररूपैकादेश; एकादेश उदात्तेनोदात्तः।८।२।५ ने उदात्त अदिप्रभृतिभ्यः। २।४।७२। ने शपाचा लोप; प्रत्यय स्वर शेष

४ आशिषि लिङ्लोटौ।३।३।१७३। ने आर्शीर्लिङ्; लिङ्याशिष्यङ्।३।१।८६ ने अङ् प्रत्यय व उदात्त; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३। यासुडुदात्त लिङ सलोपोऽननत्यस्य।७।२।७९ ने सलोप; अतो येयः।७।२।८० ने इयादेश अदुपदेशाने 'इयम्' प्रत्यय अनुदात्त अङ् प्रत्ययस्वर शेष

५ नित्यं ङितः।३।४।९९ ने मसच्या सकाराचा लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त; लिङ सलोपोऽनन्त्यस्य।७।२।७९। ने सलोप; श्नसोरल्लोप।६।४।१११ ने अलोप; प्रत्ययस्वर शेष

६ अदिप्रभृतिभ्य शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; सेर्ह्यपिच्च।३।४।८७। ने हि आदेश अपित्वामुळे उदात्त व प्रत्ययस्वर शेष

७ इदितो नुम् धातोः।७।१।५८ ने नुमागम; बहुलं छन्दसि।२।४।७३। ने शपाचा लोप; प्रत्ययस्वर शेष

२३) सस्ताम्[१] — प्रस्तुत तिङन्त 'षस स्वप्ने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार प्रथम पुरुष द्विवचन

२४) ऋध्याम[२] — प्रस्तुत तिङन्त 'ऋधु वृद्धौ' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. आशीर्लिङ् लकार उत्तम पुरुष एकवचन

२५) याथः — प्रस्तुत तिङन्त 'या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

२६) ईधे[३] — प्रस्तुत तिङन्त 'ञिइन्धी दीप्तौ' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

२७) पदीष्ट[४] — प्रस्तुत तिङन्त 'पद गतौ' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. आशीर्लिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

२८) यात — प्रस्तुत तिङन्त 'या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

२९) हथ[५] — प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

३०) शग्धि[६] — प्रस्तुत तिङन्त 'शक्लृ शक्तौ' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

---

१ अदिप्रभृतिभ्यः शप।२।४।७२ ने शब्लुक्, प्रत्ययस्वर

२ यासुट् परस्मैपदेषूदात्तौ ङिच्च।३।४।१०३। ने यासुडुदात्त, मस् च्या सकाराचा नित्यं ङितः।३।४।९९। ने लोप; प्रत्यय स्वर.

३ इन्धिभवतीभ्यां च।१।२।६। ने लिट्; अनिदितां हल.।६।४।२४। ने नकारलोप; लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८। ने द्वित्व; अभ्यासादिकार्ये सवर्णदीर्घ; लिटतझयोरेशिरेच्।३।४।८१। एश् उदात्त; प्रत्ययस्वर शेष.

४ लिङ सीयुट्।३।४।१०२। ने सीयुट, छन्दस्युभयथा।३।४।१७। ने सार्वधातुकसंज्ञा व लिङः सलोपो.।७।२।७९ ने सलोप; लोपो व्योर्वलि।६।१।६६ ने यलोप; सुट् तिथोः।३।४।१०७। ने सुडागम; षत्व टुत्वे, प्रत्ययस्वर.

५ अनुदात्तोपदेशवनति.६।४।३७। ने नकारलोप; प्रत्ययस्वर.

६ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन शप व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७३। ने लोप; हुझल्भ्यो हेर्धिः।६।४।१०१। ने 'धि' आदेश जशत्व; प्रत्ययस्वर शेष.

३१) पूर्धि[१] — प्रस्तुत तिङन्त 'पॄ पालनपोषणयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

३२) वोचेम[२] — प्रस्तुत तिङन्त 'वच परिभाषणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. आशीर्लिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

३३) स्तुषे — प्रस्तुत तिङन्त 'ष्टुञ् स्ततौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन

३४) पातम् — प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

३५) यातम् — प्रस्तुत तिङन्त 'या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

३६) वन्वे[३] — प्रस्तुत तिङन्त 'वनु याचने' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन

३७) वृञ्जे[४] — प्रस्तुत तिङन्त 'वृजी वर्जने' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन

३८) शृण्वे[५] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन

---

१ श्रुशृणुपृकृवृभ्यश्छन्दसि।६।४।१०२। ने 'हि' चा धि आदेश; उदोष्ठपूर्वस्य.।७।१।१०२ ने 'उर्' हलि च।८।२।७७ ने दीर्घ, प्रत्ययस्वर शेष.

२ वच उम्।७।४।२० ने उमागम; गुण; लिङ्याशिष्य।३।१।८६ ने अङ् प्रत्यय व उदात्त; यासुडागम सलोप, अतो येय:।७।२।८० ने इयादेश; यलोप; 'इम' प्रत्यय अदुपदेशाने अनुदात्त, अङ्प्रत्ययस्वर शेष.

३ तनादिकृञ्भ्य उ:।३।१।७९ ने 'उ' विकरण उदात्त; सतिशिष्टस्वर बलवान असल्याने 'ए' प्रत्ययस्वर बलीष्ठ ठरुन शेष निघात; इको यणचि।६।१।७७ ने यण्, प्रत्ययस्वर शेष.

४ रुधादिभ्य: श्नम्।३।१।७८। ने श्नम् विकरण व उदात्त श्नसोरल्लोप:।६।४।१११ ने अकारलोप; परसवर्ण; प्रत्ययस्वर शेष

५ श्रुव: शृ च।३।१।७४। ने 'श्नु' विकरण व शृ आदेश; विकरण उदात्त; सतिशिष्ट विकरणापेक्षा बलवान ठरुन प्रत्ययस्वर यण् व प्रत्ययस्वर शेष.

| | | |
|---|---|---|
| ३९) | भक्षीय[1] | प्रस्तुत तिङन्त 'भज सेवायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. प्रार्थनार्थी लिङ् लकार उत्तम पुरुष एकवचन |
| ४०) | धेथे[2] | प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषणयोः' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ४१) | वन्दिषीमहि[3] | प्रस्तुत तिङन्त 'वदि अभिवादनस्तुत्योः' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. आशीर्लिङ् उत्तम पुरुष बहुवचन |
| ४२) | भूयाः[4] | प्रस्तुत तिङन्त 'भू सत्तायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. आशीर्लिङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ४३) | पाथ | प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष बहुवचन |
| ४४) | वोचेः[5] | प्रस्तुत तिङन्त 'वच परिभाषणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. आशीर्लिङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ४५) | विद्रे[6] | प्रस्तुत तिङन्त 'विद्लृ लाभे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |

---

१ इटोऽत्।३।४।१०६ ने अत् आदेश; व प्रत्ययस्वराने उदात्त; लिङ सीयुट्।३।४।१०२। ने सीयुडागम; आगमा अनुदात्ता भवन्ति परिभाषेने आगमानुदात्त; चोः कुः।८।२।३० ने जकार कुत्व; आदेशप्रत्यययोः।८।३।५९ ने षत्व व क + ष् = क्ष होऊन 'भक्षीय' प्रत्ययस्वर शेष.

२ आतो ङितो।७।२।८१। ने इयादेश; लोपो व्योर्वलि।६।१।६६ ने यलोप; टेरेत्व; 'इथे' प्रत्यय आद्युदात्त; बहुलं छन्दसि। २।४।७३। ने शपाचा लोप; त्यामुळे श्लु झाला नाही; गुण; एकादेश उदात्तेनोदात्तः।८।२।५ ने उदात्त; प्रत्ययस्वर शेष.

३ इदितो नुम् धातोः।७।१।५८। ने नुमागमः 'महि' प्रत्यय स्वराने आद्युदात्त; लिङः सीयुट्।३।४।१०२। ने सीयुडागम व अनुदात्त; आर्धधातुकस्येड् वलादेः।७।२।३५ ने इडागम व अनुदात्त; प्रत्ययस्वर शेष.

४ इतश्च।३।४।१०० ने सिपच्या इकाराचा लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३। ने यासुडुदात्तागम; ङित्वामुळे क्ङिति च।१।१।५ ने गुणनिषेध; हल्ङ्याब्भ्योदीर्घात्सुत्य.।६।१।६८ ने सकाराचा लोप; यासुट्च्या सकाराचा रेफ विसर्ग प्रत्ययस्वर शेष.

५ वच उम्।७।४।२० ने उमागम; गुण; लिङ्याशिष्यङ्।३।१।८६ ने अङ् प्रत्यय, प्रत्ययस्वराने उदात्त; इतश्च।३।४।१०० ने सिप्च्या इकाराचा लोप; यासुट् स्थानी, अतोयेयः।७।२।८० इयादेश; लोपो व्योर्वलि।६।१।६६ यलोप; अङ् च्या अदुपदेशत्वामुळे व छन्दस्युभयथा।३।४।११७ ने सार्वधातुकत्वाने प्रत्यय अनुदात्त; व अङ् प्रत्ययस्वर शेष

६ 'छन्दसि वेति वक्तव्यम्' या वार्तिकाने द्वित्व अभाव; इरयोरे।६।४।७६। ने 'इरे' स्थानी 'रे' प्रत्ययस्वराने उदात्त

४६) सस्वः[१] — प्रस्तुत तिङन्त 'षस स्वप्ने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन

४७) सन्ति[२] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

४८) वीतम् — प्रस्तुत तिङन्त 'वी गतिव्याप्तिप्रजनकान्त्यसनखादनेषु' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

४९) भूतम्[३] — प्रस्तुत तिङन्त 'भू सत्तायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५०) मंसीष्ठा[४] — प्रस्तुत तिङन्त 'मन ज्ञाने' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. आशीर्लिङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

५१) विदे — प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन

५२) स्था[५] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

५३) वित्तम् — प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

---

१ अदिप्रभृतिभ्यः शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; 'वस्' प्रत्ययस्वर शेष उदात्त.

२ श्नासोरल्लोपः।२।४।७३। ने बहुले करुन शपाचा पोप; अपित्वाच्या ङित्वाने क्ङिति च।१।१।५। ने गुणनिषेध प्रत्ययस्वर शेष

३ बहुलं छन्दसि।२।४।७३। ने बहुले करुन शपाचा लोप; अपित्वाच्या ङित्वाने क्ङिति च।१।१।५। ने गुणनिषेध प्रत्ययस्वर शेष

४ लिङः सीयुट्।३।४।१०२। ने 'थास्' प्रत्ययास सीयुडागम; लोप्ते व्योर्वलि।६।१।६६ ने यलोप; सुट् तिथोः।३।४।१०७ ने सुडागम; षत्व व टुत्वे होऊन प्रत्ययस्वर शेष

५ 'स्थ' असे हे मूळ रूप असून हे अन्येषामपि दृश्यते।६।३।१३७ ने छांदस दीर्घत्व आहे. श्नसोरल्लोपः।६।४।१११ ने अकारलोप; अदिप्रभृतिभ्यः शपः।३।४।७२। ने शप् लोप व प्रत्ययस्वर शेष

५४) कृथः[१] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५५) कृतम्[२] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५६) ईयुः[३] — प्रस्तुत तिङन्त 'इण गतौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

५७) श्रुतम्[४] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५८) यासिष्टम्[५] — प्रस्तुत तिङन्त 'या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५९) पाथः — प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

६०) जहि[६] — प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्यो' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

६१) ब्रुवे[७] — प्रस्तुत तिङन्त 'ब्रूञ् व्यक्तायां वाचि' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन

---

१ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन शप् व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७३। ने लोप; प्रत्ययस्वर शेष

२ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन शप् व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७३। ने लोप; प्रत्ययस्वर शेष

३ लिटि धातोरभ्यासस्य।६।१।८। ने द्वित्व; परस्मैपदानां णलतुसुस्थलथु.।३।४।८२। ने उस्; प्रत्यय व उदात्त; अचि श्नुधातुभ्रुवां.।६।४।७७ ने दीर्घ; प्रत्ययस्वर शेष.

४ बहुलं छन्दसि।२।४।७३। ने शपाचा लोप; तस्थस्थमिपां तान्तन्ताम:।३।४।१०१। ने तमादेश व उदात्त; तो अपित्त ङित् त्यामुळे क्ङिति च।१।१।५ ने गुणनिषेध प्रत्ययस्वर शेष.

५ छन्दसि लुङलङलिट:।३।४।६। ने लुङ्; च्लेः सिच्।३।१।४४ ने सिच्; यमरमनमातां सक्च।७।२।७३। ने सगागम; आर्धधातुकस्येड् वलादे:।७।२।३५। ने इडागमू व अनुदात्त; तस्थस्थमिपां तान्तन्ताम:।३।४।१०१ ने तमादेश उदात्त; षत्व व ष्टुत्व प्रत्ययस्वर शेष उदात्त.

६ सेर्ह्यपिच्च।३।४।८७। ने सिप्च्या स्थानी 'हि' असा अपित् प्रत्ययादेश व तो उदात्त; हन्तेर्ज:।६।४।३६ ने जादेश; असिद्धवदत्राभात्।६।४।२२ ने असिद्धत्वामुळे अतो हे:।६।४।१०५ ने हिलोपाभाव; व प्रत्ययस्वर शेष.

७ टित आत्मनेपदानां टेरे।३।४।७९ ने एत्व; अचि श्नुधातुभ्रुवां.।६।४।७७। ने उवङादेश; व प्रत्ययस्वर शेष.

६२) पाताम् — प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार प्रथम पुरुष द्विवचन

६३) स्थः[१] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

६४) स्यात्[२] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

६५) स्मसि[३] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन

६६) स्यातन[४] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार मध्यम पुरुष बहुवचन

६७) घ्नन्ति[५] — प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

६८) यन्ति[६] — प्रस्तुत तिङन्त 'इण् गतौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

६९) स्थन[७] — प्रस्तुत तिङन्त 'अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

---

१ पहा. - 'स्था' प्रमाणे त.टी.क्र. ५२.५, पृ. क्र.१६९

२ अदिप्रभृतिभ्यः शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त; लिङ सलोपोऽनन्त्यस्य।७।२।७९ ने सलोप; इतश्च।३।४।१०० ने तिप्च्या इकाराचा लोप; प्रत्ययस्वर शेष.

३ श्नसोरल्लोपः।६।४।१०१ ने अकारलोप; इदन्तोमसि।७।१।४६ ने मसि आदेश; प्रत्ययस्वर उदात्त.

४ तप्तनप्तनथनाश्च।७।१।४५ ने तनादेश; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त; शेष निघात; लिङ सलोपोऽनन्त्यस्य।७।२।७९। ने सलोप; श्नसोरल्लोपः।६।४।१११। ने अकारलोप; प्रत्ययस्वर.

५ झोऽन्तः।७।१।३। ने अन्तादेश; प्रत्ययस्वराने आद्युदात्त; अदिप्रभृतिभ्यः शपः।२।४।७२। ने शपाचा लोप; हकारास कुत्व प्रत्ययस्वर शेष.

६ इणो यण्।६।४।८१। ने यण्, प्रत्ययस्वर शेष.

७ पहा - अकारल्लोपादिसाठी-स्थः- त.टी.क्र. ६३.१ तनप्तनप्तनथनाश्च।७।१।४५ ने थनादेश; प्रत्ययस्वर.

७०) गमन्त[१] — प्रस्तुत तिङन्त 'गम्लृ गतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७१) तन्वन्ति[२] — प्रस्तुत तिङन्त 'तनु विस्तारे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७२) इन्धते[३] — प्रस्तुत तिङन्त 'ञिइन्धी दीप्तौ' या 'रुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७३) शृण्वन्तु[४] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७४) पृणन्ति[५] — प्रस्तुत तिङन्त 'पॄ पालनपूरणयोः' या 'क्र्यादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७५) वृणते[६] — प्रस्तुत तिङन्त 'वॄ वरणे' या 'क्र्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७६) युञ्जते[७] — प्रस्तुत तिङन्त 'युजिर् योगे' या 'रूधादिगणस्थ' धातूचे लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७७) अञ्जति — प्रस्तुत तिङन्त 'अञ्जू व्यक्तिम्रक्षणकान्तिगतिषु' या 'रूधादिगणस्थ' धातूचे प.प.लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

---

१ गमहनजनखन.।६।४।९८। ने गमची उपधालोप; प्रत्ययस्वर; वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति या परिभाषेने टेरेत्व अभाव; प्रत्ययस्वर शेष.

२ तनादिकृञ्भ्य उ।३।४।७९ ने 'उ' विकरण; इको यणचि।६।१।७७ ने यण् प्रत्ययस्वर शेष.

३ आत्मनेपदेष्वनतः।७।१।५ ने अतादेश होऊन 'अते' प्रत्यय आद्युदात्त; अदिप्रभृतिभ्यः शपः।२।४।७२ ने शपाचा लोप; प्रत्ययस्वर शेष.

४ श्नुश्रुवादिकार्ये पहा. - शृण्वे त.टी.क्र.३८.५ प्रत्ययस्वर शेष, पृ. क्र.१६७

५ प्वादीनां ऱ्हस्वः।७।३।८०। ने धातू ऱ्हस्व; क्र्यादिभ्यः श्ना।३।१।८५ ने श्ना; श्नाभ्यस्तयोरातः।६।४।११२। ने आकारलोप; प्रत्ययस्वर शेष.

६ पहा. - 'पृणन्ति' प्रमाणे - त.टी.क्र. ७४.५

७ रूधादिभ्यःश्नम्।३।१।७८ ने श्नम्; श्नसोरल्लोपः।६।४।१११ ने अकारलोप; प्रत्ययस्वर शेष. यापुढील ७७ अञ्जति ते ८१ युञ्जाथे स्वरसिद्धी वरीलप्रमाणे.

| | | |
|---|---|---|
| ७८) | तुञ्जाते | प्रस्तुत तिङन्त 'तञ्जु सङ्कोचने' या 'रूधादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष द्विवचन |
| ७९) | पृञ्चते | प्रस्तुत तिङन्त 'पृची सम्पर्के' या 'रूधादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ८०) | तुञ्जते | प्रस्तुत तिङन्त 'तञ्जु सङ्कोचने' या 'रूधादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ८१) | युञ्जाथे | प्रस्तुत तिङन्त 'युजिर् योगे' या 'रूधादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ८२) | जुहूमसि[१] | प्रस्तुत तिङन्त 'हु दानादानयोः' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| ८३) | सासह्याम[२] | प्रस्तुत तिङन्त 'षह मर्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. यङ्लुगन्त, लिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| ८४) | आनृचुः[३] | प्रस्तुत तिङन्त 'अर्च पूजायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| ८५) | पस्पशे[४] | प्रस्तुत तिङन्त 'स्पश बाधनस्पर्शनयोः' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |

---

१ श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिककार्ये; कुहोश्चुः।७।४।६२। ने अभ्यासस्थ हकारास चुत्व; इदन्तोमसि।७।१।४६। ने मसि आदेश; धातुस्वराचा बाध करुन प्रत्ययस्वर शेष.

२ यङोऽचि च।२।४।७४। ने यङ्लुक्; सन्यङो।६।१।९। ने द्वित्वाभ्यासादिककार्ये; दीर्घोऽकितः।७।४।८३ ने अभ्यास दीर्घ; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त व 'याम' निमित्तक प्रत्ययस्वर शेष.

३ अपस्पृधेथामानृचुरामृहुश्चिच्यु.।६।१।३६ ने या रूपाचे निपातन केले आहे. निपातनाने रेफ, संप्रसारणानंतर अकारलोप; द्वित्व; उरत्।७।४।६६ ने अत्व व अत आदेः।७।४।७० ने दीर्घ व तस्मान्नुड द्विहलः।७।४।७१। नुडागमादिकार्ये झाली आहेत.

४ लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८ ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, लिटस्तझयोरेशिरेच्।३।४।८१। ने 'त' स्थानी एश् आदेश; प्रत्ययस्वराने उदात्त; व तोच शेष.

८६) दधे[१] — प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषपयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार उत्तम पुरुष एकवचन

८७) आपु:[२] — प्रस्तुत तिङन्त 'आप्लृ व्याप्तौ' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

८८) चक्रे[३] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

८९) पान्ति — प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

९०) चकृम[४] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार उत्तम पुरुष बहुवचन

९१) जुह्वे[५] — प्रस्तुत तिङन्त 'ह्वेञ् स्पधार्यां शब्दे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

९२) युयुधाते[६] — प्रस्तुत तिङन्त 'युध सम्प्रहारे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष द्विवचन

९३) दधु: — प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषणयो' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

---

१ श्लौ।६।१।११२। ने आकारलोप; 'ए' प्रत्ययस्वर धातुस्वराचा बाध करून शेष.

२ परस्मैपदानां णलतुसुस्थल.।३।४।८२। ने 'उस्' आदेश; लिट् निमित्त द्वित्वादिकार्ये धातुस्वराचा बाध करून प्रत्ययस्वर शेष

३ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासिदिकार्ये; उरत्।७।४।६६ ने अभ्यासास अत्व; कुहोश्चु।७।४।६२। ने चुत्व; लिटस्तझयोरेशिरेच्।३।४।८१। ने एश् व प्रत्ययस्वराने उदात्त; धातुस्वराचा बाध व प्रत्ययस्वर शेष.

४ लिट् निमित्त कार्ये 'चक्रे' प्रमाणे पहा. – त.टी.क्र। ८८.३, 'म' प्रत्ययाच्या अपित्त्वामुळे ङित्. क्ङिति च।१।१।५ ने गुणनिषेध; प्रत्ययस्वर शेष.

५ बहुलं छन्दसि।६।१।३ ने संप्रसारण, सम्प्रसारणाच्च।६।१।१०८ ने पूर्वरुप; लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८ ने द्वित्वाभ्वासादिकार्ये; धातो:।६।१।१६९ ने धातुस्वर अन्तोदात्त; कुहोश्चु।७।४।६२ ने अभ्यासस्थानी चुत्व, यण् संधी, प्रत्ययस्वर शेष.

६ लिट् धातोरनभ्यासस्य।६।१।८ ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; धातुस्वराचा बाध करून प्रत्ययस्वर शेष.

९४) दध्रे[1] — प्रस्तुत तिङन्त 'धृङ् अवस्थाने' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

९५) दधिध्वे[2] — प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषणयो' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

९६) मिमीहि[3] — प्रस्तुत तिङन्त 'माङ् माने शब्दे च' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

९७) विविदे[4] — प्रस्तुत तिङन्त 'विद सत्तायाम्' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

९८) धेते — प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषणयोः' या 'जुहोत्यागणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष द्विवचन

९९) ऊहथुः[5] — प्रस्तुत तिङन्त 'वह प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

१००) पपथुः[6] — प्रस्तुत तिङन्त 'पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

१०१) तित्विषे[7] — प्रस्तुत तिङन्त 'त्विष दीप्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

---

१ लिटि धातोरनभ्यारस्य।६।१।८ ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, लिस्तझयोरेशिरेच्।३।४।८१। ने एश् प्रत्यय व प्रत्ययस्वराने उदात्त व प्रत्ययस्वर शेष.

२ छन्दसि लुङलङलिटः।३।४।६। ने लिट् लकार; लिटि धातोरनभ्यारस्य।६।१।८। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; ऱ्हस्वः।७।४।५९ ने अभ्यास ऱ्हस्व; कृसृभृ.।७।२।१३। ने क्रयादिनियमाने इडागम, प्रत्ययस्वर शेष.

३ श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, सेर्ह्यपिच्च।३।४।८७ ने 'हि' भृञामित्।७।४।७६ ने अभ्यासास इत्व; ई हल्यधोः। ६।४।११३। ने आकारास ईत्व; प्रत्ययस्वर शेष.

४ लिटस्तझयोरेशिरेच्।३।४।८१। ने एश्, द्वित्वादिककार्ये 'युयुधाते' प्रमाणे – पहा. त.टी.क्र. ९२.६

५ असंयोगाल्लिट् कित्।१।२।५ ने लिट् कित्, द्वित्वाभ्यासादिकार्ये, लिट्यभ्यासस्योभयेषाम्।६।१।१७। ने संप्रसारण, पूर्वरूप, वचिस्वपि.।६।१।१५ ने धातूला संप्रसारण, पूर्वरूप; सवर्णदीर्घ; 'अथुः' प्रत्ययस्वराने आद्युदात्त; प्रत्ययस्वर शेष.

६ द्वित्वाभ्यासादिककार्ये, ऱ्हस्वः।७।४।५९ ने ऱ्हस्व; आतो लोप इटि च।६।४।६४। ने आकारलोप; प्रत्यय स्वर शेष.

७ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये, लिटस्तझयोरेशिरेच्।३।४।८१। ने एश् व प्रत्ययस्वर शेष.

| | |
|---|---|
| १०२) चकृषे[१] | प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| १०३) आनशुः[२] | प्रस्तुत तिङन्त 'अशू व्याप्तौ सङ्घाते च' या 'स्वादिगणस्थ' धातूचे लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| १०४) तस्थौ[३] | प्रस्तुत तिङन्त 'ष्ठा गतिनिवृतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १०५) विवेः[४] | प्रस्तुत तिङन्त 'वी गतिव्यप्तिप्रजनकान्त्यसनखादनेषु' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| १०६) चक्रुः[५] | प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| १०७) तस्थुः[६] | प्रस्तुत तिङन्त 'ष्ठा गतिनिवृतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| १०८) ससृज्महे[७] | प्रस्तुत तिङन्त 'सृज विसर्गे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार उत्तम पुरुष बहुवचन |

---

१ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये, क्ङितिच।१।१।५ ने गुणनिषेध; प्रत्ययस्वर शेष.

२ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने पदव्यत्यय येऊन परस्मैपद; लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; अत आदे:।७।४।७०। ने अकारास दीर्घत्व; अश्नोतेश्च।७।४।७२ ने नुडागम; प्रत्ययस्वर शेष.

३ लिट्निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये; न्हस्व:।७।४।५९ ने अभ्यासऱ्हस्व, आत औ णल:।७।१।३४ ने प्रत्ययास औत्व; प्रत्ययस्वराने उदात्त; व शेष.

४ बहुलं छन्दसि।२।४।७६ ने शपाचा श्लु बहुलेकरुन झाला; श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, न्हस्व;।७।४।५९ ने अभ्यासऱ्हस्व; स्रार्वधातुकार्धधातुकयो:।७।४।८३ ने गुण; इतश्च।३।४।१०० ने इकार लोप, रेफ व विसर्ग. बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५ ने अडागमाचा अभाव.

५ लिट्निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये, उरत्।७।४।६६ ने अभ्यासाला अत्व; कुहोश्चु।७।४।६२ ने चत्व; असंयोगाल्लिट् कित्।१।२।५ ने कित्त्व; क्ङिति च।१।१।५ ने गुणनिषेध; यण्, प्रत्ययस्वर शेष.

६ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये; न्हस्व:।७।४।५९ ने अभ्यासऱ्हस्व, आतो लोप इटि च।६।४।६४। ने आकारलोप; प्रत्ययस्वर शेष.

७ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये उरत्।७।४।६६ ने अभ्यासाला अत्व; एकाच उपदेशेऽनुदात्तात्।७।२।१०। ने इडागमनिषेध; प्रत्ययस्वर शेष

१०९) दधिषे[१] प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषणयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार मध्यम पुरुष एकवचन

११०) ददाशिम[२] प्रस्तुत तिङन्त 'दाशृ दाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार उत्तम पुरुष बहुवचन

१११) चक्र[३] प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

११२) ररन्धि[४] प्रस्तुत तिङन्त 'रमु क्रीडायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

११३) चक्रथु:[५] प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

११४) पिपृतम्[६] प्रस्तुत तिङन्त 'पॄ पालनपूरणयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

११५) शुशुग्धि[७] प्रस्तुत तिङन्त 'शुच दीप्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

११६) चक्राथे[८] प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

---

१ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये; ऱ्हस्व:।७।४।५९ ने ऱ्हस्व, कृसृभृ.।७।२।१३ ने क्रयादिनियमाने इडागम व अनुदात्त, आतो लोप इटि च।६।४।६४ ने आकारलोप; प्रत्ययस्वर शेष.

२ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये; ऱ्हस्व, आर्धधातुकस्येड् वलादे:।७।२।३५ ने इडागम व अनुदात्त; प्रत्ययस्वर शेष.

३ परस्मैपदानां णलतुसु.३।४।८२। ने 'अ' प्रत्यय; लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये, उरत्।७।४।६६ ने अभ्यासाऽत्व, असंयोगाल्लिट् कित्।१।२।५ ने कित्व, गुणनिषेध, यण् व प्रत्ययस्वर शेष.

४ बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु, श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, सेर्ह्यपिच्च।३।४।८७ ने 'हि' प्रत्यय हुझल्भ्योहेर्धि।६।४।१०१। ने 'धि' आदेश, परसवर्ण, प्रत्ययस्वर शेष.

५ पहा. – 'चक्रु:' प्रमाणे. त.टी.क्र. १०६.५

६ श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, अर्तिपिषर्त्योश्च।७।४।७७। ने अभ्यासास इत्व, क्ङिति च।१।१।५ ने गुणनिषेध, प्रत्ययस्वर शेष.

७ बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु, श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, हुझल्भ्यो हेर्धि:।६।४।१०१ ने धि आदेश; चो: कु:।८।२।३० कुत्व, प्रत्ययस्वर शेष.

८ पहा. – चक्रथु: प्रमाणे, त.टी.क्र. ११३.५, पृ. क्र.१७७

| | |
|---|---|
| ११७) ईषथुः[१] | प्रस्तुत तिङन्त 'इष इच्छायाम्' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ११८) ऊपथुः[२] | प्रस्तुत तिङन्त 'डुवप् बीजसन्ताने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ११९) ववृधीथाः[३] | प्रस्तुत तिङन्त 'वृधु वृद्धौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| १२०) दिधृत[४] | प्रस्तुत तिङन्त 'धृञ् धारणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट लकार मध्यम पुरुष बहुवचन |
| १२१) वेविजे[५] | प्रस्तुत तिङन्त 'ओविजी भयचलनयोः' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. यङ्लगन्त लट् प्रथम पुरुष एकवचन |
| १२२) तुतुज्यात्[६] | प्रस्तुत तिङन्त 'तुजि प्रेरणे' या 'चुरादिगणस्थ' धातूचे प.प. लिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १२३) ददाशुः[७] | प्रस्तुत तिङन्त 'दाशृ दाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| १२४) जगृभ्रे[८] | प्रस्तुत तिङन्त 'ग्रह उपादाने' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् प्रथम पुरुष एकवचन |

---

१ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये, अकः सवर्णे दीर्घः।६।१।१०१। दीर्घ, प्रत्ययस्वर शेष.

२ पहा. – 'ऊहथुः' प्रमाणे – त.टी.क्र. ९९.५, पृ. क्र.१७५

३ बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु, श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, उरत्।७।४।६६ ने अत्व, लिङः सीयुट्।३।४।१।२। ने सीयुडागम; लिङ सलोपोऽनन्त्यस्य।७।२।७९। ने सलोप; लोपो व्योर्वलि।६।१।६६ ने यलोप; आगम अनुदात्त; प्रत्ययस्वर शेष.

४ बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु, श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, बहुलं छन्दसि।७।४।७८। ने अभ्यासास इत्व; प्रत्ययस्वर शेष.

५ धातोरेकाचो हलादेः क्रियासमभिहारे यङ्।३।१।२२ यङ्, यङोऽचि च।२।४।७४ ने यङ्लुक्, सन्यङो।६।१।९। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, गुणो यङ्लुको।७।४।८२ ने गुण; प्रत्ययस्वर शेष.

६ बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु, श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, इतश्च।३।४।१०० ने इकार लोप; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त; सलोप; प्रत्ययस्वर शेष.

७ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये, ऱ्हस्वः।७।४।५९। ने ऱ्हस्व, प्रत्ययस्वर शेष.

८ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये, लिटस्तझयोरेशिरेच्।३।४।८१। ने एश्; उरत् र।७।४।६६ ने अत्व; हृग्रहोर्भश्छन्दसि या वार्तिकाने भत्व; बहुलं छन्दसि।७।१।८ ने रुडागम; प्रत्ययस्वर शेष.

| | |
|---|---|
| १२५) जुगुर्यात[१] | प्रस्तुत तिङन्त 'गॄ निगरणे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १२६) दद्धि[२] | प्रस्तुत तिङन्त 'दद दाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| १२७) विदथुः[३] | प्रस्तुत तिङन्त 'विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| १२८) दधाथे[४] | प्रस्तुत तिङन्त 'डुधाञ् धारणपोषणयोः' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| १२९) युयोधि[५] | प्रस्तुत तिङन्त 'युध सम्प्रहारे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. लोट लकार मध्यम पुरुष एकवचन |

---

१ व्यत्ययो बहुलंम्।३।१।८५ विकरणव्यत्ययाने शप् व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७६ श्लु, बहुलं छन्दसि।७।१।१०३। ओष्ठपूर्वक नसतानाही ऱ्हस्व उकार व रपरत्व; श्लौ।६।१।१० ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; कुहोश्चु।७।४।६६ ने जकार; यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त; सलोप; इकार लोप; प्रत्ययस्वर शेष.

२ बहुलं छन्दसि।२।४।७३ ने शपाचा लोप; हुझल्भ्यो हेर्धि।६।४।१०१ ने 'धि' आदेश; प्रत्ययस्वर शेष.

३ विदो लटो वा।३।४।८३ ने अथुस् प्रत्यय व प्रत्ययस्वराने आद्युदात्त.

४ श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, आतो लोप इटि च।६।४।६४ ने आकारलोप, प्रत्ययस्वर शेष.

५ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन शप् व बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु; श्लौ।६।१।१० ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; हुझल्भ्यो हेर्धि।६।४।१०१ ने धि आदेश; वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति या परिभाषेने विकल्पाने उपधागुण, प्रत्ययस्वर शेष.

## ३.२ विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर

| | | |
|---|---|---|
| १) | कृणुहि | प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| | डुकृञ् करणे | भूवादयो धातव:।१।३।१। ने धातुसंज्ञा |
| | कृ | धातो:।६।१।१६२। ने धातुस्वर उदात्त |
| | कृ + लोट् | लोट् च।३।३।१६२।[१] ने आज्ञार्थी लोट् लकार |
| | कृ + सिप् | तिप्तस्झि.।३।४।७८। ने सिप् |
| | कृ + हि | सेर्ह्यपिच्च।३।४।८७।[२] ने सिप्चा 'हि' आदेश |
| | कृ + हि | आद्युदात्तश्च।३।१।३।[३] ने 'हि' उदात्त |
| | कृ + हि | अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८। ने धातुस्वर अनुदात्त |
| | कृ + श्नु + हि | व्यत्ययो बहुलम्।३।१।८५। ने विकरणव्यत्यय येऊन 'श्नु' विकरण |
| | कृ + श्नु + हि | आद्युदात्तश्च।३।१।३।[४] ने विकरणस्वर उदात्त |
| | कृ + नु + हि | "सतिशिष्टस्वरबलीयस्त्वमन्यत्रविकरणेभ्य वाच्यम्"[५] वा. ने विकरणस्वराचा बाध होऊन प्रत्ययस्वर |
| | कृणुहि | अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि।८।४।२।[६] ने णत्व होऊन स्वरसिद्धी. |
| २) | पृणीत[७] | प्रस्तुत तिङन्त 'पॄ पालनपूरणयो:' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन |

---

१ "विधि-निमंत्रण-आमंत्रण-अधीष्ट-संप्रश्न-प्रार्थना या अर्थी धातूहून लोट् लकार होतो" त्यानुसार लोट् लकार

२ "लोट् लकाराच्या सिप् च्या स्थानी 'हि' असा अपित् आदेश होतो".

३ सार्थ विवेचन ..... पृ.क्र. १२८

४ सार्थ विवेचन ..... पृ.क्र. १२८

५ सार्थ विवेचन ..... पृ.क्र. १६०

६ "एकपदात रेफ वा षकार यांच्यानंतर अट्, कवर्ग, पवर्ग, आङ्, नुम् हे वेगळेवेगळे वा एकत्रित मध्ये असले तरी नकारस्थानी णकार होतो" येथे रेफाने णत्व झाले आहे.

७ प्वादीनां ह्रस्व:।७।३।८० ने ह्रस्व; क्रयादिभ्य: श्ना।३।१।८१ ने श्ना विकरण व उदात्त; ई हल्यघो:।३।४।११३ ने ईकार; विकरणस्वराचा बाध करुन प्रत्ययस्वर शेष.

३) मिनीमसि[१] — प्रस्तुत तिङन्त 'मीञ् हिंसायाम्' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन

४) शृणुतम्[२] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५) कृणुतम्[३] — प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

६) शृणुष्व[४] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

७) वनुयाम[५] — प्रस्तुत तिङन्त 'वनु याचने' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

८) गृणीषे[६] — प्रस्तुत तिङन्त 'गॄ शब्दे' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन

९) शृणुहि[७] — प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

---

१ ऱ्हस्वादी-कार्ये 'पृणीत' प्रमाणे पहा. - २.७, इदन्तो मसि।७।१।४६ ने मसि आदेश प्रत्ययस्वराने आद्युदात्त; विकरणस्वराचा बाध करुन प्रत्ययस्वर शेष.

२ श्रुवः शृः च।३।१।७४। ने श्नु विकरण व शृ आदेश; विकरणस्वर उदात्त; पण सतिशिष्टस्वराच्या वार्तिकाने विकरणस्वराचा बाध करुन प्रत्ययस्वर.

३ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन श्नु विकरण व उदात्त; पण सतिशिष्टस्वर-वार्तिकाने विकरणस्वराचा बाध करुन प्रत्ययस्वर शेष.

४ श्नुविकरणादिककार्ये पहा. - 'शृणुतम्' प्रमाणे त.टी.क्र. ४.२, पृ. क्र.१८१

५ यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च।३।४।१०३ ने यासुडुदात्त; लिङः सलोपोऽनन्त्यस्य।७।२।७९ ने सलोप; शेष निघात; तनादिकृञ्भ्य उ।३।१।७९ ने 'उ' विकरण व उदात्त; पण सतिशिष्टस्वरवार्तिकाने विकरणस्वराचा बाध होऊन प्रत्ययस्वर शेष

६ श्नादिककार्ये पहा. - 'पृणीत' प्रमाणे - त.टी.क्र. २.७, पृ. क्र.१८०

७ श्नुविकरणादिकार्ये पहा. - 'शृणुतम्' प्रमाणे - त.टी.क्र.४.२, सेर्ह्यपिच्च।३।४।८७। 'हि' व उदात्त वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति ने लोपाचा अभाव प्रत्ययस्वर शेष.

१०) शृणुत[१] प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

११) वृणीते[२] प्रस्तुत तिङन्त 'वृञ् वरणे' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

१ श्नुविकरणादिकार्ये 'शृणुतम्' प्रमाणे पहा. – त. टी. क्र. ४.२, पृ. क्र.१८१

२ श्नाविकरणऱ्हस्वादिकार्ये 'पृणीत' प्रमाणे पहा. – त. टी. क्र. २.७, पृ. क्र.१८०

## ३.३ चित् प्रत्यय स्वर

| | | |
|---|---|---|
| १) | श्रृण्विरे | प्रस्तुत तिङन्त 'श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| | श्रु श्रवणे | भूवादयो धातवः।१।३।१। ने धातुसंज्ञा |
| | श्रु | धातोः।६।१।१६२। ने धातुस्वर उदात्त |
| | श्रु + लिट् | परोक्षे लिट्।३।२।११५।[१] ने परोक्ष भूतकाळार्थी लिट् लकार |
| | श्रु + झ | तिप्तस्झि. ताऽऽतासञ्झ.।३।४।७८। ने 'झ' प्रत्यय |
| | श्रु + इरेच् | लिटस्तझयोरेशिरेच।३।४।८१।[२] ने 'इरेच्' आदेश |
| | श्रु + इरे | चितः।६।१।१६३।[३] ने अन्तादात्त व 'अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८। ने इकार अनुदात्त |
| | श्रु + इरे | अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८।[४] ने 'इरेच्' सतिशिष्टस्वर बलवान ठरुन शेष अनुदात्त |
| | श्रृ + श्नु + इरे | छन्दस्युभयथा।३।४।११७।[५] ने सार्वधातुक संज्ञा; त्यामुळे श्रुवः श्रृ च।३।१।७४। ने 'श्रु' स्थानी 'श्रृ' आदेश व 'श्नु' विकरण व द्वित्वाभाव |
| | श्रृ + नु + इरे | आद्युदात्तश्च।३।१।३।[६] ने विकरणस्वर उदात्त |
| | श्रृ + नु + इरे | "सतिशिष्टस्वरबलीयस्त्वमन्यत्रविकरणेभ्य वाच्यम्"[७] या वार्तिकाने विकरण अनुदात्त |
| | श्रृण्विरे | अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि।८।४।२।[८] ने णत्व; इको यणचि।६।१।७७। ने यण; स्वरसिद्धी पूर्ण. |

---

१ अनद्यतन परोक्षभूतार्थी धातूहून लिट् लकार होतो.

२ 'लिट् लकाराच्या आत्मनेपदी 'त' आणि 'झ' प्रत्ययांच्या स्थानी अनुक्रमे एश् व इरेच् आदेश होतात' यानुसार इरेच्.

३ सार्थ विवेचन ..... पृ.क्र. १२८

४ सार्थ विवेचन ..... पृ.क्र. १६०

५ 'वेदामध्ये सार्वधातुक व आर्धधातुक अशा दोन्ही संज्ञा बहुलकरुन होतात' यानुसार सार्वधातुक संज्ञा.

६ सार्थ विवेचन ..... पृ.क्र. १२८

७ "सतिशिष्ट स्वर बलवान असतो; विकरणाचा स्वर सोडून असे म्हणावे" या वार्तिकानुसार विकरणस्वर बलवान न ठरता चितस्वर बलवान.

८ "एकपदात रेफ वा षकार यांच्यानंतर अट्, कुवर्ग, पवर्ग, आङ्, नुम् हे वेगळेवेगळे असले वा एकत्रित असले तरी मध्ये असूनही नकारस्थानी णकार होतो" त्यानुसार रेफामुळे णत्व.

२) दधिरे[१] प्रस्तुत तिङन्त 'दुधाञ् धारणपोषणयो:' या 'जुहात्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

३) चक्रिरे[२] प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

४) येमिरे[३] प्रस्तुत तिङन्त 'यम उपरमे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

५) बुभुज्रिरे[४] प्रस्तुत तिङन्त 'भुज पालनाभ्यवहारयो:' या 'रुधादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

६) सश्चिरे[५] प्रस्तुत तिङन्त 'षश्च गतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

### ३.७ मूल्यमापन :

धातुस्वर व विकरणस्वर या दोहोंचाही बाध करणारा अत्यंत प्रबळ असा प्रत्ययस्वर आहे. वास्तविक पाहता 'प्रत्यय'[६] या सूत्राने सांगितलेल्या प्रत्ययाधिकारातील बहुतांशी प्रत्ययांना आद्युदात्त प्रत्यय स्वराचा नियम लागू होतो[७]. तसेच सतिशिष्टतेच्या[८] नियमाने ही प्रत्ययस्वरच प्रबळ सांगितला आहे. त्यामुळे प्रत्ययस्वराचे क्षेत्र फारच व्यापक आहे. त्याची

---

१ लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८। ने द्वित्व; ऱ्हस्व:।७।४।५९ ने अभ्यास ऱ्हस्व; अभ्यासे चर्च।८।४।५४। ने जशत्व; चित्स्वर शेष .

२ लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८। ने द्वित्व; अभ्यासादिकार्ये; उरत्।७।४।६६ ने अभ्यासाला अकार रपर; हलादि शेष:।७।४।६० ने इलोप; कुहोश्चु:।७।४।६२। ने चुत्व; यण्; चित्स्वर.

३ लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८। ने द्वित्व; अभ्यासादिकार्ये; अत एकहल्मध्येऽनादेशा.।६।४।१२० ने एत्व व अभ्यासलोप; चित्स्वर शेष.

४ लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८। ने द्वित्व; अभ्यासादिकार्ये; अभ्यासे चर्च।८।४।५४। ने जशत्व; बहुलं छन्दसि।७।१।८ ने रुडागम झाला; चित्स्वर शेष.

५ 'छन्दसि वेति वक्तव्यम्' या वार्तिकाने द्वित्वाचा अभाव; चित्स्वर शेष.

६ पा.सू. ३।१।१

७ आद्युदातश्च। पा.सू. ३।१।३

८ पहा. - प्रक. ३, पृ.क्र. १६०

व्यापकता प्रत्ययाधिकारावरून[१] स्पष्ट होते. तरी येथे प्रत्ययस्वराची मर्यादा दशो लकारात तिङन्तांपर्यंतच ठेवण्यात आलेली आहे. तरी येथे सन्नन्त, यङन्त यांचाही समावेश आहेच. तरी प्रक्रियेनुसार प्रत्ययस्वराचे जे - १) धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर, २) विकरणस्वर बाधक प्रत्ययस्वर ३) चित् प्रत्ययस्वर हे तीन प्रकार केले, त्यांच्या विषयी विचार करु.

धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर व विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर हे दोन वेगळे स्वर प्रकार म्हणून दिलेल असले, तरी ते 'आद्युदात्तः'[२] या सामान्यप्रत्ययस्वराचेच उपप्रकार आहेत, जे स्वरप्रक्रियेनुसार येथे दिलेले आहेत. कारण येथे 'आद्युदात्तः' सूत्राने प्राप्त तोच प्रत्ययस्वर शेष राहतो. मात्र 'चित् प्रत्ययस्वर' स्वतंत्र असून 'आद्युदात्तश्च' या सामान्य प्रत्ययस्वराचा बाधक आहे. या स्वरांसंबंधी आढळलेल्या विशेष गोष्टी, वा नियम पुढीलप्रमाणे -

**१) धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर -**

i) **धातुस्वराचा बाध करून प्रबळ ठरणारा प्रत्ययस्वर हा 'अदादिगणस्थ' धातूंच्या बाबतीत अधिक स्पष्ट आढळतो. कारण येथे 'शप्' या विकरणाचा लोप झालेला असतो.[३] त्यामुळे स्वाभाविकपणे प्रत्ययस्वर सतिशिष्ट ठरुन शेष राहतो.** उदा. - उशन्ति, विद्याम, विद्या, विदुः, हत, याथन, विद्युः, स्याम, पाहि, सस्ताम्, याथः, यात, हथ, स्तुषे, पातम्, यातम्, पाथ, सस्वः, सन्ति, वीतम्, विदे, स्था, वित्तम्, पाथः, जहि, ब्रवे, पाताम्, स्थः, स्यात्, स्मसि, स्यातन, घ्नन्ति, यन्ति, स्थन, पान्ति, विदथुः.

वरील तिङन्तांकडे पाहिले की, असे लक्षात येईल - येथे उशन्ति, विद्याम इ. √विद धातूची रूपे, हत, वगैरे √हन् धातूची रूपे, यामध्ये 'वश कान्तौ' 'विद ज्ञाने' व 'हन

---

१ पहा. - प्रास्ताविक, प्रक. ३, पृ. क्र. १५५

२ पा.सू. ३।१।३

३ अदिप्रभृतिभ्यः शपः। पा.सू. २।४।७२

हिंसागत्योः' हे तीन धातू धातुपाठात अदुपदेश आहेत[१] म्हणून 'तास्यनुदात्तेत्.'[२] या सूत्राने त्या पुढील प्रत्यय अनुदात्त झालेला नाही. यावरुन असा नियम मिळेल की "धातुपाठातील अदुपदेशत्व हे प्रत्ययस्वरास बाधक ठरत नाही". पण 'धातुपाठातील अनुदात्तेत् व ङित्त्व प्रत्ययस्वरास अनुदात्त करते'. उदा. – आसते, ईमहे वगैरे.[३]

ii) "जेथे मूळ उक्त विकरणाचा लोप होतो, येथेही प्रत्ययस्वरच आढळतो" –

उदा.– श्रुधी, युक्ष्वा, कृष्वा, कृधी, भूयाम, हुवे, ऋधाथे, कृण्वे, ऋधाम शग्धि, पूर्धि, धेथे, भूयाः, भूतम्, कृधः, कृतम्, श्रुतम्, गमन्त, दद्धि.

iii) "जेथे विकरणस्वराचा लोप[४] होतो, तेथेही प्रत्ययस्वरच आढळतो" –

उदा.– छिन्धि, वृञ्जे, इन्धते, पृणन्ति, वृणते, युञ्जते, उञ्जति, तुञ्जाते, पृञ्चते, तुञ्जते, युञ्जाथे.

iv) "श्लु निमित्त अभ्यस्त धातूपुढील उदात्त लसार्वधातुक प्रत्यय कायम राहतो[५]"

उदा.– जुहूमसि, ररन्धि, पिपृतम्, शुशुग्धि, ववृधीथाः, दिधृत, युयोधि.

v) "लिङ् लकारातही प्रत्ययस्वर शेष राहतो, अदुपदेश नसताना[६]"

उदा.– वोचेयुः, मंसीमहि, दृशेयम्, ऋध्याम, पदीष्ट, वोचम, भक्षीय, वन्दिषीमहि, भूयाः, मंसीष्ठा, सासह्याम, ववृधीथाः, तुतज्यात्, जुगुर्यात.

---

१ पहा. – पाणिनीय धातुपाठ, १) बोहतलिंक यांनी इ.स. १८८७ मध्ये (N.L.Wertergaard) (१८४१) यावरुन) प्रसिद्ध, २) सिद्धान्तकौमुदी, संपा. वा.ल.पणशीकर, १९१५, ३) 'भाषावृत्ति', संपा. श्रीशचंद्र कुलकर्णी, १९१८, ४) Bruno Liebich, यांचा धातुपाठ १९२०, ५) 'पाणिनि शब्दकोश', पाठक-चित्राव, १९३५, ६) Panini Studies (DCBCSIS), डेक्कन कॉलेज पुणे, प्रकाशन, S. M. Katre, ७) वै.सि.कौ. संपा. म. दा. साठे, ८) 'धातुपाठ' संपा. डॉ. नरेंद्र झा, २०००

२ पा. सू. ६।१।१८६

३ पहा. – प्रक. १.२.१ व १.२.२

४ येथे 'विकरणस्वर लोप' म्हटले आहे; कारण रूधादिगणस्थ धातूंपुढे अपित् प्रत्यय असताना 'श्नसोरल्लोपः।६।४।१११' ने 'अ' या विकरणस्वराचा लोप होऊन 'ण्' शेष राहतो; म्हणून म्हटले आहे.

५ 'उदात्तलसार्वधातुक' म्हटले कारण उदात्तिरहित अनुदात्त लसार्वधातुक असताना अभ्यस्तस्वर होतो, म्हणून.

६ 'अदुपदेश नसताना' कारण तो असेल तर 'तास्यनुदात्तेन्ङि.।६।१।१८६' ने प्रत्ययस्वर अनुदात्त होतो व तो होऊ नये; म्हणून.

vi) "लिट् लकारातदेखील प्रत्ययस्वर शेष राहतो, लित् प्रत्यय वगळून[१]"

उदा.- शेपे, ईधे, विद्रे, ईयुः, आनृचुः, पस्पशे, दधे, आपुः, चक्रे, चकृम, जुह्वे, युयुधाते, दधुः, दध्रे, दधिध्वे, विविदे, ऊहथुः, पपथुः, तित्विषे, चकृषे, आनुशुः, तस्थौ, चकुः, तस्थुः, ससृज्महे, दधिषे, ददाशिम, चक्र, चक्रथुः, चक्राथे, ईषयुः, ऊपथुः, ददाशुः, जगृभ्रे, दधाथे.

**२) विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर -**

i) विकरणस्वर प्रत्ययस्वरापेक्षा बलवान ठरत नाही, हा नियम जो वार्तिककारांनी केला आहे हा नियम "सार्वधातुकात 'स्वादिगण' व 'क्र्यादिगण' 'तनादिगण' या गणातील अपित् प्रत्ययांनाच लागू पडतो."

उदा.- कृणुहि, पृणुतम्, कृणुतम्, शृणुष्व, शृणुहि, शृणुत (स्वादिगण); वनुयाम, (तनादिगण); पृणीत, मिनीमसि, गृणीषे, वृणीते (क्र्यादिगण).

"वन्वे, शृण्वे, तन्वन्ति, शृण्वन्तु" या चार तिङन्तांचाही विकरणस्वर बाध होतो व प्रत्ययस्वर शेष राहतो.

ii) "बाकी शप्, श. श्यन्, अय (णिच् + शप्), यक्, स्य, तास्" यांच्या पुढील प्रत्ययस्वराचाच बाध होतो; त्यामुळे येथे 'विकरणस्वर' बलवान ठरतो, त्यामुळे विकरणस्वराच्या सतिशिष्ट नियमास वरील विकरणे अपवाद आहेत. अधिक विवेचन 'विकरणस्वर' प्रकरणात केलेले आहेच.

**३) चित् प्रत्ययस्वर -**

वास्तविक पाहता या चित् प्रत्ययस्वराची कक्षा बरीच रूंद आहे; पण येथे मात्र लिट् लकारापुरतीच मर्यादीत आहे. यावरून नियम करता येतो की - १) "लिट् लकारात चित् प्रत्ययस्वर असतो."

उदा.- शृण्विरे, दधिरे, चक्रिरे, येमिरे, बुभुज्रिरे, सश्चिरे.

---

१ 'लित् वगळून' कारण 'लित्' मूळे प्रत्ययपूर्ववर्ति स्वरोदात्त होतो; व प्रत्यक्ष प्रत्यय स्वर अनुदात्त म्हणून.

**सारांश :**

थोडक्यात, वरील विवेचनावरून असे म्हणता येईल की गणनिहाय स्वरविवेचन करणे सहज आहे, ते असे -

**अ) सार्वधातुक -**

१) अदादिगणस्थ प.प. धातूंपुढील अपित् प्रत्यय उदात्त असतात.

२) अदादिगणस्थ ञित् व स्वरितेत् धातूंपुढील अपित् प्रत्यय उदात्त असतात.[१]

३) जुहोत्यादिगणस्थ धातूंपुढील हलादि अपित्[२] प्रत्ययच उदात्त असतात.

४) स्वादिगणस्थ धातूंपुढील अपित् प्रत्यय उदात्त असतात.

५) रूधादिगणस्थ धातूंपुढील अपित् प्रत्यय उदात्त असतात.

६) तनादिगणस्थ धातूंपुढील अपित् प्रत्यय उदात्त असतात.

७) क्रयादिगणस्थ धातूंपुढील सुद्‌धा अपित् प्रत्यय उदात्त असतात.

अर्थात स्वादिगण, रूधादिगण, तनादिगण, क्रयादिगण या चारही गणातील धातूंपुढील अपित् लसार्वधातुक प्रत्यय उदात्त असतात.

**ब) आर्धधातुक -**

१) लिट् लकारातील लित् प्रत्यय वगळून इतर प्रत्यय आद्युदात्त असतात.

२) लिट् लकारातील चित् प्रत्यय मात्र अन्तोदात्त असतो.

३) आशीर्लिङ् लकारात देखील प्रत्ययस्वर शेष राहतो.

यावरून वैदिक उदाहरणांबाबत पुढील नियम मांडता येतात -

---

१ 'ञित् व स्वरित्' यांचे ग्रहण केले कारण उभयपदी धातूंचे ग्रहण व्हावे. त्यामुळे आत्मनेपदी प्रत्यय अनुदात्त होणार नाहीत.

२ 'हलादि अपित्' म्हटले कारण 'नुसते अपित्' म्हटले असते तर 'अजादि व हलादि' अशा दोहोंचा समावेश होऊन अतिव्याप्ती झाली असती. कारण अजादि प्रत्यय असताना प्रत्यय स्वराचा बाध होऊन अभ्यासस्वर शेष राहतो; म्हणून 'हलादि' म्हटले तर अपित्: म्हटल्याने ते आपोआपच प्रत्ययस्वराने उदात्त होतील व पित् चा निषेध होतो.

१) वेदात जर अदादिगणाप्रमाणे शपादिकांचा लोप असता, त्याप्रमाणे (अदादिगणाप्रमाणे) प्रत्ययस्वर आढळतात.

२) वेदात विकरणव्यत्ययाने जे विकरण होईल; त्यानुसार ते विकरण ज्या गणाचे असेल, त्याप्रमाणे नियम लागू होतात.

## प्रकरण चवथे

# आगम स्वर


| अ. क्र. | शीर्षक | पृ. क्र. |
|---|---|---|
| ४.० | प्रास्ताविक | १९१ |
| ४.१ | अडुदात्त स्वर | १९२ |
| ४.२ | आडुदात्त स्वर | १९२ |
| ४.३ | स्वरसाधक सूत्रे व विवेचन | १९२ |
| ४.४ | स्वरसिद्धी प्रक्रिया | १९३ |
| ४.५ | प्रत्यक्ष स्वरसिद्धी | १९३ |
| ४.६ | मूल्यमापन | २१८ |

# प्रकरण चवथे

## आगम स्वर

### ४.० प्रास्ताविक :-

आता पर्यंत मागील प्रकरणात धातुस्वर, विकरणस्वर व प्रत्ययस्वर पाहिले. पण या तीनही स्वरांचा बाध करून शेष राहणारा सर्वात प्रबळ असा हा आगम स्वर आहे. वास्तविक पाहता 'आगमा अनुदात्ता भवन्ति'[१] असा पारिभाषिक नियम आहे. पण त्यास लङ्, लुङ व लृङ् या तीन ङित लकारात होणारे अडागम व आडागम हे अपवाद आहेत. किंबहुना आगम हे अनुदात्त असतात हेच सिद्ध करण्यासाठी महर्षी पाणिनींनी मुद्दाम हे दोन आगम उदात्त व्हावेत म्हणून त्यांना स्वतंत्रपणे उदात्तत्व सांगितले आहे, असे म्हणावयास हरकत नाही.

प्रस्तुत प्रकरणात 'अडागम' व 'आडागम'या दोन आगमांनी युक्त असणाऱ्या तिङन्ताचा अभ्यास केला आहे. हे दोन्ही आगम टित् आहेत त्यामुळे आदिस्थानी होतात.[२] तर उपरोक्त तीन लकारात हे आगम अंगाचे आदिस्थानीचे अवयव होतात.[३] स्वर प्रक्रियेनुसार विकरणस्वर व आगमस्वर ही दोन्ही कार्ये एकत्रितपणे प्राप्त होतात. त्यात विकरण करण्याआधी व नंतर 'अट्' आगम प्राप्त आहे, त्यामुळे अट् नित्य झाला. आणि विकरणदेखील अट्/आट् करण्याआधी व नंतर ही प्राप्त आहे. त्यामुळे विकरणही नित्य आहे. तसेच अंगकार्य विकरणांना होणे हेच प्रथम इष्ट आहे; कारण विकरणानंतर सर्वांची 'अंग' संज्ञा होते[४] आणि अंग संज्ञेनंतर अट्/आट् व्हावा म्हणूनच 'शब्दान्तरस्य च प्राप्नुवन् विधिरनित्यो भवति'[५] अशी परिभाषा पठित आहे. त्यानुसार येथे अट्/आट् पहिल्यांदा धातूला प्राप्त आहे आणि विकरण केल्यानंतर विकरणसहित सर्वांची अंगसंज्ञा झाल्यानंतर सगळयांना प्राप्त होतो.

---

१ पहा. - पारिभाषिक:, वै. पुस्त. अजमेर, पृ. क्र. ११२.

२ आद्यन्तौ टकितौ पा. सू. १।१।४६

३ ''एषु परष्वङ्गस्याऽडागम:स्यात्, स चादोत्ता'' पहा. - वरदराजकृत वृत्ती, ल. सि. कौ. संपा. हरेकान्तमिश्र, पृ.क्र.२६७.

४ यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्।१।४।१३

५ ''जी दोन कार्ये एकत्रित प्राप्त होतात आणि ती दोन्ही नित्य ठरत असतील, तर त्यातील एकविधी होण्यापूर्वी ज्या शब्दाला दुसरा विधी प्राप्त आहे आणि पहिले कार्य झाल्यानंतर तो विधी दुसऱ्या शब्दास प्राप्त होत असेल, तर तो अनित्य असतो'' यानुसार अट्/आट् अनित्य.

म्हणून अट्/आट् आगम प्रस्तुत परिभाषेने अनित्य होतो, नंतर विकरण व विकरणस्वर होतो, त्याचा प्रत्ययस्वराने बाध झाला अथवा नाही तरी त्यानंतर अट्/आट् आगम होतो व उदात्त होतो. त्यामुळे तो सतिशिष्ट स्वर बलवान ठरून शेष सर्वानुदात्त[१] होतात व तिङन्तात केवळ अट् वा आट् आगमस्वर शेष राहतो.

थोडक्यात, आगमस्वर या प्रकरणात १) अडुदात्त आगमस्वर व २) आडुदात्त आगमस्वर असे दोन प्रकार करून त्यांचे विवेचन केलेले आहे.

### ४.१ अडुदात्त स्वर -

लङ्, लुङ् व लृङ् या तीन लकारात अंगाला अट् असा आगम होतो.[२] यामध्ये अंग ही संज्ञा[३] व धातू व विकरण या दोहोंना मिळून होते. त्यामुळे हलादिधातूंना वा हलादिअंगास अडागम होतो. व तो उदात्त सांगितला असल्यामुळे सतिशिष्ट स्वर बलवान असतो[४] या परिभाषेने तो कायम राहून आद्युदात्त तिङन्त सिद्ध होते.

### ४.२ आडुदात्त स्वर -

लङ्, लुङ् व लृङ् या तीन लकारात अजादि-अंगाला आट् असा आगम सांगितलेला आहे व हा टित् असल्यामुळे अंगाच्या आदिस्थानी होतो[५] व पूर्ववत् सतिशिष्टतेने बलवान ठरून तिङन्त आद्युदात्त सिद्ध होते.

### ४.३ स्वरसाधक सूत्रे व विवेचन :-

अ) लङ्लुङ्लृङ्क्ष्वडुदात्तः।६।४।७१।

लङ्, लुङ् व लृङ् या लकारात अंगाला अडागम होतो व तो उदात्त होतो. येथे 'अङ्गस्य'[६] असा अधिकार आहे. म्हणून 'अंगाला' अडागम होतो असे म्हटले आहे. धातू

---

१ अनुदात्तं पदमेकवर्जम्। पा. सू. ६।१।१५८ ने सर्वानुदात्त.

२ लङ्लुङ्लृङ्क्ष्वडुदात्तः। पा. सू. ६।४।७१

३ यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्। १।४।१३

४ सतिशिष्टस्वरबलीयस्त्वमन्य विकरणेभ्य इति वाच्यम् (वा.) पहा. पृ. क्र. १६०

५ आद्यन्तौ टकितौ। १।१।४६

६ पा. सू. ६।४।१

विकरणासह अंग संज्ञक होते, ते असे – उदा. भू धातूच्या पुढे लट्[१] प्रत्यय शास्त्राने सांगितला आहे. म्हणून 'भू' धातू ही प्रकृती झाली. आता 'भू' ही प्रकृती आरंभी असलेला त्या लट् प्रत्ययाच्या मागील 'शप्'[२] विकरणासह भू + अ (भव) अंगसंज्ञा होते व भू + अ + ति असे असताना अडागम होऊन तो शेष राहतो.

ब) आडजादीनाम्।६।४।७२।

लङ्, लुङ् व लृङ् लकारात अजादि-अंगाला आडागम होतो व तो उदात्त होतो. येथे 'लङ्लुङ्लृङ्क्ष्वडुदात्तः'[३] यातून 'लङ्लुङ्लृङक्षु' व 'उदात्तः' यांची अनुवृत्ती येते. येथेही 'अङ्गस्य'[४] याची अनुवृत्ती आहे. हा आडागम अजादि-अंगास अर्थात अजादिधातूंना सांगितला आहे, व तो उदात्त पूर्ववत् शेष राहतो.

## ४.४ स्वरसिद्धी प्रक्रिया –

प्रथम धातुस्वर, त्यानंतर प्रत्ययस्वर त्याचा बाध करून उदात्त; त्यानंतर विकरणस्वर, अंगसंज्ञा त्यानंतर हलादि-अंगास अडागम वा अजादि-अंगास आडागम व उदात्त शेष सर्वांचा निघात, आगमस्वर शेष.

## ४.५ प्रत्यक्ष स्वरसिद्धी –

१) अडुदात्त स्वर २) आडुदात्त स्वर या दोन प्रकारात पुढील प्रमाणे –

---

१ वर्तमाने लट्। पा. सू. ३।२।१२३
२ कर्तरि शप्। पा. सू. ३।१।६८
३ पा. सू. ६।४।७१
४ पा. सू. ६।४।१

## ४.१ अडुदात्त स्वर

| | | |
|---|---|---|
| १) | **अविंन्दः** | प्रस्तुत तिङन्त 'विदॢ लाभे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| | विदॢ लाभे | भूवादयो धातवः।१।३।१ ने धातुसंज्ञा |
| | **विद्** | धातोः।६।१।१६२।[१] ने धातुस्वर उदात्त |
| | **विद्** + लङ् | अनद्यतने लङ्।३।२।१११।[२] ने भूतकाळार्थी लङ् लकार |
| | **विद्** + सिप् | तिप्तस्झि.।३।४।७८। ने सिप् |
| | **विद्** + श + सिप् | तुदादिभ्यः शः।३।१।७७।[३] ने 'श' विकरण |
| | **विद्** + **श** + सिप् | आद्युदात्तश्च।३।१।३।[४] ने विकरणस्वर उदात्त |
| | विद् + **श** + सिप् | अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८।[५] ने शेष अनुदात्त |
| | विद् + **श** + स् | इतश्च।३।४।१००।[६] ने इकार लोप |
| | विन्द + **अ** + स् | शे मुचादीनाम्।७।१।५९।[७] ने नुमागम |
| | **अ** + वि**न्द** + स् | लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः।६।४।७१।[८] ने अडागम व तो उदात्त |
| | **अ**विन्द + स् | अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।५८।[९] ने अडुदात्त सतिशिष्टस्वर बलवान ठरून शेष अनुदात्त |

---

१ सार्थ विवेचन पृ. क्र. ७८
२ "अनद्यतन भूतकारणर्थी धातूहून लङ् लकार होतो."
३ "तुदादिगणपठित धातूहून कर्तरी अर्थी श हे विकरण होते"
४ सार्थ विवेचन पृ. क्र. १२८
५ सार्थ विवेचन पृ. क्र. १५९
६ "ङित् लकार (लुङ्, लङ्, लृङ्) संबंधित परस्मैपदाच्या इकाराचा लोप होतो."
७ "श हे विकरण पुढे असताना मुच्, लिप्, विद्, लुप्, सिच्, कृत्, खिद्, पिश् या आठ धातूंना नुमागम होतो."
८ सार्थ विवेचन पृ. क्र. १९२
९ सार्थ विवेचन पृ. क्र. १५९

| | | |
|---|---|---|
| | अविन्दः | ससजुषो रुः।८।२।६६। ने रेफ व खरवसानयोर्विसर्जनीयः।८।३।७५। ने विसर्ग |
| | अविंन्दः | उदात्तादनुदात्तस्य स्वरितः।८।४।६६।[१] ने 'वि' स्वरित |
| | अविंन्दः | स्वरितात्संहितायामनुदात्तानाम्।१।२।३९।[२] ने एकश्रुती व स्वरसिद्धी पूर्ण. |
| २. | असृंग्रम्[३] | प्रस्तुत तिङन्त 'सृज विसर्गे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार उत्तम पुरुष एकवचन |
| ३. | अजोषाः[४] | प्रस्तुत तिङन्त 'जुषी प्रीतिसेवनयोः' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ४. | अरुंहत्[५] | प्रस्तुत तिङन्त 'रुह बीजजन्मनि प्रादुर्भावे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ५. | अस्पंष्ट[६] | प्रस्तुत तिङन्त 'स्पश बाधनस्पर्शनयोः' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् प्रथम पुरुष एकवचन |
| ६. | अपंश्यम्[७] | प्रस्तुत तिङन्त 'दृशिर् प्रेक्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार उत्तम पुरुष एकवचन |

---

१ सार्थ विवेचन पृ. क्र.८०

२ सार्थ विवेचन पृ. क्र.८१

३ तस्थस्थमिपां तान्तन्तामः।३।४।१०१। ने अमादेश व अनुदात पित्त्वामुळे ; तुदादिभ्यःश ३।१।७७। ने श विकरण व उदात्त ; अडागमाने विकरणस्वराचा बाध करून शेष; बहुलं छन्दसि ७।१।८ ने रुडागम विकरणास, व "वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति" या परिभाषेनुसार विकल्पाने गत्व.

४ व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने पदप्रत्यय येऊन परस्मैपद; सिप्; इतश्च ।३।४।१०० ने इकारलोप, छन्दस्युभयथा ।३।४।११७ ने आर्धधातुक संज्ञा त्याने पुगन्तलघूपधस्य च ।७।३।८६ ने गुण ; 'वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति' परिभाषेने 'अतो दीर्घो यञि ।७।३।१०१। ने यञि' नसतानाही अदत्त अंगास दीर्घत्व; विकरणस्वराचा बाध होऊन अडागम शेष.

५ इतश्च ।३।४।१०० ने इकारलोप; व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने विकरण व्यत्यय येऊन 'श' विकरण; अपित्त्वाने उदात्त व क्ङिति च ।१।१।५ ने गुणनिषेध ; विकरणस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

६ बहुलं छन्दसि ।२।४।७३ ने शपाचा लोप ; व्रश्चभ्रस्जसृज.।८।२।३६ ने शकाराला षत्व; ष्टुना ष्टु।८।४।४१ ने ष्टुत्व ; प्रत्ययस्वराचा बाध करून अडागम शेष.

७ तस्यस्थामिपां तान्तन्तामः ।३।४।१०१ ने अमादेश व अनुदात्त ; पाघ्राध्मास्था. ७।३।७८ ने पश्यादेश ; धातुस्वराचा बाध करून अडागम शेष.

७. **अका॑रि**[१] प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

८. **अक॑र्त**[२] प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

९. **अधा॑रयन्त**[३] प्रस्तुत तिङन्त 'धृञ् धारणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. ण्यन्त, लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन

१०. **अभ॑जन्त**[४] प्रस्तुत तिङन्त 'भज सेवायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन

११. **अवि॑न्दत्**[५] प्रस्तुत तिङन्त 'विद्लृ लाभे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

१२. **अह्व॑त्**[६] प्रस्तुत तिङन्त 'ह्वेञ् स्पर्धायां शब्दे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

१३. **अम॑न्महि**[७] प्रस्तुत तिङन्त 'मन ज्ञाने' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

---

१ भावकर्मणोः ।३।१।३६ ने कर्मणी, आत्मनेपद, चिण् भावकर्मणोः ३।१।३६ ने च्लिस्थानी चिण् व प्रत्ययस्वराने तो उदात्त; लघूपधेस गुण ; चिणो लुक् ।६।४।१०४ ने तप्रत्ययलोप; अडागमाने चिण् (इ) या विकरण प्रत्ययाच्या स्वराचा बाध करून शेष.

२ व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने विकरण व्यत्यय येऊन 'शप्' विकरण ; बहुलं छन्दसि ।२।४।७३ ने शपाचा लोप; सार्वधातुकार्धधातुकयोः ।७।३।८४। ने गुण ; प्रत्ययस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

३ हेतुमति च ।३।१।२६ याने णिच ; अचो ञ्णिति।७।२।११५ ने वृद्धी; चितः ।६।१।१६३ ने चित् विकरणस्वर; सनाद्यन्ता धातवः ।३।१।३२ ने धातुसंज्ञा, कर्तरि शप् ।३।१।६८ ने शप्; तास्यनुदात्तेन्ङिदुपदे.।६।१।१८६ ने 'अन्त' प्रत्यय अनुदात्त; विकरणस्वराचा बाध करून अगगम शेष.

४ तास्यनुदात्तेन्ङिद्दुपदेशाल्ल. ।६।१।१८६ ने 'अन्त' प्रत्यय अनुदात्त; धातुस्वराचा बाध करून अडागम शेष.

५ इतश्च।३।४।१०० के इकारलोप ; तुदादिभ्यः शः।३।१।७७ ने श विकरणस्वर; त्याचा बाध करून अडागमस्वर शेष.

६ बहुलं छन्दसि ।६।१।३४ ने संप्रसारण; इतश्च। ३।४।१०० ने इकारलोप ; "वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति" या परिभाषेने अङादेश ; त्याच्या विकरण स्वराचा बाध करून अडागम स्वर शेष.

७ व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने विकरण व्यत्यय येऊन शप्; बहुलं छन्दसि ।२।४।७२ ने शपाचा लोप; प्रत्ययस्वराचा बाध करून अडागम शेष.

१४. अजायन्त[१] — प्रस्तुत तिङन्त 'जनी प्रादुर्भावे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन

१५. अरैजेताम्[२] — प्रस्तुत तिङन्त 'रेजृ कम्पने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष द्विवचन

१६. असघ्नोः[३] — प्रस्तुत तिङन्त 'षघ हिंसायाम्' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

१७. अयजः[४] — प्रस्तुत तिङन्त 'यज देवपूजासंगतिकरणदानेषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

१८. अगाम[५] — प्रस्तुत तिङन्त 'इण् गतौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

१९. अहन्[६] — प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

२०. अमिनाः[७] — प्रस्तुत तिङन्त 'मीञ् हिंसायाम्' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

२१. अजयः[८] — प्रस्तुत तिङन्त 'जि जये' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

---

१ दिवादिभ्यः श्यन् ।३।१।६९ ने श्यन् व नित् विकरणस्वर; त्याचा बाध करून अडागम शेष.

२ तास्यनुदात्तेत्. ।६।१।१८६ ने अनुदात्तेत् मुळे 'इताम्' अनुदात्त ; धातुस्वर शेष व त्याचा बाध करून अडागस्वर शेष.

३ स्वादिभ्यः श्नुः ।३।१।७३। ने श्नु विकरणस्वर ; सिप् च्या इकाराचा इतश्च ।३।४।१०० ने लोप ; विकरणस्वराचा बाध करून अडागम शेष.

४ सिप्च्या इकाराचा इतश्च ।३।४।१०० ने लोप; धातुस्वराचा बाध होऊन अडागमस्वर शेष.

५ विभाषा लुङ्लृङोः ।२।४।५० ने विकल्पाने गाङ् आदेश ; प्रत्ययस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

६ अदिप्रभृतिभ्यः शपः ।२।४।७२। ने शपाचा लोप; इतश्च ।३।२।१०० ने इकारलोप; धातुस्वर शेष; हल्ङ्याब्भ्यो.६।१।६८ ने तकारलोप; धातुस्वरचा बाध करून अडागमस्वर शेष.

७ क्रयादिभ्य; श्ना ।३।१।८१ ने श्ना विकरण व स्वर ; सिप् च्या इकाराचा इतश्च ।१।४।१०० ने लोप; विकरणस्वराचा बाध करून अडागमस्वर.

८ पहा 'अयजः' प्रमाणे. त. टी. क्र. १७.४

| | | |
|---|---|---|
| २२. | **अकिरत्**[१] | प्रस्तुत तिङन्त 'कॄ विक्षेपे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २३. | **अगच्छत्**[२] | प्रस्तुत तिङन्त 'गम्लृ गतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २४. | **अतर:**[३] | प्रस्तुत तिङन्त 'तॄ प्लवनतरणयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| २५. | **अयाम**[४] | प्रस्तुत तिङन्त 'या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| २६. | **अयातयन्त**[५] | प्रस्तुत तिङन्त 'यती प्रयत्ने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. ण्यन्त, लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| २७. | **अयोधय:**[६] | प्रस्तुत तिङन्त 'युध सम्प्रहारे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| २८. | **अयुयुत्सन्**[७] | प्रस्तुत तिङन्त 'युध सम्प्रहारे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. सन्नन्त, लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| २९. | **अबुभोजी:**[८] | प्रस्तुत तिङन्त 'भुज पालनाभ्यवहारयो:' या 'रूधादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |

---

१ ऋत इध्दतो: ।७।१।१०० ने इकारादेश ; तुदादिभ्य: श: ।३।१।७७ ने श विकरणस्वर ; त्याचा बाध करून अडागमस्वर शेष.

२ इषुगमियमां छ: ।७।३।७७ ने छत्व; धातुस्वर त्याचा बाध करून अडागमस्वर शेष.

३ सार्वधातुकार्धधातुकयो: ।७।३।८४ ने गुण ; धातुस्वराचा बाध करून अडागम स्वर शेष.

४ अदिप्रभृतिभ्य: शप: ।२।४।७२। ने शपाचा लोप; प्रत्ययस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

५ अत उपाधाया: ।७।२।११६ ने उपधावृद्धी शेष स्वरसिद्धी 'अधारयन्त' प्रमाणे – पहा. त. टी. क्र.९.३

६ पुगन्तलघूपधस्य च ।७।३।८६ ने उपधातुण; इतश्च ।३।४।१०० ने सिप्च्या इकाराचा लोप; चित्विकरणस्वराचा बाध करून अडागमस्वर.

७ धातो: कर्मण: समानकर्तृकादिच्छायां वा ।३।१।७ ने सन्, सन्यङो ।६।१।९ ने द्वित्वाभ्यासादिकार्ये नित्स्वराने अभ्यासादिस्वर उदात्त सनाद्यन्ता; धातव: ।३।१।३२ ने धातुसंज्ञा; धातो: ।६।१।१६२। ने अन्तोदात्त; शप्, अदुपदेशाने 'अन्' अनुदात्त ; धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

८ व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने शप् विकरण; बहुलं छन्दसि ।२।२।७६ ने श्लु ; श्लौ ।६।१।१० द्वित्व ; च्छन्दसि सर्वे विधयो अवन्ति या परिभाषेने ईडागम ; इतश्च ।३।४।१०० ने इकारलोप धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

| | | |
|---|---|---|
| ३०. | अवर्धत[१] | प्रस्तुत तिङन्त 'वृधु वृद्धौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३१. | अस्थात्[२] | प्रस्तुत तिङन्त 'ष्ठा गतिनिवृत्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३२. | अकृण्वत[३] | प्रस्तुत तिङन्त 'कृवि हिंसाकरणयोश्च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३३. | असर्जि[४] | प्रस्तुत तिङन्त 'सृज विसर्गे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३४. | अरैजन्त[५] | प्रस्तुत तिङन्त 'रेजृ कम्पने' या 'भवादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ३५. | अबीभयन्त[६] | प्रस्तुत तिङन्त 'ञिभी भये' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. ण्यन्त, लुङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ३६. | अचोदयः[७] | प्रस्तुत तिङन्त 'चुद संचोदने' या 'चुरादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ३७. | अभूत्[८] | प्रस्तुत तिङन्त 'भू सत्तायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |

---

१ तास्यनुदानेत्. ।६।१।१६६ ने 'त' प्रत्यय अनुदात्त धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

२ इतश्च ।३।४।१०० ने इकारलोप, गातिस्थाघुपा.।२।४।७७। ने सिज्लोप; धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

३ इदितो नुम् धातोः।७।१।५८ ने नुमागम; तास्यनुदातेन्ङिद्दुपदेशा.।६।१।१८६ ने प्रत्यय अनुदात्त; धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

४ पुगन्तलघूपधस्य च।७।३।८६ ने उपधागुण; शेष स्वरसिद्धी 'अकारि' प्रमाणे पहा. त. टी. क्र. ७.१

५ तास्यनुदात्तेन्ङिद्दुपदेशा.।६।१।१८६ ने प्रत्यय अनुदात्त; धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर.

६ हेतुमति च।३।१।२६ ने णिच, सनाद्यन्ता धातवः।३।१।३२। ने धातुत्व; लुङ्, च्लि लुङि ।३।१।४३। ने च्लि; णिश्रिद्रुस्रुभ्य.३।१।४६ ने चङ्, 'अ+ भाषि + अ + अन्त' असताना ; णेरनिटि ।६।४।५१ ने णिलोप; णौ चङ्युपधायाः ऱ्हस्वः।७।४।१। ने उपधा ऱ्हस्व; चङि।६।१।११ के द्वित्वाभ्वासादिकार्ये; सन्वल्लुघुनि.।७.४।९३ ने सतिदेशः सन्यतः।७।४।७९ ने अभ्यासइत् ; दीर्घो लघोः।७।४।९४ ने अभ्यास दीर्घ ; अडागम स्वर शेष.

७ सत्यापपाश. चुरादिभ्यो णिच्।३।१।२५ णिच् चित्स्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

८ पहा. 'अस्थात्' प्रमाणे त. टी. क्र. ३१.२

३८. अदर्शि[१] — प्रस्तुत तिङन्त 'दृशिर् प्रेक्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

३९. अदृश्रम्[२] — प्रस्तुत तिङन्त 'दृशिर् प्रेक्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार उत्तम पुरुष एकवचन

४०. अयुक्त[३] — प्रस्तुत तिङन्त 'युजिर् योगे' या 'रूधादिगणस्थ' धातूचे आ.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

४१. अगन्म[४] — प्रस्तुत तिङन्त 'गम्लृ गतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार उत्तम पुरुष बहुवचन

४२. अधारय:[५] — प्रस्तुत तिङन्त 'धृञ् धारणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

४३. अवधी:[६] — प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्यो:' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

४४. अजुह्वत[७] — प्रस्तुत तिङन्त 'हु दानादानयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन

---

१ पहा. 'असर्जि' प्रमाणे त. टी. क्र. ३३.४

२ इरितो वा।३।१।५७ ने च्लिचा अङादेश; बहुलं छन्दसि।७।१।८ ने रुडागम; अङ् विकरण प्रत्ययाचा बाध करून अडागम शेष.

३ च्ले: सिच्।१।१।४४ ने सिच्; एकाच उपदेशे ऽनुदात्तात्।७।२।१० ने इडागमनिषेध ; लिङ् सिचावा त्मानेपदेषु ।१।२।११ ने सिच् कित; लघूपधगुणाभाव; झलो झलि ।८।२।३०। ने सिच्या सकाराचा लोप; चो: कु: ।८।२।३०। ने कुत्व, प्रत्ययस्वराचा बाध करून अडागम शेष.

४ बहुलं छन्दसि।२।४।७३ ने शपाचा लोप; प्रत्यय स्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

५ इतश्च।३।४।१०० ने इकारलोप; शेष स्वरसिद्धी पहा. अधारयन्त प्रमाणे. त. टी. क्र. ९.३

६ लुङि चा २।४।४३ ने वधादेश ; इतश्च ।३।४।१०० ने इकारलोप; च्ले: सिच् ।३।१।४४ ने सिच्; सार्वधातुकस्येड्. ।७।२।३५ ने इडागम; असिसिचोऽपृक्ते ।७।३।९६ ने ईडागम; इट ईटि ।८।२।२८ ने सिज्लोप; 'सिज्लोप एकादेशे सिद्धो वाच्य' वा. ने सवर्ण दीर्घ धातुस्वरचा बाध करून अडागम स्वर.

७ जुहोत्यादिभ्य: श्लु: ।२।४।७५ ने श्लु: श्लौ।६।१।१० ने द्वित्वाभ्यासादि कार्ये; कुहोश्चु: ।७।४।६२ ने चुत्व; अदभ्यस्तात्। ७।१।४। ने अतादेश ; प्रत्ययस्वराचा बाध करून अडागम स्वर शेष.

| | | |
|---|---|---|
| ४५. | अदँदा:[१] | प्रस्तुत तिङन्त 'डुदाञ् दाने' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ४६. | अवँधीत्[२] | प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्यो:' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ४७. | अयँच्छथा:[३] | प्रस्तुत तिङन्त 'दाण् दाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ४८. | अमँदन्[४] | प्रस्तुत तिङन्त 'मदी हर्षे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ४९. | अयोँयवीत्[५] | प्रस्तुत तिङन्त 'यु मिश्रणेऽमिश्रणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. यङ्लुगन्त, लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ५०. | अभिँनत्[६] | प्रस्तुत तिङन्त 'भिदिर् विदारणे' या 'रूधादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ५१. | अविँदत्[७] | प्रस्तुत तिङन्त 'विद्लृ लाभे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |

---

१ श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; इतश्च।३।४।१०० ने इकारलोप; अनुदात्ते च।६।१।१९० ने अभ्यासादिस्वर उदात्ताचा बाध करून अडागम स्वर शेष.

२ इतश्च।३।४।१०० ने इकारलोप; पहा. 'अवधी:'; प्रमाणे त. टी. क्र. ४३.६

३ इषुगमियमां छ:।७।३।७७ ने छादेश; तास्यसुदात्ते।६।१।१८६ ने 'था:' प्रत्यय अनुदात्त; धातुस्वराचा बाध करून अडागमस्वर शेष.

४ हेतुमति च।३।१।२६ ने णिच्; मदी हर्षग्लेपनयो: घटादिपाठामुळे मित्त्व; मितां ऱ्हस्व:।६।४।९२। ने ऱ्हस्व; छन्दस्युभयथा।३।४।११७। ने शप्, आर्धधातुकाने, णेरनिरि।६।४।५१ ने णिलोप; धातुस्वराचा बाध होऊन अडागमस्वर शेष.

५ धातोरेकाचो हलादे:.।३।१।२२ ते यङ्; सन्यङो; ६।१।९ ने द्वित्वाभ्यासिदिकार्ये; यङोऽचि।२।४।७४ यङ्लुक्, चङ्लुङो।७।४।८२ ने गुण; यङो वा।७।३।९४ ने ईडागम; इतश्च/३/४/१०० ने इकारलोप; धातुस्वराचा बाध करून अडागम स्वर.

६ रुधादिभ्य:श्नम् ।३।१।७८ ने श्नम; इतश्च।३।४।१०० ने इकारलोप; हल्ङ्याब्भ्यो दीर्घा.।६।१।६८ ने तलोप; विकरणस्वराचा बाध होऊन अडागमस्वर शेष.

७ इतश्च।३।४।१०० ने इकारलोप; पणादिद्युताद् लृदित:.।३।१।५५ च्लिस्थानी अङादेश; विकरणस्वर बाध करून अडागमस्वर शेष.

# ५.२ लित् - अभ्यस्त स्वर

| | | |
|---|---|---|
| १) | चकार | प्रस्तुत तिङन्त 'डुकृञ् करणे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| | डुकृञ् करणे | भूवादयो धातव:।१।३।१। ने धातुसंज्ञा |
| | कृ + लिट् | परोक्षे लिट्।३।२।११५।[1] ने लिट् लकार |
| | कृ + तिप् | तिप्तस् झि.।३।४।७८। ने तिप् प्रत्यय |
| | कृ + णल् (अ) | परस्मैपदानां णलतुसुस्थलथुसणल्वमा:।३।४।८२।[2] ने णल् |
| | कृ + कृ + णल् (अ) | लिटि धातोरनभ्यासस्य।६।१।८।[3] ने द्वित्व; व पूर्वोभ्यास:।६।१।४ ने अभ्यास संज्ञा |
| | कृ + **कृ** + णल् (अ) | धातो:।६।१।१६२।[4] ने धातुस्वर व शेष निघात |
| | कर+**कृ**+णल् (अ) | उरत्।७।४।६६।[5] ने अतादेश व रपरत्व; |
| | क + **कृ** + अ | हलादि शेष:।७।४।६०।[6] ने रकारलोप; |
| | क + कृ + **अ** | आद्युदात्तश्च।३।१।३।[7] ने प्रत्ययस्वर प्राप्त असताना |
| | क + **कृ** + अ | लिति।६।१।१९३।[8] ने अभ्यस्ताचा अंत उदात्त; शेष अनुदात्तं पदमेकवर्जम्।६।१।१५८ ने अनुदात्त |
| | च + **कृ** + अ | कुहोश्चु:।७।४।६२।[9] ने चुत्व; |

---

१ "अनद्यतन परोक्षभूतकाळी धातूहून लिट् लकार होतो."

२ "लिट् स्थानीच्या तिप्, तस्, झि; सिप्, थस्, थ; मिप्, वस्, मस्; या नव प्रत्ययांच्या स्थानी अनुक्रमे णल्, अतुस्, उस्; थल्, अथुस अ; णल्, व म आदेश होतात."

३ "लिट् पुढे असताना अभ्यासरहित धातूच्या एकाचास द्वित्व होते ; तर अजादि धातूस द्वितीय एकास द्वित्व होते."

४ सार्थ विवेचन पृ. क्र. ७८

५ "अभ्यासाचा अवयव जो ऋकार त्याच्या स्थानी ऱ्हस्व अकार आदेश होतो."

६ "अभ्यासातील पहिले हल् (व्यंजन) शिल्लक राहून उरलेल्या व्यंजनांचा लोप होतो." यानुसार रलोप झाला.

७ सार्थ विवेचन पृ. क्र. १२८

८ सार्थ विवेचन पृ. क्र. २२४

९ "अभ्यासाच्या कवर्ग व हकार यास्थापनी चवर्गादेश होतो." यानुसार चकार.

| | | |
|---|---|---|
| | चकार | अचो ञ्णिति।७।२।११५।[१] ने वृद्धि व रेफ; व एकादेश उदात्तेनोदात्तः[२]।८।२।५ |
| | चकार | उदात्तादनुदात्तस्य स्वरितः[३]।८।४।६६ ने स्वरित व स्वरसिद्धी पूर्ण. |
| २. | ददाश[४] | प्रस्तुत तिङन्त 'दाशृ दाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३. | दीदेथ[५] | प्रस्तुत तिङन्त 'दीदि दीप्तिकर्मा' या 'छान्दस' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ४. | ततक्ष[६] | प्रस्तुत तिङन्त 'तक्षू तनूकरणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ५. | जघन्थ[७] | प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ६. | दाधार[८] | प्रस्तुत तिङन्त 'धृञ् धरणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ७. | चिकेत[९] | प्रस्तुत तिङन्त 'कित ज्ञाने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |

---

१ "ञित्, णित् प्रत्यय पुढे असताना अजन्त अंगाच्या स्थानी वृद्धी होते."

२ सार्थ विवेचन पृ. क्र. २२४

३ सार्थ विवेचन पृ. क्र. ८०

४ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये ऱ्हस्वः ।७।४।५९ ने ऱ्हस्व; अत उपधायाः।७।२।११६ ने उपधा वृद्धी, लित् स्वराने प्रत्ययपूर्व स्वदोदात्त.

५ छन्दसि वेति वक्तव्यम् या वार्तिकाने लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्यांचा अभाव ; परस्मैपदानां.।३।४।८२। ने थल्: लिट् च ।३।४।११५ ने आर्धधातुक संज्ञा; सार्वधातुकार्धयातुकयोः ।७।४।८३ ने गुण, लित्स्वराने थप्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

६ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; णित्स्वराने प्रत्यय पूर्ववर्तिस्वरोदात्त.

७ लिट् निमित्त द्वित्वभ्यासादिकार्ये; कुहोश्चु।७।४।६२। ने अभ्यासास चुत्व; अभ्यासे चर्च।८।४।५४। ने जकार; अभ्यासाच्च ।७।३।५५ ने अभ्यासपर हकाराचे कुत्व; लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

८ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये; अभ्यासे चर्च।८।४।५४ ने दकार ; उरत्।७।४।६२ ने अतादेश; अचो ञ्णिति।७।२।११५ ने वृद्धी व रेफ; तुजादीनां दीर्घोऽभ्यासस्य।६।१।७। ने अभ्यास, दीर्घोऽभ्यासस्य।६।१।७। ने अभ्यास दीर्घ, लित्स्वराने प्रत्ययपूर्व वर्तिस्वरोदात्त.

९ द्वित्वाभ्यासादिकार्ये; कुहोश्चु ।७।४।४८ ने चुत्व पुगन्तलघूपधस्य च।७।३।८६ ने उपधागुण; लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्ति स्वरोदात्त.

| | | |
|---|---|---|
| ८. | तस्तम्भ[१] | प्रस्तुत तिङन्त 'स्तम्भु रोधने' या सौत्र धातूचे[२] प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ९. | पिपेश[३] | प्रस्तुत तिङन्त 'पिश अवयवे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १०. | जघान[४] | प्रस्तुत तिङन्त 'हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ११. | ददर्श[५] | प्रस्तुत तिङन्त 'दृशिर् प्रेक्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १२. | युयोप[६] | प्रस्तुत तिङन्त 'युपु विमोहने' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १३. | उवाच[७] | प्रस्तुत तिङन्त 'ब्रूञ् व्यक्तायां वाचि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १४. | रिरेभ[८] | प्रस्तुत तिङन्त 'रिभृ शब्दे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १५. | ररक्ष[९] | प्रस्तुत तिङन्त 'रक्ष पालने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |

---

१ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये ; शर्पूर्वाः खयः ।७।४।६१ ने सकारलोप; लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

२ स्तन्भुस्तुम्भुस्कम्भुस्कुम्भुस्कुञ्भ्यः श्नुश्च।३।१।८२। मध्ये पठित आहे ; म्हणून 'सौत्रधातू'.

३ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये ; पुगन्तलघूपधस्य च।७।३।८६ ने उपधागुणः लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

४ द्वित्वाभ्यासादिकार्य; कुहोश्चु।७।४।६२ ने कुत्व; अभ्यासे चर्च।८।४।९४ ने जत्व; अभ्यासाच्च। ७।३।५५ ने अभ्यासपर हकाराचा घत्व; अत उपधायाः।७।२।११६ ने उपधावृद्धी, प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

५ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; उरत्।७।४।६६ ने अभ्यासास अतादेश; पुगन्तलघूपधस्य च।७।३।८६ ने गुण व स्वर; लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त।

६ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; पुगन्तलघुपधस्य च।७।३।८६ ने उपधागुण ; प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

७ ब्रुवो वचिः।२।४।५३ ने वचादेश; द्वित्वाभ्यासादिकार्ये; लिटयभ्यासस्योभयेषाम्।६।१।१७ ने अभ्यासस्थ वचास संप्रसारण; संप्रसारणाच्च।६।१।१०८ ने पूर्वरूप; हलादि शेषः।७।७।६० ने चकारलोप; अत उपधायाः।७।२।११६ ने उपधावृद्धी; प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त।

८ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्य; बहुलं छन्दसि।७।४।७८ ने अभ्यासास इत्व; प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

९ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

| | | |
|---|---|---|
| १६. | पीपाय[१] | प्रस्तुत तिङन्त 'ओप्यायी वृद्धौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १७. | जजान[२] | प्रस्तुत तिङन्त 'जनी प्रादुर्भावे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १८. | तुतोद[३] | प्रस्तुत तिङन्त 'तुद व्यथने' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १९. | आश[४] | प्रस्तुत तिङन्त 'अशू व्याप्तौ सङ्घाते च' या 'स्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २०. | जघास[५] | प्रस्तुत तिङन्त 'अद भक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २१. | ननम[६] | प्रस्तुत तिङन्त 'णम प्रह्वत्वे शब्दे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २२. | मिम्यक्ष | प्रस्तुत तिङन्त 'म्यक्ष गतौ' या छान्दस धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |

## ५.६ मूल्यमापन :-

'अभ्यस्तस्वर' या प्रकरणात 'अभ्यासस्वर' वा 'अभ्यस्तादिस्वर' यांचा व 'अभ्यस्तान्तस्वर' म्हणजे लित् स्वर याचा विचार केलेला आहे. त्यातील 'अभ्यस्तादिस्वर' या

---

१ लिङ्चङोश्च।६।१।२९ ने पी आदेश ; द्वित्वभ्यासादिकार्ये ; अचो ञ्णिति।७।२।११५ ने वृद्धी; आयादेश; तुजादीनां दीर्घो। ।६।१।७ ने अभ्यासदीर्घ, लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

२ द्वित्वाभ्यासादिकार्य; अत उपधाया:।७।२।११६ ने उपधावृद्धी, लित्स्वराने पूर्ववर्तिस्वरोदात्त.

३ द्वित्वाभ्यासादिकार्ये; पुगन्तलपूपधस्य च।७।३।८६ ने उपधागुण: लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्ति स्वदोदात्त.

४ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; अक: सवर्णे दीर्घ:।६।१।१०१ ने दीर्घ स लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

५ लिटयन्तरस्याम् २।४।४० ने अद स्थानी घस्ल् आदेश; द्वित्वाभ्यासादि कार्ये; कुहोश्चु.।७।४।६२ ने जत्व; अत उपधाया:।७।२।११६ ने उपधावृद्धी; लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

६ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; "वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति" परिभाषेने आद्यवृद्धी अभाव; लित्स्वराने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त.

प्रकारात - (अ) अजादिलसार्वधातुक व (ब) अनुदात्तलसार्वधातुक अशा दोन उपप्रकारांचा प्रामुख्याने विचार केला गेला आहे. त्यातील एकेकाचा विचार पुढीलप्रमाणे -

**१) अभ्यस्तादिस्वर - अजादिलसार्वधातुकपूर्वक :-**

प्रत्यक्ष स्वरसिद्धी अंतर्गत ऋग्वेदातील प्रथम मंडळातील ९ तिङन्ते या प्रकारातील आढळली आहेत. त्यापैकी पहिलेच 'दधीत'[१] उदाहरण मननीय आहे. कारण येथे 'ईत' हा प्रत्यय सीयुडागम होऊन 'अजादि' झाला आहे. त्यामुळे 'आगमा अनुदात्ता भवन्ति'[२] अशी परिभाषा आहे. त्यानुसार तो अनुदात्त राहिला; पण प्रत्ययस्वर प्राप्त होऊन त्याने धातुस्वराचा बाध केला आहे. तरी अभ्यस्तादिस्वर नियमाने[३] येथे या प्रत्ययस्वराचा ही बाध करून अभ्यासस्वर उदात्त केला. यावरून असे म्हणता येईल की 'अजादिलसार्वधातुकपूर्वक अभ्यास्तादिस्वर हा प्रत्ययस्वर बाधक असतो.' कारण सार्वधातुकात होणारे प्रत्यय जे अजादि आहेत ते बहुतांशी अपित् आहेत. त्यामुळे तेथे प्रत्ययस्वराचा बाध होतो. यानुसार पुढील जिहीत, पिप्रति, दधति, विवासान् ही चार व 'दधीत' मिळून एकूण पाच उदाहरणे या नियमाची साक्ष देणारी ठरतात.

'दधन्' या उदाहरणात 'अन्' येथे प्राप्त प्रत्ययस्वराचा बाध झाला असला तरी अडागमस्वर या सर्वाहून प्रबळ आहे.[४] तो झाला असता तर हे तिङन्त आद्युदात्त झाले असते व 'आगमस्वर' आढळला असता. पण बहुलेकरून आगम न झाल्यामुळे[५] अभ्यस्तादिस्वर शेष राहिला आहे. यावरून असा नियम सांगता येईल, 'अडादिक-आगमरहित लङ् लकारातील अजादिलसार्वधातुक प्रत्यय पुढे असताना अभ्यस्तादिस्वर उदात्त असतो.'

'विवासान्' या उदाहरणात 'सन्' याचा नित् स्वराने आद्युदात्त झाले[६] असे मानणे योग्य नाही. कारण सन् प्रत्ययामुळे द्वित्व, अभ्यासादिकार्ये झाल्यानंतर 'विवास्' अशा रूपास

---

१ पहा. प्रत्यक्ष स्वरसिद्धी, पृ. क्र.२२६
२ पारिभाषिक वै. पुस्त. अजमेर, पृ. क्र. ११२
३ अभ्यस्तानामादिः। पा. सू. ६।१।१८९
४ पहा. आगमस्वर प्रकरण, प्र क. ४, पृ. क्र.१९१
५ बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि । पा. सू. ६।४।७५
६ ञ्नित्यादिर्नित्यम्। पा. पू. ६।१।१९७

'सनाद्यन्ता धातव:'[१] ने धातुसंज्ञा प्राप्त होईल व पुन्हा 'धातो:'[२] या सूत्राने 'विवास्' या आद्युदात्त रुपास अन्तोदात्त प्राप्त होऊन शेष निघात होतो. त्यानंतर लेट्, आडागम, प्रत्ययस्वर. पण वेदात सार्वधातुक संज्ञा व आर्धधातुक दोन्हीही होतात.[३] त्यामुळे इकारलोप झाल्यानंतर 'अन्' प्रत्यय लसार्वधातुक ठरून प्रत्ययस्वर शेष राहील. त्यामुळे नित् स्वराने आद्युदात्त मानणे योग्य होणार नाही. म्हणून 'अन्' प्रत्यय लसार्वधातुक ठरल्यानंतर 'विवास्' यास पूर्वी अभ्यस्त संज्ञा[४] प्राप्त आहे. त्यामुळे 'अन्' अजादिलसार्वधातुक ठरून अभ्यस्तादिस्वर उदात्त ठरतो,असे म्हणणेच योग्य ठरते; म्हणूनच 'विवासान्' रूप 'अभ्यस्तस्वर' येथे घातले आहे.

वरील विवेचनावरून असा नियम मांडता येईल, ''वेदात लेटात जर द्वित्व, अभ्यासादि कार्ये झाली तर छांदस सार्वधातुक संज्ञेने अभ्यस्तस्वर उदात्त आढळून येतो, अजादि प्रत्यय पुढे असताना.''

याशिवाय 'ददृश्रे', 'ददृशे', 'जंगहे' या तीन तिङन्तांचा विचार करणे आवश्यक आहे. ही तीनही रूपे लिट् लकारातील आहेत. 'एश्' हा प्रथम पुरुष एकवचनाचा प्रत्यय आहे[५], जो प्रत्ययस्वराने उदात्त होणार आहे. पण छांदस सार्वधातुक संज्ञेमुळेच अभ्यस्तादिस्वर उदात्त झाला आहे. यावरून असे म्हणता येते, ''वेदात द्वित्व, अभ्यासादिकार्ये झाली असता छांदस सार्वधातुक[६] संज्ञेमुळे अजादिप्रत्यय असताना विकल्पाने अभ्यस्तस्वर आढळतो.'' येथे 'विकल्पाने' म्हटले, कारण अन्यथा प्रत्ययस्वरही आढळतो, म्हणून आवश्यक आहे.

**२) अभ्यस्तादिस्वर – अनुदात्तलसार्वधातुक :-**

अनुदात्त अर्थात उदात्तरहित लसार्वधातुपूर्वक या प्रकारात वेदातील १५ उदाहरणे आढळली आहेत. त्यापैकी 'ददाति, पिपर्ति, ईयर्ति, दधासि, मिमाति व बिभर्ति' ही ६

---

१ पा. सू. ३।१।३२
२ पा. सू. ६।१।१९२
३ छन्दस्युभयथा । पा. सू. ३।४।११७
४ उभे अभ्यस्तम् । पा. सू. ६।१।५
५ लिटस्तझयोरेशिरेच् । पा. सू. ३।४।८१
६ छन्दस्युभयथा । पा. पू. १।४।११७

उदाहरणे जुहोत्यादिगणस्थ धातूंची आहेत व येथे तिप् व सिप् या दोन प्रत्ययांचा प्रयोग आहे. हे दोन्ही प्रत्यय पित्त्वामुळे अनुदात्त आहेत[१] व लसार्वधातुक देखील आहेत. त्यामुळे अभ्यस्तादिस्वर आढळतो. यावरून असे म्हणता येईल की, ''जुहोत्यादिगणस्थ धातूंच्या अभ्यस्तादिस्वर उदात्त असतो, पुढे पित् लसार्वधातुक प्रत्यय असताना'' याची साक्ष वरील उदाहरणे देतात.

'सिषक्ति' या उदाहरणात मात्र विकरण व्यत्ययाने 'श्लु' होऊन द्वित्व अभ्यासादिकार्ये घडून अभ्यस्तादिस्वर शेष राहिला आहे. यावरून असे म्हटले पाहिले की, ''छांदस द्वित्व, अभ्यासादिकार्ये झाली असता, उदात्तरहित लसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्तस्वर आढळतो.''

वरील नियमात 'चिकेतति, ददाशत्, चिकेतसि, ददाशति' याही उदाहरणांचा समावेश करता येतो. कारण येथे लेट् असला तरी द्वित्व, अभ्यासादिकार्ये घडली आहेत व छांदस सार्वधातुक संज्ञा त्यामुळे अभ्यस्तस्वर आढळतो.

याचबरोबर 'शोशुचत्, वर्वर्ति, चर्कृषत्' ही तीन रूपे देखील महत्त्वपूर्ण आहेत. या तीनही रूपांमध्ये यङ्लुक आहे. त्यातून लेट् लकार करण्यात आलेला आहे. 'शोशुचत् व चर्कृषत्' येथे तिप् च्या इकाराचा लोप झाला आहे.[२] त्यामुळे ते उदात्तरहित आहेत व छांदस सार्वधातुक संज्ञेमुळे लसार्वधातुक होऊन अभ्यस्तादिस्वर झाला आहे. तर 'वर्वर्ति' मध्ये इलोप विकल्पाने झालेला नाही,[३] तरी उदात्तरहित असा अनुदात्त आहे. त्यामुळे अभ्यस्तस्वर आढळतो. यावरून 'यङ्लुगन्त लेट् लकाराचा मागील नियमात समावेश करता येईल.'

### ३) लित् स्वर :-

येथे एकूण २२ उदाहरणांचा विचार केला आहे. यातील सर्व उदाहरणांत प्रत्ययपूर्व स्वरोदात्त आहे. सर्व णल् प्रत्ययान्त उदाहरणे आहेत, तर 'जघन्थ' हे एकच 'थल्' प्रत्ययान्त

---

१ अनुदात्तौ सुप्पितौ । पा. सू. ३।१।४

२ इतश्च लोपः परस्मैपदेषु ।३।४।९७ ने इकाराचा लोप झाला आहे.

३ येथे 'इतश्च लोपः परस्मैपदेषु ।३।४।९७' ने विकल्पाने इकारलोप सांगितला आहे. त्यामुळे विकल्पपक्षी येथे लोप झाला नाही.

आहे. थोडक्यात यावरून असा नियम अभ्यस्तस्वर विषयक मांडता येईल, की ''लित् प्रत्यय पुढे असता लिट् विकारात अभ्यस्तान्त स्वर उदात्त होतो.''

थोडक्यात, असे म्हणता येईल की, जुहोत्यादिगणस्थ धातूंपुढील लट्, लोट्, विधिलिङ्, शतृ-शानजन्त येथे अजादि व उदात्तरहित लसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्तस्वर आढळतो. पण वेदात मात्र जेथे जेथे द्वित्व निमित्त अभ्यासदिकार्ये व छांदस सार्वधातुक संज्ञा असताना अभ्यस्तस्वर आढळतो. त्यामुळे या नियमाचे वेदात वा वैदिक उदाहरणांबाबत अत्यंत व्यापक क्षेत्र ठरेल. हे निश्चितच!

## प्रकरण सहावे

# गतिनिघातस्वर


| अ. क्र. | शीर्षक | पृ. क्र. |
|---|---|---|
| ६.० | प्रास्ताविक | २४१ |
| ६.१ | गतिनिघातस्वर | २४२ |
| ६.२ | स्वरसाधक सूत्रे व विवेचन | २४२ |
| ६.३ | स्वरसिद्धी प्रक्रिया | २४३ |
| ६.४ | प्रत्यक्ष स्वरसिद्धी | २४३ |
| ६.५ | मूल्यमापन | २५७ |

# प्रकरण सहावे

# गतिनिघात स्वर

## ६.० प्रास्ताविक :-

आतापर्यंत उदात्तकाण्डातील तिङन्तांचा अभ्यास करताना केवळ तिङन्त अर्थात त्या उपसर्गरहित धातूंचा अभ्यास केला. पण धातूस उपसर्ग लागून धातूच्या मूळ स्वरूपात लक्षणीय बदल होतो.[१] जसा उपसर्गामुळे धातूच्या अर्थात बदल होतो, त्याप्रमाणे तयार होणाऱ्या तिङन्त स्वरात बदल होतो का याचाही विचार झाला पाहिजे. कारण क्रियेशी योग असताना प्र, परा वगैरे प्रादींना उपसर्ग संज्ञा सांगितलेली आहे.[२] या उपसर्गांच्या स्वराबाबत पाणिनींनी मौन बाळगलेले दिसते किंवा असे म्हटले तरी चालेल की, पाणिनी-पूर्वकाळात फिट्सूत्रे प्रचलित होती व या उपसर्ग, निपातांचे शांतनवाचार्यांनी सांगितलेले स्वर पुढे जनमानसात रूढ होते; त्यामुळे पाणिनींनी उपसर्गाच्या मूळ स्वराचा विचार केला नाही. मात्र सोपसर्ग धातुरूपाची सिद्धी सांगताना मात्र उदात्त-तिङन्तपूर्वक उपसर्ग सर्वानुदात्त असतात.[३] असा महत्त्वाचा नियम केला आहे. ज्या नियमावर प्रस्तुतचे प्रकरण आधारीत आहे. येथे उपसर्गास 'गति' संज्ञा दिलेली आहे; म्हणून 'गतिनिघातस्वर' असे शीर्षक दिले आहे. तिङन्तातील प्रकृतिस्वराचा म्हणजे धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर, आगमस्वर वा अभ्यस्तस्वर याचा बाध होत नाही. गतिसंज्ञक जे प्र, परा वगैरे प्रादी त्यांना सर्वानुदात्त अर्थात निघात होतो.

वास्तविक पाहता तिङन्तावर उदात्त असताना पूर्वी जे प्रकार केले त्यामध्ये या तिङन्ताचाही समावेश करता येतो; पण गतिसंज्ञक बरोबर असल्यामुळे त्यांचा पूर्व प्रकरणांतर्गत समावेश न करता स्वतंत्र विचार केला आहे. म्हणून यास्तव उदात्तकांडातील हे प्रकरण अखेरचे आहे. थोडक्यात, गतिरहित तिङन्त व अखेरीस सगति तिङन्तस्वराचा विचार मांडला आहे.

---

१ धात्वर्थं बाधते कश्चित् कश्चित्तमनुवर्तते । तमेव विशिनष्ट्यन्य: उपसर्गगतिस्त्रिधा।। उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते। प्रहाराहारसंहारविहारपरिहारवत्।।

२ पा. सू. १।४।५९

३ तिङि चोदात्तवति । पा. सू. ८।१।७१

## ६.१ गतिनिघातस्वर :-

क्रियेशी योग असताना प्र, परा, वगैरे प्रादींना 'गति' संज्ञा होते.[१] तर क्रियेशी योग असताना त्यांनाच 'उपसर्ग' संज्ञाही होते.[२] फिट्सूत्रांनी उपसर्गांना स्वर सांगितला आहे. 'अभि' उपसर्ग सोडून इतर उपसर्गांचा प्रथम स्वर उदात्त असतो.[३] त्यामुळे उपसर्ग संज्ञा होऊन प्रादी उदात्त होतात व नंतर गतिसंज्ञा होते. या गतिसंज्ञेमुळे ते अनुदात्त होतात. हे गतिसंज्ञक व उपसर्ग धातूच्या पूर्वी असतात.[४] तर वेदामध्ये ते पुढे देखील आढळतात.[५] तसेच कधी कधी गतिसंज्ञक व तिङन्त यांच्यामध्ये इतर नामांचे व्यवधानही असते.[६] येथे मात्र तिङन्ताच्या सुरुवातीस त्याच्याबरोबर असलेल्या गतिसंज्ञकांचाच विचार केला आहे. कारण तिङन्ताहून वेगळे असणाऱ्या गतिसंज्ञकांचा निघात होत नाही ; त्यांचा मूळ स्वर कायम असतो.

## ६.२ स्वरसाधक सूत्रे व विवेचन :-

### अ) उपसर्गाश्चाभिवर्जम् । फि. सू. ४।१३।

'अभि' उपसर्ग सोडून इतर सर्व उपसर्गांचा प्रथम स्वर उदात्त असतो. अर्थात 'अभि' सोडून सर्व उपसर्ग आद्युदात्त असतात.

येथे 'निपाता आद्युदात्ताः' या पूर्वसूत्रातून 'आद्युदात्ताः' या पदाची अनुवृत्ती येते. 'अभिवर्जम्' असे म्हटल्याने 'अभि' उपसर्ग 'अन्तोदात्त' असल्याचे सिद्ध होते. तिङन्ताच्या स्वरप्रक्रियेत उपसर्ग संज्ञेनंतर प्रस्तुत ते आद्युदात्त होतात व उपसर्गस्वर व तिङन्तस्वर अशा उभयविध स्वराची प्राप्ती होते. तेव्हा पुढील सूत्राचा वापर होतो. पण जर तिङन्त सर्वानुदात्त असेल, तर मात्र उपसर्गस्वर कायम राहतो. उदा. 'अपीतेस्तमद्रिवः[७]।।' येथे 'अपि' उपसर्गाचे मूळ स्वर कायम आहेत.

---

१ गतिश्च । पा. सू. १।४।६०

२ उपसर्गाः क्रियायोगे । पा. सू. १।४।५९

३ फि. सू. 'उपसर्गाश्चाभिवर्जम्' । फि. सू. ४।१३।

४ ते प्राग्धातोः।पा. सू. १।४।८०.

५ छन्दसि परेऽपि।पा. सू. १।४।८१। उदा. 'हन्ति नि मुष्टिना'

६ व्यवहिताश्च।पा. सू. १।४।८२। उदा. हरिभ्यां याहह्योक आ.। त्र. सं. ७।३२।४ आ मन्द्रेरिन्द्र हरिभिर्याहि । ऋ. सं. ३।४५।१

७ ऋ. सं. १।१२०।९०

**ब) तिङि चोदात्तवति।पा. सू. ८।१।७१।**

उदात्तस्वर तिङन्तावर आहे, असे तिङन्त पुढे असताना गतिसंज्ञक शब्द सर्वानुदात्त होतो.

येथे 'च' पदाने 'गतिर्गतौ' या पूर्वसूत्रातून 'गति' पदाची अनुवृत्त येते. तर 'उदात्तवति' हे 'तिङि' याचे विशेषण आहे. त्यामुळे 'उदात्तस्वरयुक्त तिङन्त' असा अर्थ करणेच योग्य ठरते, असाच अर्थ भट्टोजी दीक्षित[१] देखील मानतो. त्यामुळे उदात्तयुक्त तिङन्त पुढे असताना मागील गतिशब्दाला निघात होतो व तिङन्त स्वर अबाधित राहतो. पण हा विषय उदात्त तिङन्तांनाच लागू व्हावा म्हणूनच 'उदात्तवति' पद वापरले आहे.

**६.३ स्वरसिद्धी प्रक्रिया :-**

प्रादींना उपसर्ग संज्ञेनंतर उपसर्गस्वर प्राप्त; त्यानंतर उदात्ततिङन्त असताना गतिनिघातस्वर व तिङन्तस्वर शेष.

**६.४ प्रत्यक्ष स्वरप्रक्रिया :-**

येथे तिङन्तस्वर प्रक्रिया दिलेली नाही. फक्त गतिसंज्ञकाचाच विचार केला आहे.

---

१ पहा. वै. सि. कौ., संपा. का. वा. अभ्यंकर, ऑग. १९७२, पृ. क्र. २८७

| | | |
|---|---|---|
| १. | आविवासति[१] | प्रस्तुत तिङन्त 'आङ्' + 'वा गतिबन्धनयो:' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, सन्नत लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| | आ[२]+विवासति[३] | उपसर्गा: क्रियायोगे।१।४।५९।[४] ने 'आ' उपसर्ग संज्ञक गतिश्च।१।४।६०।[५] ने 'गति' संज्ञा |
| | आविवासति | तिङि चोदात्तवति।८।१।७१।[६] ने गतिसंज्ञक आङ् अनुदात्त स्वरसिद्धी पूर्ण. |
| २. | अभिदुद्रोह[७] | प्रस्तुत तिङन्त 'अभि+द्रुह जिघांसायाम्' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३. | प्रमिनन्ति[८] | प्रस्तुत तिङन्त 'प्र+मीञ् हिंसायाम्' या 'क्र्यादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ४. | उपजायते[९] | प्रस्तुत तिङन्त 'उप+जनी प्रादुर्भावे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ५. | अध्यासते[१०] | प्रस्तुत तिङन्त 'अधि+आस उपवेशने' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |

---

१ धातो: कर्मण: समानकर्तृकादिच्छायां वा।३।१।७ ने सत् प्रत्यय; सन्यङो।६।१।९। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; सन्यत: ।७।४।७९ ने अभ्यासास इत्व; धातुत्व; कर्तरि शप् ।३।१।६८ ने शप्; तिप् पित्याने अनुदात्त त्त ञ्नित्यादिर्नित्यम्।६।१।१९७ ने आद्युदात्त शेष निघात;

२ उपसर्गाश्चाभिवर्जम् । फि. सू. ४।१३। ने उपसर्ग आङ् आद्युदात्त.

३ त. टी. क्र. १.१ प्रमाणे ; आद्युदात्त.

४ ''क्रियेशी योग असताना प्र परा अप इ. ला उपसर्ग संज्ञा होते.''

५ ''प्र परा इत्यादिंना क्रियेशी योग असताना गति संज्ञा होते.'' 'आङ्' गतिसंज्ञक.

६ सार्थ विवेचन पृ. क्र.२४३

७ येथे 'अभि' उपसर्ग उपसर्गाश्चाभिवर्जम्। फि. सू. ४.१३ मध्ये 'अभिवर्जम्' म्हटल्याने 'अभि' अन्तोदात्त झाला; तर 'दुद्रोह' मध्ये लिट् निमित्तक द्वित्वाभ्यादिकार्य ; लिति।६।१।१९३ ने प्रत्ययपूर्व स्वदोदात्त व तिङि चोदात्तवति ।८।१।७१। ने गति 'अभि' अनुदात्त व लित्स्वरशेष.

८ येथे 'उपसर्गाश्चाभिवर्जम्'।फि. सू. ४।१३ ने आद्युदात्त; व 'तिङि चोदात्तवति।८।१।६१ ने सर्वानुदात्त 'मिनन्ति'मध्ये; प्वादीनां ऱ्हस्व:।७।३।८०।ने ऱ्हस्व; श्नाभ्यस्तयोरात ।६।४।११२। ते आलोप; प्रत्ययस्वर शेष.

९ फिट् सूत्राने उपसर्ग आद्युदात्त होऊन तिङि चोदात्तवति।८।१।७१ ने निघात; 'जायते' मध्ये नित् विकरण स्वर, पहा. जायते. प्र. ३ त. टी. क्र. ३.१, पृ. क्र. १३१

१० फिट् सूत्राने आद्युदात्त व तिङि ।८।१।७१ ने निघात; 'आसते' मध्ये धातुस्वर पहा. प्र. १.२, पृ. क्र. ११७

| | | |
|---|---|---|
| ६. | विबध्नते[१] | प्रस्तुत तिङन्त 'वि+बन्ध बन्धने' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ७. | विजर्भृतः[२] | प्रस्तुत तिङन्त 'वि+हृञ् हरणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. यङ् लुगन्त, लट् लकार प्रथम पुरुष द्विवचन |
| ८. | आविवासिस[३] | प्रस्तुत तिङन्त 'आ+वा गतिबन्धनयोः' या 'अदादिगणस्थ' धातूचे सन्नन्त, लट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ९. | पर्यतिष्ठत्[४] | प्रस्तुत तिष्ठन्त 'परि+ष्ठा गतिनिवृत्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १०. | प्रत्यहन्[५] | प्रस्तुत तिङन्त 'प्रति+हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ११. | आवर्जते[६] | प्रस्तुत तिङन्त 'आङ्+वृजी वर्जने' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| १२. | पर्यभूषन्[७] | प्रस्तुत तिङन्त 'परि+भूष अलंकारे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| १३. | विह्वयामहे[८] | प्रस्तुत तिङन्त 'वि+ह्वेञ् स्पर्धायां शब्दे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन |

---

१ श्नाभ्यस्तयोरात ।६।४।११८। ने श्नाच्या आकाराचा लोप; प्रत्ययस्वर शेष.

२ 'वि' उपसर्ग पूर्ववत्; धातोरेकाचो हलादेः.।३।१।२२ यङ्; यङोऽचि च।२।४।७४ ने लोप; गुणोसन्यङोः।६।१।९ ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; कुहोश्चुः।७।४।६२ ने जत्व; गुणो यङ्लुकोः।७।४।८२ ने गुण रेफ; हृगृहोर्भश्छन्दसि या वार्तिकाने भत्व; प्रत्ययस्वर शेष.

३ पहा. 'आविवासति' प्रमाणे त. टी. क्र. १.१.२

४ 'परि' उपसर्गपूर्ववत् ; 'अतिष्ठत्' मध्ये आगम स्वर, पहा. प्र. क्र. ४.१, पृ. क्र. २१३

५ 'प्रति' उपसर्गगतिस्वर पूर्वतत; 'अहन्' येथे आगम स्वर, पहा. प्र. क्र. ४.१, पृ. क्र. १९७

६ 'आङ्' गतिस्वर पूर्ववत्; 'वर्जते' येथे व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन 'शप्' विकरण; पुगन्तलघूपधस्य च।७।३।८६ ने गुण; तास्यनुदातेन्ङिद.।६।१।१८६ ने 'ते' प्रत्यय अनुदात्त व धातुस्वर शेष.

७ 'परि' गतिस्वर पूर्ववत् ; 'अभूषन्' येथे लुङलङलृङक्ष्वडुदातः ।६।४।७१। ने अडुदात्त व आगम स्वर शेष.

८ कर्तरि शप्।३।१।६८। ने शप् ; सार्वधातुकार्धधातुकयोः।७।३।८४। ने गुण व अवादेश; तास्यनुदातेङिन्ददुपदेशा.।६।१।१८६ ने 'महे' प्रत्यय अनुदात्त व धातुस्वर शेष.

१४. प्रतिहर्यथः[१] — प्रस्तुत तिङन्त 'प्रति+हर्य गतिकान्त्यौः' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन

१५. आदिदेशति[२] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+दिश अतिसर्जने' या 'तुदादिदिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन

१६. उपाचरत्[३] — प्रस्तुत तिङन्त 'उप+चर गत्यर्थाः' या 'भ्वादिगणस्थ' प.प. धातूचे लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

१७. विचरन्ति[४] — प्रस्तुत तिङन्त 'वि+चर गत्यर्थाः' या 'भ्वादिगणस्थ' प.प. धातूचे लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

१८. निजघन्थ[५] — प्रस्तुत तिङन्त 'नि+हन हिंसागत्योः' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष एकवचन

१९. न्यृषन्ति[६] — प्रस्तुत तिङन्त 'नि+ऋषी गतौ' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

२०. न्यृञ्जते[७] — प्रस्तुत तिङन्त 'नि+ऋजि भर्जने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

२१. अभिगृणाति[८] — प्रस्तुत तिङन्त 'अभि+गॄ शब्दे' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

---

१ पहा. 'हर्यथ' प्रमाणे – प्र. क्र. १.२.१०६

२ लिङर्थे लेट् ।१।४।७ ने लेट्; बहुलं छन्दसि ।२।४।७६ ने श्लु ; श्लौ।६।१।१० ने दित्वाभ्यासादिकार्ये; लेटोऽडाटौ।३।४।९४ ने अडागम व अनुदात्त; अभ्यस्तानामादिः।६।१।१८९ ने आद्युदात्त व अभ्यासस्वर शेष.

३ लुङ्लङ्लृङक्ष्वडुदात्तः।६।४।७१। ने अडुदात्त व आगमस्वर; एकादेश उदात्तेनोदात्तः।८।२।५ ने उदात्त कायम; आगमस्वर शेष.

४ तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशा. ।६।१।१८६ ने 'अन्ति' प्रत्यय व अनुदात्त व प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

५ पहा. 'जघन्थ' येथे अभ्यासस्वर, लित्स्वर; प्र. क्र. ५.२.५

६ तुदादिभ्यःशः।३।१।७७ ने श व विकरणप्रत्यय स्वर; तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने प्रत्ययस्वराचा बाध करून विकरणस्वर शेष.

७ इदितो नुम धातोः।७।१।५८ ने नुमागमः तास्यानुदात्तेन्ङिद. ।६।१।१८६ ने 'ते' या प्रत्ययस्वराचा बाध करून व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने झालेले 'श' विकरणस्वर शेष.

८ 'गृणाति' येथे प्वादीनां ऱ्हस्वः।७।३।८० ने ऱ्हस्व; क्रयादिभ्यः श्ना। ३।१।८१ ने विकरण व उदात्त ; तिप् पित्त्वामुळे विकरणस्वर शेष.

| | | |
|---|---|---|
| २२. | समशीत[१] | प्रस्तुत तिङन्त 'सम्+शीङ् स्वप्ने' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २३. | निरिणाति[२] | प्रस्तुत तिङन्त 'नि+री गतिरेषणयो:' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २४. | निषीदन्[३] | प्रस्तुत तिङन्त 'नि+षद्लृ विशरणगत्यवसादनेषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| २५. | निपाति[४] | प्रस्तुत तिङन्त 'नि+पा रक्षणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २६. | उपक्षेति[५] | प्रस्तुत तिङन्त 'उप+क्षि निवासगत्यो:' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २७. | अभिदासति[६] | प्रस्तुत तिङन्त 'अभि+दसु उपक्षये' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| २८. | अधीमसि[७] | प्रस्तुत तिङन्त 'अधि+इण् गतौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन |
| २९. | पराददाति[८] | प्रस्तुत तिङन्त 'परा+डुदाञ् दाने' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |

---

१ ''वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति'' या परिभाषेप्रमाणे विकल्पाने गुणाभाव; लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त।६।४।७१ ने अडागम व आगमस्वर शेष.

२ पहा. 'अभिगृणाति' प्रमाणे, त. टी. क्र. २१.८

३ पाघ्राध्मास्था.।७।३।७८ ने सीद् आदेश; सिब्बहुलं लेटि। ३।१।३४ ने सिबभाव; शप्; इतश्च लोपः परस्मैपदेषु।३।४। ९७। ने इलोप; संयोगान्तस्य लोप:।८।२।२३ ने तलोप; तास्यनुदात्तेन्ङिददु.।६।१।१८६ ने 'अन्' प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

४ अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२ ने शपाचा लोप ; तिप् च्या पित्त्वामुळे धातुस्वर शेष.

५ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने 'श' चा बाध करून स शप् व बहुलं छन्दसि ।२।४।७४ ने शपाचा लोप; सार्वधातुकार्धधातुकयो:। ७।३।९४ ने गुण ; धातुस्वर शेष.

६ हेतुमति च।३.२६ ने णिच्; अत उपधाया:। ७।२।११६ ने उपधा वृद्धी; धातुत्व; छन्दस्युभयथा । ३।४।११७ ने आर्धधातुक संज्ञा व सार्वधातुकने शप्, तिप्, णेरनिरि। ६।४।५१ ने हिलोप; पिदनुदात्तत्वामुळे धातुस्वर शेष.

७ 'अधि' येथे 'गतिनिघातस्वर'; 'इमसि' येथे प्रत्ययस्वर पहा. अदिप्रभृतिभ्यशप:२।४।७२ ने शपाचा लोप; प्रत्ययस्वर शेष.

८ 'ददाति' मध्ये अभ्यस्तस्वर पहा. प्र. क्र. ५.१.२.१

३०. आघोषते[१] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+घुषिर् अदिशब्दने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

३१. विदयते[२] — प्रस्तुत तिङन्त 'वि+दय दानगतिरक्षणहिंसादानेषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

३२. उपमिमीहि[३] — प्रस्तुत तिङन्त 'उप+माङ् माने शब्देच' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

३३. समजाति[४] — प्रस्तुत तिङन्त 'सम्+अज गतिक्षेपणयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन

३४. परिभुजत्[५] — प्रस्तुत तिङन्त 'परि+भुज पालनाभ्यवहारयो:' या 'रूधादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन

३५. निरहन्[६] — प्रस्तुत तिङन्त 'निर्+हन हिंसागत्यो:' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

३६. अवातिरत्[७] — प्रस्तुत तिङन्त 'अव+तॄ प्लवनतरणयो:' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

३७. विमुच्य[८] — प्रस्तुत तिङन्त 'वि+मुच्लृ मोक्षणे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन

---

१ पुगन्तलघूपधस्य च।७।३।८६ ने उपधागुण; शप् व लिप् च्या पिदनुदात्तत्वामुळे धातुस्वर शेष.

२ शप् व ति अनुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'ते' या प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर शेष.

३ 'मिमीहि' मध्ये प्रत्ययस्वर शेष. पहा. प्र. क्र. ३.१.१७५

४ 'अजाति' येथे; लिङर्थे लेट्।३।१।३४ ने लेट्; व्यत्ययो बहुलम्।३।१।८६ ने शप्; लेटोऽडाटौ।३।४।९४ ने आडागम व अनुदात्त; पिदनुदात्तामुळे धातुस्वर शेष.

५ 'भुजत्' येथे व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ नो 'श' विकरणस्वर; लेटोऽडाटौ।३।४।९४ ने अडागम व पूर्वरूप; इतश्च लोप: परस्मैपदेषु।३।२।९७ ने इलोप; विकरणस्वर शेष.

६ पहा. 'प्रत्यहन्' प्रमाणे, त. टी. क्र.१०.५

७ ऋृत इद्धातो ।७।१।१०० ने इकारादेश; व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने 'श' विकरण; व विकरणस्वराचा बाध करून 'लुङ्लङ्लृङक्ष्वडुदात्त'।६।४।७१ ने अडागम व आगमस्वर शेष.

८ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने श्यन् विकरण; सेर्ह्यपिच्च।३।४।८७ ने 'हि' अतो हे:।।६।४।१०५। ने हिलोप; ञ्नित्यदिर्नित्यम् ।६।१।१९ ने आद्युदात्त ; नित् विकरणस्वर शेष.

| | | |
|---|---|---|
| ३८. | विभूषति[१] | प्रस्तुत तिङन्त 'वि+भूष अलंकारे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ३९. | उदाजत[२] | प्रस्तुत तिङन्त 'उद्+अज गतिक्षेपणयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे लङ् लकार मध्यम पुरुष बहुवचन |
| ४०. | परियाथ:[३] | प्रस्तुत तिङन्त 'परि+या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ४१. | निरण्यथ:[४] | प्रस्तुत तिङन्त 'नि+रमु क्रीडायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ४२. | समावतम्[५] | प्रस्तुत तिङन्त 'सम्+अव रक्षणादिवृद्धिषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ४३. | न्यूहथु:[६] | प्रस्तुत तिङन्त 'नि+वह प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ४४. | न्यूषु:[७] | प्रस्तुत तिङन्त 'वि+वस निवासे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ४५. | प्रतिरन्ते[८] | प्रस्तुत तिङन्त 'प्र+तॄ प्लवनतरणयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |

---

१ 'भूषति' येथे ; शप् व तिप् च्या पिदनुदात्त स्वरामुळे धातुस्वर शेष.

२ आडजादीनाम्।६।४।७२। ने आडागम व उदात्त आटश्च।६।१।९०। ने वृद्धी; एकादेश उदात्तेनोदात्त:।८।२।५ ने उदात्त आगमस्वर शेष.

३ आदिप्रभृतिभ्य शप:।२।४।७२। ने शपाचा लोप ; प्रत्ययस्वर शेष.

४ हेतुमति च।३।१।२६ ने णिच्; मितां ऱ्हस्व:।६।४।९२ ने उपधा ऱ्हस्व; "वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति" या परिभाषेप्रमाणे णिच् च्या 'अय' मधील 'अ' लोप व णत्व हे छांदस असून अनुदात्तस्य च यत्रोदात्तलोप:।६।१।१६१। ने यकारदात्त; मास्यनुदानेन्ङिद.।६।१।८५ ने 'थस्' प्रत्ययस्वराचा बाध करून विकरणस्वर शेष.

५ 'आवतम्' येथे आगमस्वर शेष; पहा. आवतम् – प्र. क्र. ४.२.४

६ ऊहथु:' येथे प्रत्ययस्वर शेष आहे. पहा. 'ऊहथु:' प्र. क्र. ३.१.९९

७ लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादिकार्ये; लिट्यभ्यासस्योभयेषाम्।६।१।१७ ने अभ्यासास संप्रसारण; वचिस्वपि.।६।१।१५ ने धातूला संप्रसारण; सवर्णदीर्घ; प्रत्ययस्वर शेष.

८ व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने विकरण व्यत्यय येऊन 'श' विकरण; ऋृत इद्धातो:।७।१।१८६ ने 'अन्ते' प्रत्ययस्वराचा बाध करून विकरणस्वर शेष.

४६. व्युछन्ति[१] — प्रस्तुत तिङन्त 'वि+उच्छी विवासे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

४७. आयेजे[२] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+यज देवपूजासंगतिकरणदानेषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

४८. न्यूहतु:[३] — प्रस्तुत तिङन्त 'ति+वह प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष द्विवचन

४९. आजिगाति[४] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+गा स्तुतौ' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

५०. अध्यधत्तम्[५] — प्रस्तुत तिङन्त 'अधि+डुधाञ् धारणपोषणयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५१. निरततंसतम्[६] — प्रस्तुत तिङन्त 'निर+तसि अलंकारे' या 'चुदादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार मध्यम पुरुष द्विवचन

५२. निवर्तत्[७] — प्रस्तुत तिङन्त 'नि+वृतु वर्तने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन

५३. अपस्यात्[८] — प्रस्तुत तिङन्त 'अप+अस भुवि' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

---

१ तुदादिभ्य:श:।३।१।७७ ने 'श' विकरणस्वर; तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६ ने 'अन्ति' प्रत्यय स्वराचा बाध करून विकरणस्वर शेष.

२ द्वित्वाभ्यासादिकार्ये; वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति ने संप्रसारणाभाव; अत एकहलमध्येऽनादेशादे.।६।३।१२० ने एत्वाभ्यासालोप, प्रत्ययस्वर शेष.

३ 'ऊहतु:' येथे प्रत्ययस्वर शेष. पहा. 'ऊहथु' प्रमाणे. प्र. क्र. ३.१.९९

४ 'जिगाति' येथे श्लौ।६।१।१० ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; कुहोश्चु।७।४।६२। ने चुत्व; बहुलं छन्दसि।७।४।७८ ने अभ्यासास इत्व; अभ्यस्तानामादि ।६।१।१८९ ने आद्युदात्त व अभ्यासस्वर शेष.

५ 'अधत्तम्' येथे लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त:।६।४।७१ ने अडागमस्वर शेष.

६ णिश्रिद्रुस्रु. ३।१।४८। ने ण्यकाहून च्लेचा चङ्; णेरनिटि।३।४।७१।ने अडागम स्वर; आगमस्वर शेष.

७ लिङर्थे लेट् ।३।४।७ ने लेट्; लेटोऽडाटौ।३।४।९४। ने अडागम व अनुदात्त; इतश्च लोप: परस्मैपदेषु।३।४।९७ ने इलोप; प्रत्ययस्वर शेष.

८ 'स्यात्' येथे प्रत्ययस्वर शेष आहे; पहा. 'स्यात्' प्र. क्र. ३.१.६४

| | | |
|---|---|---|
| ५४. | प्रभासि[१] | प्रस्तुत तिङन्त 'प्र+भा दीप्तौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ५५. | परियासि[२] | प्रस्तुत तिङन्त 'परि+या प्रापणे' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ५६. | विभजासि[३] | प्रस्तुत तिङन्त 'वि+भज सेवायाम्' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| ५७. | उत्सिनाति[४] | प्रस्तुत तिङन्त 'उत्+षिञ् बन्धने' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ५८. | आददि:[५] | प्रस्तुत तिङन्त 'आङ्+डुदाञ् दाने' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. विधिलिङ् मध्यम पुरुष एकवचन |
| ५९. | उपवोचन्त[६] | प्रस्तुत तिङन्त 'उप+ब्रूञ् व्यक्तायां वाचि' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लुङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ६०. | प्रणयसि[७] | प्रस्तुत तिङन्त 'प्र+णीञ् प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ६१. | परिवृणक्षि[८] | प्रस्तुत तिङन्त 'परि+वृजी वर्जने' या 'रूधादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष एकवचन |

---

१ अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२ ने शपाचा लोप; धातुस्वर शेष.

२ अदिप्रभृतिभ्या शप:।२।४।७२ ने शपाचा लोप; शप् पिदनुदात्तत्वामुळे धातुस्वर शेष.

३ लिङर्थे लेट् ।३।४।७। ने लेट्; लेटोऽऽडाटौ ।३।४।९४ ने आडागम व अनुदात्त; सिप् च्या पिदनुदात्तत्वामुळे धातुस्वर शेष.

४ 'सिनाति' येथे 'क्र्यादिभ्य:श्ना'।३।१।८१ ने श्ना विकरण व विकरण प्रत्यय स्वर; तिपूच्या पिदनुत्तत्वामुळे विकरणस्वर शेष.

५ श्लौ।६।१।१०। ने द्वित्वाभ्यासादिकार्ये ऱ्हस्व:।७।४।५९ ने ऱ्हस्व; वा छन्दसि सर्वे विधयो भवन्ति या परिभाषेप्रमाणे 'यासुट् परस्मैपदेषूदात्तो ङिच्च'।३।४।१०३ ने यासुडगम व विकल्पाने इयादेश; यलोप; श्नाभ्यस्तयोरात६।४।११२ ने आलोप; प्रत्ययस्वर शेष.

६ ब्रुवो वचि:।२।४।५३ ने क्वादेश; अस्यतिवक्ति. ३।१।५२ ने अङादेश; वच उम् ।७।४।२० ने उमागत व गुण; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि ।६।४।७५ ने अडागमाभाव; धातुस्वर शेष.

७ शप् व सिप् च्या पिदनुदात्तत्वामुळे धातुस्वर शेष; उपसर्गादसमासेऽपि णोपदेशस्य। ८।४।१४ ने णत्व;

८ 'वृणक्षि' येथे रुधादिभ्य, श्नम् ।३।१।५८ ने श्नम् विकरण; चो.कु:।८।२।३४। ने कुत्व; ष्टुना ष्टु:।८।४।७२ ने षत्व; विकरणस्वर शेष.

६२. समूहसि[१] — प्रस्तुत तिङन्त 'सम्+वह प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लेट् लकार मध्यम पुरुष एकवचन

६३. अवातिर:[२] — प्रस्तुत तिङन्त 'अव+तॄ प्लवनतरणयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

६४. अपावप:[३] — प्रस्तुत तिङन्त 'अप डुवप बीजसन्ताने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष एकवचन

६५. उपतिष्ठन्त[४] — प्रस्तुत तिङन्त 'उप+ष्ठा गतिनिवृत्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन

६६. परिभूषति[५] — प्रस्तुत तिङन्त 'परि+भूष अलङ्कारे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

६७. आभूषति[६] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+भूष अलङ्कारे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

६८. आयुयुवे[७] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+यु मिश्रणेऽमिश्रणे च' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन

६९. संदायि[८] — प्रस्तुत तिङन्त 'सम्+डुदाञ् दाने' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे आ.प. कर्मणी, लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

---

१ "वा च्छन्दसि सर्वे विधयो भवन्ति" या परिभाषेने संप्रसारण व दीर्घ; लेटोऽडाटौ।३।४।९४ ने अडागम व अनुदात्त; धातुस्वर शेष.

२ 'अतिर:' येथे 'व्यत्ययो बहुलम्'।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन 'श' विकरण; ॠत इद्धातो:।७।१।१०० ने इकारादेश; विकरणस्वराचा बाध करून लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त।६।४।७१ ने प्राप्त आगमस्वर शेष.

३ इतश्च।३।४।१०० ने सिप् च्या इकाराचा लोप; शपाच्या पित्त्वानुदात्तत्वामुळे धातुस्वर शेष व त्याचा बाध करून लुङलङलृङक्ष्वडुदात्त।६।४।७१। ने प्राप्त आगमस्वर शेष.

४ पाघ्राध्मास्था.।७।३।७८ ने 'तिष्ठादेश:' व्यत्ययाने आ.प.बहुलं च्छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५ ने अडागमाचा अभाव; धातुस्वर शेष.

५ 'भूषति' येथे शप् व तिप् च्या पिदनुदात्त त्यामुळे धातुस्वर शेष.

६ पहा. 'परिभूषति' प्रमाणे. त. टी. क्र. ६६.५

७ 'युयुवे' येथे लिट् निमित्तक द्वित्वाभ्यासादि. कार्ये; ङित्त्वामुळे गुणनिषेध: अचि श्नुधातुभ्रुवां.।६।४।७७ ने उवङादेश; प्रत्ययस्वर शेष.

८ आतो युक् चिण्।७।३।३३। ने युगागम; चिण् भावकर्मणो:।३।१।३६ नले च्लि स्थानी चिण्; चिणो, लुक्।६।४।१०४ ने तप्रत्यय लोप; लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त:।६।४।७१। ने आगमस्वर; बहुलं छन्दस्थमाङ्योगेऽपि।६।४।७५ ने आगमाचा लोप; अनुदात्तस्यच यत्रोदात्तलोप:।६।१।१६१ ने 'दा' उदात्त व धातुस्वर शेष.

| | | |
|---|---|---|
| ७०. | आददाथे[१] | प्रस्तुत तिङन्त ‘आङ्+डुदाञ् दाने’ या ‘जुहोत्यादिगणस्थ’ धातूचे आ.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ७१. | एरिरे[२] | प्रस्तुत तिङन्त ‘आङ्+ईर गतौ’ या ‘अदादिगणस्थ’ धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ७२. | विममे[३] | प्रस्तुत तिङन्त ‘वि+माङ् माने शब्दे च’ या ‘जुहोत्यादिगणस्थ’ धातूचे आ.प. लिट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ७३. | अधिक्षियन्ति[४] | प्रस्तुत तिङन्त ‘अधि+क्षि निवासगत्यो:’ या ‘तुदादिगणस्थ’ धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ७४. | अपोर्णुते[५] | प्रस्तुत तिङन्त ‘अप+ऊर्णुञ् आच्छादने’ या ‘अदादिगणस्थ’ धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ७५. | प्रभूषत[६] | प्रस्तुत तिङन्त ‘प्र+भूष अलङ्कारे’ या ‘भ्वादिगणस्थ’ धातूचे प.प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन |
| ७६. | अवाख्यत्[७] | प्रस्तुत तिङन्त ‘अव+ख्या प्रकथने’ या ‘अदादिगणस्थ’ धातूचे प.प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ७७. | प्रवक्ष्याम:[८] | प्रस्तुत तिङन्त ‘प्र+वच परिभाषणे’ या ‘अदादिगणस्थ’ धातूचे प.प. लृट् लकार उत्तम पुरुष बहुवचन |

---

१ श्लौ।६।१।१० ने द्वित्वभ्यासादिकार्ये ; श्नाभ्यास्त. ।६।४।११२ ने आलोप ; प्रत्ययस्वर शेष.

२ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये ; अक्र: सवर्णे दीर्घ:।६।१।८१ ने इरेच्, चित: ।६।१।१६३ ने चित्प्रत्ययस्वर शेष.

३ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये; ऱ्हस्व:।७।४।५९। ने अभ्यास ऱ्हस्व; श्नाभ्यस्तयोरात:।६।४।११२ ने आलोप; प्रत्ययस्वर शेष.

४ तुदादिभ्य: श:।३।१।७७ ने श विकरण व विकरण प्रत्ययस्वर; अपित्त्वामुळे गुणनिषेध; अचि श्नुधातुभ्रुवां.।६।४।७७ इयङादेश; विकरण स्वर शेष; तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने अन्ति प्रत्यय अनुदात्त.

५ अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२। ने शपाचा लोप; क्ङिति च।१।१।५ ने गुणनिषेध; प्रत्ययस्वर शेष; आद्गुण।६।१।८७ ने गुण.

६ शप् व पिद्नुदात्तामुळे तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने ‘त’ प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

७ अस्यतिवक्तिमख्याति.।३।१।५२। ने अङादेश; आतो लोप इटि च।६।४।६४ ने आलोप; लुङ्लङ्लृङक्ष्वडुदात्त:।६।४।७१ ने प्राप्त आगमस्वर शेष.

८ लृट् शेषे च।३।३।१३ ने लृट् लकार; मस् प्रत्यय; शपाचा बाध करून स्यतासी लृलुटो:।३।१।३३ ने स्यप्रत्यय; आद्युदात्तश्च।३।१।३ ने उदात्त: आर्धधातुकं शेष:।३।४।११४ ने आर्धधातुक संज्ञा एकाच उपदेशेऽनुदात्तात्।७।२।१० ने इडागम निषेध; चो: कु:।८।२।३० ने कुत्व; ष्टुना ष्टु:।८।४।४२ ने षत्व; ‘क्ष्य’ विकरणस्वर शेष;

७८. संभरन्ति[१] — प्रस्तुत तिङन्त 'सम्+हृञ् हरणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

७९. अपवाति[२] — प्रस्तुत तिङन्त 'अप+वा गतिगन्धनयो:' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

८०. अवधावति[३] — प्रस्तुत तिङन्त 'अव+धावु गतिशुद्धयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

८१. उपासते[४] — प्रस्तुत तिङन्त 'उप+आस उपवेशने' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

८२. उपस्तृणन्ति[५] — प्रस्तुत तिङन्त 'स्तॄञ् आच्छादने' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

८३. परिपश्यन्ति[६] — प्रस्तुत तिङन्त 'परि+दृशिर् प्रेक्षणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

८४. अभिरक्षन्ति[७] — प्रस्तुत तिङन्त 'अभि+रक्ष पालने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

८५. अध्यतिष्ठत्[८] — प्रस्तुत तिङन्त 'अधि+ष्ठा गतिनिवृतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

---

१ शपाचा अदुपदेशत्वामुळे तास्यनुदात्तेन्ङिद्दुपदेशा. ।६।१।१८६ ने 'अन्ति' प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

२ अदिप्रभृतिभ्य: शप:।२।४।७२। ने शपाचा लोप; तिपाच्या पिदनुदात्तामुळे धातुस्वर शेष.

३ शप् व सिप् च्या पिदनुदात्तामुळे धातुस्वर.

४ अदिप्रभृतिभ्य: शप:।३।४।७२। ने शपाचा लोप; अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'अते' प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

५ प्वादीनां ऱ्हस्व:।७।३।८० ने ऱ्हस्व; क्र्यादिभ्य: श्ना:।३।१।८१ ने श्ना विकरण; श्नाभ्यस्तयोरात ।६।४।११२ ने आलोप; प्रत्ययस्वर शेष.

६ पाघ्राध्मास्था.।७।३।७८ ने पश्यादेश; तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६ ने 'अन्ति ' प्रत्यय स्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

७ शप् च्या अदुपदेशाने तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'अन्ति' या प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

८ लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त:।६।४।७१ ने प्राप्त आगमस्वर शेष.

८६. विजानात्[१] — प्रस्तुत तिङन्त 'वि+ज्ञा अवबोधने' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

८७. अनुवेद[२] — प्रस्तुत तिङन्त 'अनु+विद ज्ञाने' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन

८८. अभिस्वरन्ति[३] — प्रस्तुत तिङन्त 'अभि+स्वृ शब्दोपतापयो:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

८९. निविशन्ते[४] — प्रस्तुत तिङन्त 'नि+विश प्रवेशने' या 'तुदादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

९०. निरतक्षत[५] — प्रस्तुत तिङन्त 'नि+तक्षू तनूकरणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष बहुवचन

९१. निषेदु:[६] — प्रस्तुत तिङन्त 'नि+षद्लृ विशरणगत्यवसादनेषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

९२. समधत्त[७] — प्रस्तुत तिङन्त 'सम्+डुधाञ् धारणपोषणयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार मध्यम पुरुष बहुवचन

९३. अभिजायन्त[८] — प्रस्तुत तिङन्त 'अभि+जनी प्रादुर्भावे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ.प. लङ् लकार मध्यम पुरुष बहुवचन

---

१ ज्ञाजनोर्जा ।७।३।७९ ने जादेश; क्रयादिभ्य: श्ना।३।१।८१ ने श्नाविकरण प्रत्ययस्वर; इतश्च।३।४।१०० ने इलोप; बहुलं छन्दस्यमाङ् योगेऽपि ।६।४।७५ ने अडागमचा अभाव: विकरणस्वर शेष.

२ विदो लटो वा।३।४।८३ ने णलादि-आदेशा; लिति।६।१।१९३ ने प्रत्ययपूर्ववर्तिस्वरोदात्त्.

३ शपाच्या पिदनुदात्तत्वाने तास्यनुदात्तेन्ङिद। ६।१।१८६ ने अन्ति प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

४ तुदादिभ्य: श:।३।१।७७ ने श विकरण प्रत्यय स्वर; तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।८६ ने अन्ते प्रत्ययस्वराचा बाध करून विकरण स्वर शेष.

५ लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त:।६।४।७१ ने प्राप्त आगमस्वर शेष.

६ लिट् निमित्त द्वित्वाभ्यासादिकार्ये ; अत एकहल्ममध्ये. ।६।४।१२० ने एत्व व अभ्यासलोप प्रत्ययस्वर शेष.

७ लुङलङलृङक्ष्वडुदात्त: ।६।४।७१ ने प्राप्त आगमस्वर शेष.

८ दिवादिभ्य: श्यन्।३।१।६९ ने श्यन् विकरण: ज्ञाजनोर्जा।७।३।७९ ने जादेश; ञ्नित्यादिनित्यिम्।६।१।१९७ ने नित् विकरण स्वराने आद्युदात्त; तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'अन्त' या प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष; बहुलं छन्दस्य माङ्योगेऽपि।६।४।७५ ने अडागम अभाव.

| | | |
|---|---|---|
| ९४. | उदीरयन्ति[१] | प्रस्तुत तिङन्त 'उद्+ईर गतौ' या 'अदादिगणस्थ' धातूचे प.प. ण्यन्त, लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ९५. | अनुमदन्ति[२] | प्रस्तुत तिङन्त 'अनु+मदी हर्षे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन |
| ९६. | वितक्षत्[३] | प्रस्तुत तिङन्त 'तक्षू तनूकरणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन |
| ९७. | उन्निनीथः[४] | प्रस्तुत तिङन्त 'उत् + णीञ् प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ९८. | निरूहथुः[५] | प्रस्तुत तिङन्त 'निर् + वह प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लिट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| ९९. | पर्यसस्वजत्[६] | प्रस्तुत तिङन्त 'परि + ष्वञ्ज परिष्वङ्गे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लुङ् लकार मध्यम पुरुष एकवचन |
| १००. | उपयाथः[७] | प्रस्तुत तिङन्त 'उप+या प्रापणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष द्विवचन |
| १०१. | उपब्रुवे[८] | प्रस्तुत तिङन्त 'उप+ब्रूञ् व्यक्तायां वाचि' या 'अदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष एकवचन |

---

१ 'ईरयन्ति' येथे हेतुमति च।३।१।२६ ने णिच्; सनाद्यन्ता धातवः।३।१।३२। ने धातुसंज्ञा; चितः।६।१।१६३ चित् विकरणस्वर; कर्तरि शप।३।१।६८ ने शप्; त्याने अदुपदेशत्वामुळे तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'अन्ति' प्रत्ययस्वराचा बाध करून चित् विकरणस्वर शेष.

२ व्यत्ययो बहुलम् ।३।१।८५ ने विकरण व्यत्यय येऊन शप् विकरण; त्यामुळे तास्यनुदात्तेन्ङिद.६।१।१८६ ने 'अन्ति' प्रत्यय स्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

३ येथे बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि । पा. सू. ६।३।१३५ ने अडागमाभाव होऊन, 'शप्' व 'त्' पित्त्वामुळे शेष राहिला.

४ बहुलं छन्दसि।२।४।७६ श्लुः, श्लौः।६.१।१० ने द्वित्वाभ्यासादिकार्ये; ऱ्हस्वः।७।४।५९ ने अभ्यास ऱ्हस्व; प्रत्ययस्वर शेष.

५ 'ऊहथु.' येथे प्रत्ययस्वर शेष आहे. पहा. 'ऊहथुः' प्र. क्र. ३.१.९८

६ चङि।६।१।११ द्वित्वभ्यासादिकार्ये; लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः।६।४।७१ ने आगमस्वर शेष.

७ शपाचा लोप ; प्रत्ययस्वर शेष.

८ अचि श्नुधातुभ्रुवां. ।६।४।७७ ने उवङादेश, प्रत्ययस्वर शेष.

१०२. आरिशामहे[१] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+रिश हिंसायाम्' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ.प. लट् लकार उत्तम पुरुष बहुवचन

१०३. विराजथ[२] — प्रस्तुत तिङन्त 'वि+राजृ दीप्तौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार मध्यम पुरुष बहुवचन

१०४. आशृण्वन्ति[३] — प्रस्तुत तिङन्त 'आङ्+श्रु श्रवणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

१०५. उपजीवन्ति[४] — प्रस्तुत तिङन्त 'उप+जीव प्राणधारणे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प.प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन

१०६. समारत[५] — प्रस्तुत तिङन्त 'सम्+ऋ गतौ' या आ.प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन

## ६.५ मूल्यमापन :-

गतिनिघात स्वर या प्रकरणात एकूण १०६ उदाहरणांचा अभ्यास करण्यात आलेला आहे. यामध्ये प्रत्येक उदाहरणात गतिनिघातस्वर असून तिङन्त प्रकृतिस्वर आढळतो. यावरून असे म्हणता येईल की, 'तिङन्तावर उदात्त स्वर असताना गतिसंज्ञक त्याच्या प्रकृतिस्वराचा बाध होऊन अनुदात्त राहतात' अर्थात गतिसंज्ञकाचा तिङन्ताशी योग पाहिजे. उदात्तवर्ति तिङन्तानुसार या गतिनिघातस्वराची पुढीलप्रमाणे विभागणी करता येईल.

१) **धातुस्वरपूर्वक गतिनिघातस्वर** :- अध्यासते, आवर्जते, विह्वयामहे, प्रतिहर्यथ:, विचरन्ति, निषीदन्, निपाति, उपक्षेति, अभिदासति, आघोषते, विदयते, समजाति, विभूषति, निवर्तत्, प्रभासि, परियासि, विभजासि, उपवोचन्त, प्रणयसि, समूहसि, उपतिष्ठन्त, परिभूषति,

---

१ तुदादिभ्य: श:।३।१।७७ ने 'श' विकरण स्वर; तास्यनुदात्तेन्ङिद.।६।१।१८६ ने 'महे' प्रत्ययस्वराचा बाध करून विकरणस्वर शेष.

२ शपाच्या पिदनुदात्तामुळे तास्यनुदात्तेन्ङिद. ।६।१।१८६ ने 'श' प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

३ श्रुव: शृ: च ।३।१।७४। ने 'शृ' आदेश व श्नु विकरण; इको यणचि ।६।१।७७ ने यण् ; प्रत्ययस्वर शेष.

४ शप् च्या पिदनुदात्तामुळे तास्यनुदात्तेच्छिदद्दुपदेशा.।६।१।१८६ ने 'अन्ति' प्रत्ययस्वराचा बाध करून धातुस्वर शेष.

५ आडजादिनाम्।६।४।७२। ने आडागम व आगमस्वर शेष.

आभूषति, संदायि, प्रभूषत, संभरन्ति, अपवाति, अवधावति, उपासते, परिपश्यन्ति अभिरक्षन्ति, अभिस्वरन्ति, अनुमदन्ति, विराजथ, उपजीवन्ति.

२) **विकरणस्वरपूर्वक गतिनिघातस्वर** :- उपजायते, न्यृषन्ति, न्यृञ्जते, अभिगृणाति, निरिणाति, परिभुजत्, विमुच्य, निरण्यथः, प्रतिरन्ते, व्युच्छन्ति, उत्सिनाति, परिवृणक्षि, अधिक्षियन्ति, प्रवक्ष्यामः, विजानात्, निविशन्ते, अभिजायन्त, उदीरयन्ति, आरिशामहे.

३) **प्रत्ययस्वरपूर्वक गतिनिघातस्वर** :- प्रमिनन्ति, विबध्नते, विजर्भृतः, अधीमसि, उपमिमीहि, परिचायः, न्यूहयुः, न्यूषुः, आयेजे, न्यूहतुः, अपस्यात्, आददिः, आयुयुवे, आददाथे, एरिरे, विममे, अपोर्णुते, उपस्तृणन्ति, अनुवेद, निषेदुः, उन्निनीथः, निरुहथुः, उपयाथः, आशृण्वन्ति, उपब्रुवे.

४) **आगमस्वरपूर्वक गतिनिघातस्वर** :- पर्यतिष्ठत्, प्रत्यहन्, पर्यभूषन्,उपाचरत्, समशीत, निरहन्, अवातिरत्, उदाजत, समावतम्, अध्यधत्तम्, निरततंसमतम्, अवातिरः, अपावपः, अवाख्यात्, अध्यतिष्ठत्, निरतक्षत, समधत्त, पर्यसस्वजत्.

५) **अभ्यस्तस्वरपूर्वक गतिनिघातस्वर** :- आविवासति, अभिदुद्रोह, आविवाससि, आदिदेशति, निजघन्थ, पराददाति,

थोडक्यात, उपसर्ग व धातू यांचा क्रियेत एकत्रित योग असतो, तेव्हा क्रियापद सर्वानुदात्त नसेल तर उपसर्ग व तिङन्त यापैकी तिङन्ताचा जो प्रकृतिस्वर असेल तो कायम राहून उपसर्ग मात्र सर्वानुदात्त होतात असा निष्कर्ष निघतो.

## प्रकरण सातवे

# संकीर्ण स्वर


| अ. क्र. | शीर्षक | पृ. क्र. |
|---|---|---|
| ७.० | प्रास्ताविक | २५९ |
| ७.१ | स्वरव्यत्ययाचे प्रकार | २६० |
| ७.२ | स्वरसाधक सूत्रे व विवेचन | २६५ |
| ७.३ | तिङन्त स्वरव्यत्यय व रुप परिचय | २७० |
| ७.४ | स्वरसिद्धी | २७३ |
| ७.५ | मूल्यमापन | २८४ |

## प्रकरण सातवे

# संकीर्णस्वर

### ७.० प्रास्ताविक :-

आतापर्यंत ऋग्वेदीय प्रथम मंडलातील उदात्त तिङन्ताचा अभ्यास करताना त्यांच्यातील स्वरानुसार धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर, आगमस्वर, अभ्यस्तस्वर, गतिनिघातस्वर असे ६ स्वतंत्र प्रकार कल्पून वेगवेगळ्या प्रकरणांमध्ये त्यांचे सविस्तर विवेचन करून त्या त्या स्वरांची स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न केला. तरी अशी काही उदाहरणे समोर आली की, ज्या उदाहरणांची स्वरसिद्धी पूर्वोक्त धातुस्वरादिक सहा प्रकरणातील नियमांनी होत नाही. अर्थात पूर्वोक्त स्वरांचा बाध होऊन विपरीत स्वर उदात्त आढळला. उदा. 'पीपरत्'[१] या उदाहरणामध्ये ण्यन्ताहून लुङ् लकार केलेला असल्यामुळे 'च्लि' च्या स्थानी 'चङ्' प्राप्त होतो[२]. व वेदामध्ये अडागम बहुलेकरून माङ्योग असो वा नसो तरी होतो वा होत नाही[३]. तसा येथे अडागमाचा अभाव असल्यामुळे 'चङ्' प्रत्ययाचा उक्त जो उपोत्तम स्वर म्हणजे धातुस्वर किंवा अभ्यस्तान्त स्वर तो उदात्त व्हावयास पाहिजे[४]; पण तसे न होता तो आद्युदात्त झालेला आढळतो. अशा प्रकारे स्वरव्यत्यय असलेली २१ उदाहरणे या संकीर्ण स्वर प्रकरणात एकत्रित केलेली आहेत.

वास्तविक पाहता उदात्तकांडामध्ये आतापर्यंत सहा प्रकरणात मिळून एकूण ८६० तिङन्तांची स्वरसिद्धी ज्या-त्या स्वरानुसार ज्या-त्या प्रकरणामध्ये करण्यात आलेली आहे. तेव्हा ८६० तिङन्तांच्या तुलनेत २१ तिङन्तामध्ये आलेला स्वरव्यत्यय नगण्य आहे. पण म्हणून त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. कारण आजपर्यंत वैदिक स्वरांच्या अनियमित व्यवस्थेमुळेच विद्वान आलोचकांची व अभ्यासकांची अनिच्छा निर्माण होऊन वैदिक स्वरसिद्धी दुर्लक्षित राहिली व त्यामुळे आपोआपच त्यातील त्रुटीही तशाच राहून गेल्या. खुद्द

---

१ ऋ. सं. १।४६।६

२ णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ्। पा. सू. ३।१।४८

३ बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि। पा. सू. ६।४।७५

४ चङ्यन्यतरस्याम्। पा. सू. ६।१।२१८

पाणिनी महर्षींनीही या व्यत्ययास लक्षात घेऊन अधिक विवेचन करण्यात वेळ न घालवता 'व्यत्ययो बहुलम्'[१] असे सांगून वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण येथे मात्र वैदिक स्वरसिद्धी हाच विवेच्य विषय आहे व त्यातही ऋग्वेदातील प्रथम मंडलातील तिङन्ताची स्वरसिद्धी करावयाची आहे त्यामुळे ती स्वरसिद्धी साधताना त्या त्या अनुषंगाने येणाऱ्या सर्व विषयांचा ऊहापोह करणे क्रमप्राप्त आहे. म्हणूनच या स्वरव्यत्ययाचा विचार करून त्याने कोणकोणत्या स्वरांचा बाध केलेला आहे, याचा विचार करून पुढील प्रकार कल्पिले आहेत व त्यांची पुढे स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न या प्रकरणात केला जाईल.

## ७.१ स्वरव्यत्ययाचे प्रकार :-

स्वरव्यत्ययाचे प्रकार करताना पूर्वोक्त धातुस्वर इ. सहा प्रकरणातील कोणत्या स्वराचा बाध करून हा स्वरव्यत्यय झालेला आहे हे पाहून त्यांचे प्रकार कल्पिले आहेत. त्यात देखील 'पप्रथत्'[२] व 'प्रणक्'[३] ही दोन उदाहरणे याच स्वरव्यत्ययात सांगितली आहेत. कारण 'प्रपथत्' मध्ये धातुस्वर सिद्ध होत असला तरी 'छन्दस्युभयथा[४]' या सूत्रामुळे सार्वधातुक संज्ञा प्राप्त असल्यामुळे अभ्यस्त स्वराचीही प्राप्ती आहे[५]; म्हणून याची गणना केली आहे. तर 'प्रणक्' या रूपामध्ये आगमस्वर आहे, तरी तो अडागम स्पष्ट दिसत नाही म्हणून आगमस्वर प्रकरणात समावेश न करता या संकीर्ण स्वर प्रकरणात स्थान दिले आहे, असो. स्वरव्यत्ययाचे पुढीलप्रमाणे प्रकार –

१) धातुस्वरबाधक स्वर

२) विकरणस्वरबाधक स्वर

३) प्रत्ययस्वरबाधक स्वर

४) अभ्यस्तादिस्वरबाधक स्वर

५) गतिनिघातस्वरबाधक स्वर

---

१ पा. सू. ३।१।८५
२ ऋ. सं. १।१०३।२
३ ऋ. सं. १।१८।३
४ पा. सू. ३।४।११७
५ अभ्यस्तनामादिः। पा. सू. ६।१।१८९

६) धातुस्वर

७) आगमस्वर

यानंतर या प्रत्येक स्वरव्यत्ययाचे क्रमश: विवेचन करू.

### ७.१.१ धातुस्वरबाधक स्वर :-

धातुस्वरबाधक स्वर यामध्ये 'पीपरत्'[१] व 'जीजनन्त'[२] अशी दोन उदाहरणे घेतलेली आहेत. ही दोन्ही उदाहरणे अनुक्रमे ण्यन्त लुङ् लकार प्रथमपुरुष एकवचन व बहुवचन यांची आहेत. दोन्ही ठिकाणी अडागमचा अभाव आहे. त्यामुळे 'णिश्रिद्रुस्रुभ्य: कर्तरि चङ्'[३] या सूत्राने जो 'चङ्' झालेला आहे ; त्याच्या योगे 'चङ्' च्या उपोत्तम स्वर अर्थात चङ् पूर्वीचा स्वर उदात्त होईल[४]. त्यानुसार 'पीपरत्' यामध्ये 'प' व 'जीजनन्त' यात 'ज' उदात्त होणे अपेक्षित आहे. येथील 'प' व 'ज' हे धातूचे बोधक असल्याने चङ् उपोत्तमस्वर हा धातुस्वर म्हणून पूर्ववर्ती वैयाकरणांनी मानला आहे. म्हणून येथे धातुस्वर म्हणूनच त्याचा उल्लेख केला आहे. तेव्हा हा धातुस्वर उदात्त होणे अपेक्षित होते ; पण व्यत्यय येऊन धातुस्वरबाधक असा अभ्यस्तादिस्वर उदात्त झाला आहे. म्हणून या 'अभ्यस्तादिस्वराची' येथे स्वरसिद्धी करण्याचा पुढे प्रयत्न केला जाणार आहे.

### ७.१.२ विकरणस्वरबाधक स्वर :-

विकरणस्वरबाधक स्वर या प्रकारामध्ये मुच्यते[५], हूयते[६], क्षीयन्ते[७], पच्यते[८], उप्यते[९] अशा ५ तिङन्तांचा समावेश करण्यात आलेला आहे. या ५ तिङन्तांपैकी 'क्षीयन्ते' हे तिङन्त वगळता इतर ४ तिङन्तांमध्ये कर्मणी या अर्थी 'यक्' हा प्रत्यय झालेला आहे. तर 'क्षीयन्ते'

---

१ ऋ. सं. १।४६।६
२ ऋ. सं. १।६०।३
३ पा. सू. ३।१।४८
४ चङ्यन्यतरस्याम्। पा. सू. ६।१।२१८
५ ऋ. सं. १।३१।४
६ ऋ. सं. १।३४।१०
७ ऋ. सं. १।६२।१२
८ ऋ. सं. १।१३५।८
९ ऋ. सं. १।१७६।२

या तिङन्तांमध्ये कर्मकर्तरी अर्थी 'यक्' प्रत्यय झालेला आहे. त्यामुळे 'क्षीयन्ते' या तिङन्तामध्ये स्वरप्रक्रिया क्रमाने 'अन्ते' प्रत्ययस्वराने आद्युदात्त होऊन धातुस्वराचा बाध करतो व नंतर होणारे 'यक्' हे विकरण प्रत्ययस्वराचा बाध करून सतिशिष्टतेने शेष राहू लागेल; पण सतिशिष्टतेच्या नियमानुसार विकरणांना हा नियम लागू होत नाही. तरी आम्ही पूर्वी विकरणस्वर प्रकरणात सिद्ध केले आहे की, अदन्त विकरणांना हा सतिशिष्टतेचे वार्तिक लागू होत नाही. कारण 'यक्' विकरणामुळे 'क्षीय' असा अदुपदेश धातूहून 'अन्ते' प्रत्ययस्वराचा बाध होतो[१] व 'यक्' चा विकरणस्वर शेष राहील; पण 'क्षीयन्ते' या तिङन्तात विकरणस्वराचा बाध होऊन धातुस्वर उदात्त होतो; कारण पुढे कर्मकर्तृत्वाची यक् आहे[२]. त्यामुळे येथे कर्मकर्तृत्वाची यक् पुढे असेल तर विकरणस्वराचा बाध होऊन धातुस्वर उदात्त होतो, हे सिद्ध होईल.

मग विकरणस्वरबाधक धातुस्वर या पहिल्या प्रकरणात 'क्षीयन्ते' या तिङन्ताचा का समावेश केला नाही?

ऋग्वेदीय प्रथम मंडलातील हे एकमेव कर्मकर्तरी प्रयोगाचे उदाहरण आहे. त्यामुळे याची स्वतंत्र मांडणी व्हावी, तसेच 'यक्' विकरणस्वराचा बाध इतर रूपांमध्ये ही होतो, त्यांचा स्वरसिद्ध करताना विशेष करून याचे ग्रहण केले. शिवाय अन्य तिङन्ताच्या स्वरसिद्धीसाठी 'अचः कर्तृयकि'[३] या सूत्राचा उपयोग वा उक्तानुक्तेचा विचार पुढे केला जाईल.

**७.१.३ प्रत्ययस्वरबाधक स्वर :-**

प्रत्ययस्वरबाधक स्वर या प्रकारामध्ये 'जुहोत'[४] व 'शिशीते'[५] ही दोन तिङन्ते स्वीकारण्यात आलेली आहेत. या दोन्ही तिङन्तामध्ये 'त' व 'ते' हे दोन्ही प्रत्यय अपित् लसार्वधातुक आहेत, त्यामुळे जरी धातू अभ्यस्त असले तरी अभ्यस्तादिस्वराची प्राप्ती होत

---

१ तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशा.।६।१।१८६
२ अचः कर्तृयकि। पा. सू. ६।१।१९५
३ पा. सू. ६।१।१९५
४ ऋ. सं. १।१५।९
५ ऋ. सं. १।३६।१६

नाही, तर प्रत्ययस्वराची प्राप्ती होते. व 'जुहोत' उदाहरणात तर प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर उदात्त आहे व 'शिशीते' उदाहरणात अभ्यस्तादिस्वर उदात्त आहे व हेच दोन स्वर येथे अनुक्रमे सिद्ध केले जाणार आहेत.

**७.१.४ अभ्यस्तादिस्वरबाधक स्वर :-**

या प्रकरणारत अभ्यस्त संज्ञक अशा ७ तिङन्तांचा समावेश करण्यात आलेला आहे. वास्तविक पाहता विकरणस्वरबाधक स्वरव्यत्यय व 'प्रणक्' ही तिङन्ते वगळली तर सर्व तिङन्ते अभ्यस्त आहेत. मग त्यांचाही याठिकाणी समावेश का केला नाही?

याचे समाधान असे की, 'पीपरत्' व 'जीजनन्त' या दोन ठिकाणी अभ्यस्तादिस्वरच आहे पण येथे धातुस्वराचा बाध झाला आहे; म्हणून त्यांचा येथे समावेश नाही. तर 'जुहोत' व 'शिशीते' या उदाहरणांमध्ये अभ्यस्तादिस्वर प्राप्त नव्हता किंवा बाध करून हे अन्य स्वरव्यत्यय नाहीत. तर ते प्रत्ययस्वरबाधक असल्याने त्यांचाही येथे समावेश केला नाही. पण 'रारणत्'[१], 'चाकनः'[२], 'तस्तंभत्'[३], 'ततनन्'[४], 'ततनन्त'[५], 'ततनाम'[६], 'शूशवाम'[७] या सातही उदाहरणांमध्ये अभ्यस्तादिस्वर प्राप्त होत असताना त्यांचा अभ्यस्तान्तस्वर उदात्त झालेला आहे.

पण कोणत्या आधारावर अभ्यस्तादिस्वराची प्राप्ती होते?

ही सर्व उदाहरणे लसार्वधातुक आहेत, त्यामुळे अभ्यस्तादिस्वर प्राप्ती होतो.[८]

पण 'रारणत्' व 'चाकनः' ही दोन तर लेट् लकाराची उदाहरणे आहेत व त्याठिकाणी सार्वधातुक संज्ञा प्राप्त नाही. मग का विषयीची काय व्यवस्था?

---

१ ऋ. सं. १।१०।५
२ ऋ. सं. १।५१।१२
३ ऋ. सं. १।१२१।३
४ ऋ. सं. १।१६६।१४
५ ऋ. सं. १।५२।११
६ ऋ. सं. १।१६०।५
७ ऋ. सं. १।१६६।१४
८ पहा. - अभ्यस्तस्वर प्रकरण; पृ. क्र.२२२

ही दोन उदाहरणे लेट् लकारातील असली, तरी वेदामध्ये सार्वधातुक व आर्धधातुक अशा उभयविध संज्ञा प्राप्त आहेत[१]. त्यामुळे 'रारणत्' व 'चाकन:' या उदाहरणांमध्ये 'तिप्' व 'सिप्' प्रत्यय लसार्वधातुक पित् आहेत, त्यामुळे अभ्यस्तादिस्वर प्राप्ती होते. अधिक विवेचन पुढे रूपसिद्धीमध्ये दिले जाईल.

येथे हेच लक्षात घ्यावे की, 'रारणत्' इ. ७ तिङन्तांमध्ये अभ्यस्तादिस्वरबाधक स्वरव्यत्यय असून तो अभ्यस्तान्तस्वर सिद्ध केला जाणार आहे.

**७.१.५ गतिनिघातस्वरबाधक स्वर :-**

या प्रकारात केवळ तीन तिङन्तांचा समावेश करण्यात आलेला आहे. या तीन तिङन्तामध्ये गति-निघातस्वराचा बाध होऊन स्वरव्यत्यय झालेला आहे. उपागहि[२], संगृभीता[३], वितन्वते[४] या तीन तिङन्तापैकी पहिल्या दोन तिङन्तांमध्ये 'गहि' व 'गृभीता' ही सर्वानुदात्त तिङन्ते आहेत त्यामुळे नियमानुसार उदात्त तिङन्त असतानाच गतिनिघातस्वर होतो[५]. मग याचा येथे का स्वीकार केला?

याचे कारण असे की, गतिनिघातस्वर प्रकरणात केवळ गतिसंज्ञकांना निघातस्वर होतो असा नियम संकेतित केलेला होता, तो सिद्ध करण्यासाठी प्राप्त उदाहरणांचा उपयोग करून घेतला होता. शिवाय 'उपागहि' या उदाहरणात 'उप' व 'आ' हे दोन गतिसंज्ञक आहेत. त्यापैकी 'उप' या गतिसंज्ञकास निघात झाला आहे व 'आ' उपसर्गाचा स्वर कायम राहिला, याचीही स्वरसिद्धी येथे सांगितली जाणार आहे; म्हणून स्वतंत्रपणे येथे गतिनिघातस्वरबाधक म्हणून उल्लेख केलेला आहे.

'वितन्वते' या तिङन्तामध्ये तर गतिनिघातस्वराचा बाध झाला आहे. शिवाय तिङन्तावर उदात्त जो प्रत्ययस्वरावर पाहिजे होता त्याचा बाध होऊन तिङन्त अन्तोदात्त झाले

---

१ छन्दस्युभयथा। पा. सू. ३।४।११७
२ ऋ. सं. १।९१।१०
३ ऋ. सं. १।१००।९
४ ऋ. सं. १।११५।२
५ तिङि चोदात्तवति। पा. सू. ८।१।७१

आहे. तेव्हा या तिङन्ताच्या बाबतीत गतिनिघातस्वर बाध व प्रत्ययस्वर बाध करणाऱ्या अन्तोदात्त स्वराची सिद्धता करावयाची आहे.

'पप्रथत्' व 'प्रणक्' या विषयी पूर्वीच सांगितले आहे तेव्हा पुनरूक्ती करीत नाही. याप्रमाणे येथे संकीर्ण स्वर प्रकार मांडून स्वरसिद्धी केली जाणार आहे.

## ७.२ स्वरसाधक सूत्रे व विवेचन :-

स्वरसिद्धी सांगताना उपकारक ठरणाऱ्या अशा काही पाणिनीय सूत्रांचे विवेचन करणे आवश्यक वाटते, जे यापूर्वी पूर्वोक्त प्रकरणांतर्गत केलेले नाही, त्यांचे विवेचन करू.

**१) भीह्रीभृहुमदजनधनदरिद्राजागरां प्रत्ययात्पूर्वं पिति ।६।१।१९२**

भी, ह्री, भृ, हु, मद्, जन्, धन्, दरिद्रा, जागृ या अभ्यस्त धातूंच्या, लसार्वधातुक पित् प्रत्यय पुढे असताना प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त होतो.

प्रस्तुत सूत्रामध्ये 'तास्यनुदात्तेन्ङिद्दुपदेशाल्लसार्वधातुकम्.'[१] इ. सूत्रातून 'लसार्वधातुकम्', 'अभ्यस्तानामादिः'[२] या सूत्रातून 'अभ्यस्तानाम्' अशा दोन पदांची अनुवृत्ती येऊन पुढील प्रमाणे सूत्रवृत्ती बनेल.

वृत्ती – ''भीह्रीभृहुमदजनधनदरिद्राजागराम् अभ्यस्तानां पिति लसार्वधातुके परे प्रत्ययात्पूर्वम् उदात्तं स्यात् ।''

म्हणूनच प्रस्तुत सूत्राचा अर्थ करताना ''भी, ह्री, भृ, हु, मद, जन, धन, दरिद्रा, जागृ या अभ्यस्त धातूंच्या'' असे म्हटले आहे. तेव्हा 'भी, ह्री, भृ, हु, मद्, जन्, धन्' या सात धातूंचा द्वित्व झालेले असताना अभ्यस्त संज्ञा होईल, तर 'दरिद्रा' व 'जागृ' या धातूंना द्वित्व झालेले नसतानाही 'जक्षित्यादयः षट्'[३] या सूत्राने अभ्यस्त संज्ञा आहे. त्यामुळे 'दरिद्राति', 'जागर्ति या उदाहरणांमध्ये 'तिप्' प्रत्ययापूर्वीचा 'द्रा' व 'ग' उदात्त होतात.

---

१ पा. सू. ६।१।१८६
२ पा. सू. ६।१।१८९
३ पा. सू. ६।१।६

पण 'प्रत्ययात्पूर्वम् उदात्तम्' असे का सांगितले आहे ? अभ्यस्तादिस्वराचा बाध व्हावा म्हणून. जर हे सूत्र केले नसते तर पित् लसार्वधातुक प्रत्यय पुढे असताना भी वगैरे अभ्यस्तांचा 'अनुदात्ते च'[१] या सूत्राने अभ्यस्तादिस्वर उदात्त झाला असता. तेव्हा 'अनुदात्ते च' या सूत्राचा प्रस्तुत सूत्राने अपवाद सांगितला आहे, असे येथे सिद्ध होईल.

२) **अचः कर्तृयकि।६।१।१९५**

उपदेशेऽजन्तानां कर्तृयकि परे आदिरूदात्तो वा।[२]

"उपदेशी स्वरान्त धातूंच्या पुढे कर्म अर्थी यक् प्रत्यय असताना आदिस्वर उदात्त विकल्पाने होतो."

येथे 'कर्षात्वतो घञोऽन्त उदात्तः'[३] यातून 'उदात्त' पदाची, तर 'आदिर्णमुल्यन्यतरस्याम्'[४] यातून 'आदिः' 'अन्यतरस्याम्' या पदांची अनुवृत्ती येते. उपरोक्त वृत्ती बनते.

वृत्तीतील 'उपदेशे' हे पद वापरण्याचे प्रयोजन काय? वृत्तीत मुद्दामच 'उपदेशे' पद घातलेले आहे. कारण उपदेशी म्हणजे धातुपाठात मूळ उच्चारणात जे धातू अजन्त-स्वरान्त आहेत, त्यांचा आदिस्वर उदात्त व्हावा, म्हणून सांगितले आहे. तसे सांगितले नसते, तर 'तीर्यते' वगैरे ठिकाणी प्रस्तुत सूत्र लागू झाले नसते. कारण 'तीर्' हे रूप अजन्त नाही; पण 'तॄ प्लवनतरणयोः' असे उपदेशी धातुपाठात अजन्त पठित आहे; म्हणून येथे 'उपदेशे' पद घ्यावे.

सूत्राने अजन्त धातूंचा आदिस्वर सांगताना कोणत्या स्वराचा बाध केला धातुस्वर की विकरणस्वर?

येथे 'यक्' याचा जो विकरणस्वर प्राप्त होता त्याचा प्रस्तुत सूत्राने बाध केला आहे. कारण प्रत्ययस्वराचा बाध हा 'तास्यनुदात्ते.'[५] या सूत्रानुसार पूर्वीच होतो. त्यामुळे 'यक्' चा विकरणस्वर राहून तिङन्त मध्योदात्त होईल.

मग विकल्पपक्षी कोणता स्वर शेष राहील?

---

१ पा. सू. ६।१।१९०
२ पहा. - वै. सि. कौ. भ. दी. वृत्ती
३ पा. सू. ६।१।१५९
४ पा. सू. ६।१।१९४
५ पा. सू. ६।१।१८६

धातूचा आदिस्वर उदात्त होणे विकल्पाने सांगितले आहे. त्यामुळे जेव्हा आद्युदात्त होत नाही तेव्हा 'यक्' हा विकरणस्वर उदात्त होईल.

**३) चङ्यन्यतरस्याम् ।६।१।२१८**

चङन्ते धातावुपोत्तममुदात्तं वा।[१]

प्रस्तुत सूत्रात 'उपोत्तमं रिति'[२] या सूत्रातून 'उपोत्तमम्' पदाची अनुवृत्ती येते. सूत्रात 'चङि' हे सप्तम्यन्त पद आहे. मग 'चङन्त' असा वृत्तिकारांनी अर्थ का केला?

'चङि' हे जरी सप्तम्यन्त पद असले तरी हे स्वरविधी सूत्र आहे. तेव्हा 'स्वरविधौ सप्तम्यस्तदन्तसप्तम्यः' या परिभाषेनुसार 'सप्तम्यन्त पद शेवटी असलेल्या पदाचा' असा अर्थ करावा लागतो. म्हणून 'चङ् पद ज्याच्या शेवटी आहे, अशा पदाचा' असा अर्थ येथे केला जातो. त्यामुळे चङ्न्तापर्यंतचे पद एक मानून त्यांचा उपोत्तम स्वर त्यास प्रस्तुत उदात्त प्राप्त होईल. तेव्हा पुढीलप्रमाणे सूत्रार्थ होईल –

''चङन्ताच्या पूर्वीचा उपोत्तम म्हणजे उपान्त्य स्वर विकल्पाने उदात्त होईल.''

येथे विकल्पाने चङन्ताच्या पूर्वीचा स्वर उदात्त सांगितला आहे. मग विकल्पपक्षी जो चङ् प्रत्ययाचा स्वर उदात्त होईल, तो कोणत्या प्रकारचा होईल?

विकल्पपक्षी 'चङ्' प्रत्ययाचा 'आद्युदात्तः'[३] या सामान्य प्रत्यय स्वराने 'आद्युदात्त' प्रत्ययस्वर प्राप्त होईल. पण 'चङ्' प्रत्यय चित् असल्यामुळे 'चितः'[४] या सूत्राने 'अन्तोदान्त' प्राप्त होईल. तेव्हा येथे विकल्पपक्षी 'चित् प्रत्ययस्वर' आढळेल.

पण लुङ् लकारात होणारा आगमस्वर त्याची काय व्यवस्था ?

लुङ् प्रकारास जो आगमस्वर विहित आहे[१] तो असताना निश्चितपणे तो या उपोत्तम वा चित्प्रत्ययस्वराचा बाध करेल. पण हा उपोत्तमस्वर किंवा चित्प्रत्ययस्वर आगमस्वराभावीच सांगितलेला आहे. जेव्हा अडागम होणार नाही तेव्हा हा 'चङ्' प्रत्ययस्वर आढळून येईल.

---

१ पहा. – वै. सि. कौ. भ. दी. ६।१।२१८ वरील वृत्ती
२ पा. सू. ६।१।२१७
३ पा. सू. ३।१।३
४ पा. सू. ६।१।१६३

४) **गतिर्गतौ ।८।१।७०**

प्रस्तुत सूत्रामध्ये 'अनुदात्तं सर्वमपादादौ'[२] या सूत्राची अनुवृत्ती येऊन पुढील प्रमाणे सूत्रवृत्ती होईल.

''गतौ परे गतिः सर्वमनुदात्तं स्यात्।''

अर्थात गतिसंज्ञक पुढे असताना मागील गतिसंज्ञक पद सर्वानुदात्त होईल. येथे गति पुढे गति असे का म्हटले?

याचे समाधान असे की, गतिसंज्ञकापुढे गतिसंज्ञक असेल तर मागील 'गतिसंज्ञकच' फक्त सर्वानुदात्त व्हावे म्हणून 'गति' पद वापरले. अन्यथा गतिसंज्ञक पुढे असताना प्रातिपदिक वगैरे सुद्धा सर्वानुदात्त होऊन असंभव दोष निर्माण झाला असता. कारण गतिसंज्ञक परक प्रातिपदिक कधीच सर्वानुदात्त नसते. त्याचे प्रकृतिस्वरत्व कायम राहते. उदा. ''अहमभिद्रुह.''[३] येथे 'अहम्' या प्रातिपदिकापुढे अभि हे गतिसंज्ञक पद आहे. सूत्रातील 'गतिः' या पदामुळे येथे पुढे गतिसंज्ञक असूनही 'अहम्' सर्वानुदात्त झालेले नाही.

या उलट 'गतौ' पद घातले; कारण गतिसंज्ञकापुढे इतर कोणतेही पद आले तर गतिसंज्ञक सर्वानुदात्त होऊ नये. जसे ''परिकोशमर्षति.''[४] येथे 'परि' या गतिसंज्ञकापुढे 'कोशम्' हे पद आले आहे, तेव्हा गतिसंज्ञकाचे प्रकृतिस्वरत्व कायम राहावे म्हणून सूत्रात 'गतौ' पद आहे.

थोडक्यात, प्रस्तुत सूत्राने दोन गतिसंज्ञक म्हणजे उपसर्ग एकमेकांपुढे असताना त्यातील पहिला सर्वानुदात्त होतो, असे सांगितले आहे, हे स्पष्ट होते.

५) **समासस्य ।६।१।१२३।**

समासस्य अन्तः उदात्त स्यात्।

''समासाचे शेवटचे अक्षर उदात्त असते.''

---

१ लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः। पा. सू. ६।४।७१
२ पा. सू. ८।१।१८
३ ऋ. सं. १।२३।२२
४ ऋ. सं. १।१३५।२

या सूत्रामध्ये 'अन्तोऽवत्या:'[१] या सूत्रातून 'अन्त' या पदाची व 'कर्षात्वतो घञोऽन्त उदात्त:'[२] यातून 'उदात्त' पदाची अनुवृत्ती येऊन उपरोक्त सूत्रार्थ बनतो.

येथे समासाचा अंत उदात्त होतो, असे का सांगितले? याचे कारण असे की, समास हा कमीत कमी दोन समर्थ पदांचा होतो. उदा. राज्ञ:, पुरुष: यांचा 'राजपुरुष' असा षष्ठी तत्पुरुष समास होईल. येथे स्वरशास्त्रानुसार 'राजन्' हे पद आद्युदात्त आहे, तर 'पुरुष' हे पद सुद्धा आद्युदात्त आहे. मग जेव्हा 'राजपुरुष:' असा समास होतो, तेव्हा एकाच सामासिक पदात दोन उदात्त होऊ लागतात, तेव्हा त्या दोहोंचाही बाध होऊन एकच उदात्त शेष रहावा म्हणून समासाचा शेवटचा स्वर उदात्त सांगितला. तेव्हा 'राजपुरुष' मध्ये 'ष' उदात्त होऊन शेष सर्वानुदात्त होतात.

समासाची स्वरसिद्धी सांगणारे हे सामान्य स्वरसूत्र आहे. याचे पुढे 'बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम्'[३] वगैरे सूत्रांनी अपवाद सांगितले आहेत. पण सामान्य नियमाने समासाचे शेवटचे अक्षर उदात्त होईल.

१ पा. सू. ६।१।२२०
२ पा. सू. ६।१।१५९
३ पा. सू. ६।२।१

## ७.३ तिङन्त स्वरव्यत्यय व रूप परिचय :-

यानंतर क्रमशः पुढे तिङन्तातील स्वरव्यत्यय व रूप परिचय दिला जाईल.

### १. धातुस्वरबाधक स्वर

१) **पीप॑रत्**[1] — प्रस्तुत तिङन्त 'पॄ पालनपूरणयोः' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प. प. ण्यन्त, लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

२) **जीज॑नन्त**[2] — प्रस्तुत तिङन्त 'जनी प्रादुर्भावे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ. प. ण्यन्त, लुङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

### २. विकरणस्वरबाधक स्वर

१) **मुच्य॑ते**[3] — प्रस्तुत तिङन्त 'मुच्लृ मोक्षणे' या 'तुदादिगणस्थ' धातूचे आ. प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

२) **हूय॑ते**[4] — प्रस्तुत तिङन्त 'ह्वेञ् स्पर्धायां शब्दे च' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ. प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

३) **क्षीय॑न्ते**[5] — प्रस्तुत तिङन्त 'क्षीञ् हिंसायाम्' या 'क्रयादिगणस्थ' धातूचे आ. प. कर्मकर्तरी, लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

---

१ हेतुमति च।३।१।२६ ने णिच्, त्याहून लुङ् अचो ञ्णिति।७।१।११५ ने आदिवृद्धीने 'पारि' णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ्।३।१।४८ ने चङ् णेरनिटि।६।४।५१ ने णिलोप; णौ चङ्युपधाया ऱ्हस्वः।७।४।५१ ने ऱ्हस्व होऊन 'पर'; सन्वल्लघु नि.।७।४।९३ ने सन्वद्भाव, चङि।६।१।११ ने द्वित्वाभ्यासादिकार्ये, सन्यतः।७।४।५९ ने अभ्यास इत्व होऊन 'पिपर'; दीर्घोलघोः।७।४।९४ ने दीर्घ होऊन 'पीपरत्'; बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५ ने अडागमाभाव; चङ्यन्यतरस्याम्।६।१।२१८ ने चङ् उपोत्तमस्वर प्राप्त व तो धातुस्वर प्राप्त झाला; पण त्याचा बाध करुन छन्दस्युभयथा।३।४।११७ ने सार्वधातुक संज्ञा प्राप्त झाली व 'अनुदात्ते च।६।१।१९०' ने अभ्यस्तादिस्वर अदात्त झाला.

२ पहा.- प्रक्रिया 'पीपरत्' प्रमाणे, फक्त येथे अभ्यस्तानामादिः।६।१।१८९ ने 'अन्त' अजादिलसार्वधातुक असल्याने अभ्यस्तादिस्वर उदात्त झाला.

३ सार्वधातुके यक्।३।१।६७ ने कर्मणी यक्, तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६ ने 'ते' प्रत्यय अनुदात्त; त्यामुळे 'यक्' विकरणस्वर शेष असताना त्याचा बाध करुन धातुस्वर

४ वचिस्वपियजादीनां किति।६।१।१५ ने यजादिपठित 'ह्वे' धातूला संप्रसारण; अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः।७।४।२५ ने दीर्घ, तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६ ने 'ते' प्रत्यय अनुदात्त व प्राप्त विकरणस्वरबाधक धातुस्वर

५ कर्मवत्कर्मणा तुल्यक्रियाः।३।१।८७ ने कर्मकर्तरी, भावकर्मणोः।१।३।१३ ने आ.प., सार्वधातुके यक् ३।१।६७ ने यक्, तास्यनुदात्तेन्ङिद्दु.।६।१।१८६ ने प्रत्यय अनुदात्त; यक् विकरणस्वर प्राप्त असताना, अचः कर्तृयकि।६।१।१९५ ने विकरण स्वराचा बाध करुन धातुस्वर उदात्त.

४) पच्यंते[१] — प्रस्तुत तिङन्त 'डुपचष् पाके' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ. प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

५) उप्यंते[२] — प्रस्तुत तिङन्त 'डुवप बीजसन्ताने' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे आ. प. कर्मणी, लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

### ३. प्रत्ययस्वरबाधक स्वर

१) जुहोत[३] — प्रस्तुत तिङन्त 'हु दानादानयो:' या 'जुहोत्यादिगणस्थ' धातूचे प. प. लोट् लकार मध्यम पुरुष बहुवचन.

२) शिशीते[४] — प्रस्तुत तिङन्त 'शो तनूकरणे' या 'दिवादिगणस्थ' धातूचे आ. प. लट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

### ४. अभ्यस्तादिस्वरबाधक स्वर

१) रारणत्[५] — प्रस्तुत तिङन्त 'रण शब्दार्था:' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प. प. यङ्लुगन्त, लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

२) चाकनः[६] — प्रस्तुत तिङन्त 'कनी दीप्तिकान्तिगतिषु' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प. प. लेट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

---

१ पहा. – 'मुच्यते' प्रमाणे, त.टी.क्र. १.३

२ वचिस्वपियजादीनां किति।६।१।१५ ने यजादिपठित 'वप' धातूला संप्रसारण; उर्वरित प्रक्रिया पहा.– मुच्यते प्रमाणे, त.टी.क्र.१.३

३ जुहोत्यादिभ्य: श्लु:।२।४।७५ ने श्लु; श्लौ।६।१।१० ने द्वित्व, अभ्यासादिकार्ये, तप्तनप्तनथाश्च।७।१।४५ ने 'तप्' प्रत्यय व तो पित् असल्यामुळे अनुदातौ सुप्पितौ।३।१।४। ने अनुदात्त व सार्वधातुकार्धधातुकयो:।७।३।८४ ने गुण मूळ प्रत्यय जो 'त' या उदात्त प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर शेष.

४ बहुलं छन्दसि।२।४।७६ विकरण 'श्यन्' त्याचा बाध करुन श्लु; आदेच उपदेशेऽशिति।६।१।४५ ने आत्व; श्लौ।६।१।१० ने द्वित्व, अभ्यासादिकार्ये, बहुलं छन्दसि।७।४।७८ ने अभ्यासास इत्व, ई हल्यघो:।६।१।११३ ने ईत्व, प्रत्ययस्वर प्राप्त, त्याचा बाध करुन अभ्यस्तादिस्वर.

५ धातोरेकाच:क्रियासमभिहारे यङ्।३।१।२२ ने यङ्, यङोचि च।२।४।७४ ने यङ्लुक्, प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्।१।१।६२। ने द्वित्व, अभ्यासादिकार्ये, दीर्घोऽकित:।७।४।८३ ने दीर्घ 'रारण:' सनाद्यन्ता धातवा:।३।१।३२ ने धातुसंज्ञा, धातो:।६।१।१६२ ने 'रारण्' अन्तोदात्त; लिङर्थे लेट्।३।४।७ ने लेट्, इतश्च लोप: परस्मैपदेषु।३।४।९७ ते इलोप, लेटोऽडाटौ।३।४।९४ ने अडागम व तो आगमा अनुदात्ता भवन्ति या परिभाषेने अनुदात्त; छन्दस्युभयथा।६।४।११७ ने सार्वधातुक संज्ञा प्राप्त असताना, अभ्यस्तांच्या बाबतीत लसार्वधातुक प्रत्यय झाल्याने अभ्यस्तादिप्राप्त त्याचा बाध करुन धातुस्वर शेष; किंवा अभ्यस्ताचा अंत उदात्त.

६ छन्दसि वेति वक्तव्यम्। पा.सू.६।१।१। वा.१ या नुसार द्वित्व, अभ्यासादिकार्ये, लिङर्थे लेट्।३।४।७ ने लेट्, इतश्च लोप; परस्मैपदेषु।३।४।९७ ने सिप्च्या इकाराचा लोप; लेटोऽडाटौ।३।४।९४ ने अडागम व तो अनुदात्त, कुहोश्चु:।७।४।६२ ने चुत्व, तुजादीनां दीर्घोऽभ्यासस्य।६।१।७ ने दीर्घ; छन्दस्युभयथा।३।४।११७ ने सार्वधातुक संज्ञा; अनुदात्ते च।६।१।१९० ने अभ्यस्तादिस्वर प्राप्त; त्याचा बाध करुन धातुस्वर शेष वा अभ्यस्तान्तोदात्त.

३) तस्तंभत्[१] — प्रस्तुत तिङन्त 'ष्टभि प्रतिबन्धे' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प. प. लेट् लकार प्रथम पुरुष एकवचन.

४) ततनन्[२] — प्रस्तुत तिङन्त 'तनु विस्तारे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प. प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

५) ततनन्त[३] — प्रस्तुत तिङन्त 'तनु विस्तारे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ. प. लङ् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

६) ततनाम[४] — प्रस्तुत तिङन्त 'तनु विस्तारे' या 'तनादिगणस्थ' धातूचे प. प. लोट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

७) शूशवाम[५] — प्रस्तुत तिङन्त 'शवति गतिकर्माण:'[६] या छान्दस्य धातूचे प. प. लोट् लकार उत्तम पुरुष बहुवचन.

### ५. गतिनिघातस्वरबाधक स्वर

१) उपागहि[७] — प्रस्तुत तिङन्त 'उप + आ + गम्लृ गतौ' या 'भ्वादिगणस्थ' धातूचे प. प. लोट् लकार मध्यम पुरुष एकवचन.

२) संगृभीता[८] — प्रस्तुत तिङन्त 'सम् + ग्रह उपादाने' या 'क्र्यादिगणस्थ' धातूचे आ. प. लिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

---

१ छन्दसि वेति वक्तव्यम्। पा. सू.।६।१।१ वा.१ ने द्वित्व, अभ्यासादिकार्ये, उर्वरित प्रक्रिया 'चाकन:' प्रमाणे; धातुस्वर वा अभ्यस्तान्तोदात्त

२ व्यत्ययो बहुलम्।३।१।८५ ने विकरणव्यत्यय येऊन शप् विकरण व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७६ ने श्लु. श्लौ।६।१।१० ने द्विताभ्यासादिकार्ये बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि।६।४।७५ अडागम अभाव; 'अन्' अजादिलसार्वधातुक असल्यामुळे अभ्यस्तानामादि:।६।१।१८९ ने अभ्यस्तादिस्वर प्राप्त, त्याचा बाध करुन धातुस्वर शेष.

३ पहा. – 'ततनन्' प्रमाणे.

४ आडुत्तमस्य पिच्च।३।४।९२ ने पित्त्वामुळे 'आम' सर्वानुदात्त; व धातुस्वर शेष, उर्वरित प्रक्रिया 'ततनन्' प्रमाणे.

५ तुजादीनां दीर्घोभ्यासस्य।६।१।७ ने अभ्यास दीर्घ; सर्वप्रक्रिया 'ततनाम' प्रमाणे.

६ पहा. – निघ. २.१४.१७

७ बहुलं छन्दसि।२।४।७३ ने शपाचा लोप; सेर्ह्यपिच्च।३।४।८७ ने 'हि', अनुदात्तोपदेश वनति-तनोत्यादीना.।६।४।३७ ने अकारलोप; तिङतिङ।८।१।८८ ने तिङन्त सर्वानुदात्त; गतिर्गतौ।८।१।७० ने 'उप' या पूर्वीच्या गति संज्ञकाचा निघात व 'आ' गतिसंज्ञकाचे उपसर्गाश्चाभिवर्जम्। फि.सू. ४।१३ ने आद्युदात्तत्व कायम; अक: सवर्णे दीर्घ।६।१।१०१ ने सवर्णदीर्घ एकादेश; व तो एकादेश उदात्तेनोदात्त:।८।२।५ ने उदात्त; उदात्तादनुदात्तस्य स्वरित:।८।४।६६ ने 'ग' स्वरित व स्वरितात्संहितायामनुदात्तानाम्।१।२।४९ ने एकश्रुती.

८ बहत्ययो बहुलम्।३।१।८५ ने शप् व त्याचा बहुलं छन्दसि।२।४।७३ ने लोप; लिङ: सीयुट्।३।४।१०२ ने सीमुडागम; लिङसलोपोऽनन्तस्य।७।२।७९ ने सलोप; ग्रहिज्यावयिव्य.।६।१।१६ ने संप्रसारण; हृग्रहोर्भश्छन्दसि। पा.सू. ३।१।८४ वा.१ ने भत्व; द्व्यचोऽतस्तिङ:।६।३।१३५ ने दीर्घत्व; तिङतिङ:।८।१।२८ ने तिङन्त सर्वानुदात्त व उपसर्गगतिस्वर शेष.

३) वितन्वते[१] प्रस्तुत तिङन्त 'वि + तनु विस्तारे' या 'तनादिगणस्थ' धातूचे आ. प. लट् लकार प्रथम पुरुष बहुवचन.

### ६. धातुस्वर

१) पप्रथत् प्रस्तुत तिङन्त 'पृथु' नामाहून 'णिजन्त' 'प्रथि विस्तारे' या नामधातूचे प. प. लुङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

### ७. आगमस्वर

१) प्रणक् प्रस्तुत तिङन्त 'पृची सम्पर्के' या 'रूधादिगणस्थ' धातूच प. प. लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन.

## ७.४ स्वरसिद्धी :-

पूर्वी सांगितल्याप्रमाणे तिङन्तामध्ये स्वरव्यत्यय आलेला आहे. केवळ 'व्यत्ययो बहुलम्'[२] असे पाणिनीय सूत्र देऊन हा स्वरव्यत्यय सिद्ध करता येतो, पण तरीही ही तिङन्ते इतर कोणत्या मार्गाने स्वरसिद्ध होतात का, याचा शोध घेण्याचा येथे प्रयत्न करूया. यानुसार धातुस्वरबाधक स्वर, विकरणस्वर बाधक, प्रत्ययस्वर बाधक, अभ्यस्तादिस्वर बाध व गतिनिघातस्वर बाधक अशा पूर्वोक्त ५ स्वरव्यत्ययांची स्वरसिद्धी क्रमशः करू.

१. **धातुस्वरबाधक - १) पीपरत् २) जीजनन्त**

येथे 'पीपरत्' व 'जीजनन्त' अशी दोन प्रयोजक, लुङ् लकारातील आहे.[३] येथे अनुक्रमे 'प' व 'ज' या ठिकाणी म्हणजे धातुस्वर उदात्त होणे प्राप्त होते[४]; पण ते आद्युदात्त झालेले आहेत. या प्रबंधात मांडणी केल्याप्रमाणे 'पीपरत्' व 'जीजनन्त' हे अभ्यस्तस्वर प्रकरणात मोडतात. त्यामुळे येथे आमच्या प्रबंध स्वररचनेनुसार 'अभ्यस्तादि' उदात्त झाला आहे. तेव्हा याची स्वरसिद्धी देताना 'व्यत्ययो बहुलम्' असे म्हणून स्वरव्यत्यय

---

१ येथे 'समर्थः पदविधिः।२।१।१' या सूत्रानुसार या तिङकाशी समास होऊन समासस्य।६।१।१२३ ने अन्तोदात्त झाले. येथे 'वि' गतिस्वर व 'अते' प्रत्ययस्वराचा बाध होऊन अन्तोदात्त तिङन्त झाले आहे.

२ पा. सू. ३।१।८५

३ पहा. - रूपपरिचय, ७.३.१

४ पहा. - रूपपरिचय, ७.३.१, त.टी.क्र. १.१ व २.२

दाखविण्यापेक्षा 'छन्दस्युभयथा'[१] या सूत्राने लुङ् लकारात ही झालेले 'तिप्' व 'झ' हे प्रत्यय सार्वधातुक होतात. तेव्हा 'पीपरत्' येथे 'तिप्' हा उदात्तरहित लसार्वधातुक प्रत्यय म्हणून सिद्ध होईल, त्यामुळे 'अनुदात्ते च'[२] या सूत्राने 'पीपरत्' या अभ्यस्ताचा आदिस्वर उदात्त होईल.

तर 'जीजनन्त' येथे झालेला 'अन्त' प्रत्यय अजादि लसार्वधातुक सिद्ध होऊन 'अभ्यस्तानामादिः'[३] सूत्राने अभ्यस्तादिस्वर सिद्ध होतो. याप्रमाणे 'पीपरत्' व 'जीजनन्त' या दोन्ही तिङन्ताचे आद्युदात्तत्व स्वरव्यत्यय न मानता स्वरसिद्ध करता येईल.

२) **विकरणस्वरबाधक :-**

येथे १) मुच्यते, २) हूयते, ३) पच्यते, ४) उप्यते या ५ तिङन्तांच्या ठिकाणी 'यक्' विकरण स्वराचा बाध होऊन धातुस्वर उदात्त झालेला आहे.

तर 'क्षीयन्ते' या तिङन्तामध्ये कर्तरी अर्थी यक् प्रत्यय झाल्यामुळे 'अचः कर्तृयकि' या सूत्राने 'यक्' विकरणस्वराचा बाध होऊन धातुस्वर उदात्त सिद्ध होतो.

पण उपरोक्त मुच्यते, हूयते, पच्यते व उप्यते या ठिकाणी कर्मणी अर्थी यक् झाला आहे. त्यामुळे येथे विकरणस्वरच प्राप्त होतो. तेव्हा त्यांची व अशा प्रकाराच्या ऋग्वेदीय इतरही तिङन्ताची स्वरसिद्धी व्हावी, म्हणून 'अचः कर्तृयकि' या सूत्रावर खास वैदिक उदाहरणांच्या सिद्धतेसाठी एक स्वरचित वार्तिक बनवित आहोत, ज्यामुळे इतरही प्रयोग या वार्तिकाने सिद्ध करता येतील. स्वरसिद्धी क्षेत्रातील निश्चितच स्वरव्यत्ययाची अडचण काही अंशी तरी दूर होईल. पा. पू. "अचः कर्तृयकि ।६।१।१९५."[४]

१) **स्वरचित वा. 'यकि हलश्च छन्दसीति वक्तव्यम्'**

अर्थ - "वेदामध्ये यक् प्रत्यय पुढे असताना अजन्त व हलन्त अशा उभयविध धातूंचा आदिस्वर विकल्पाने उदात्त होईल."

---

१ पा. सू. ३।४।११७
२ पा. सू. ६।१।१९०
३ पा. सू. ६।१।१८९
४ पहा. सार्थ विवेचन. ७.२.२

'व्यत्ययो बहुलम्' असे प्रत्यक्ष सूत्राने उक्त असताना हे वार्तिक करण्याची काय आवश्यकता?

जरी पाणिनी महर्षींनी 'व्यत्ययो बहुलम्'[१] असे सांगून स्वरसिद्धी होत असली, तरी हा अंतिम निर्वाणीचा उपाय झाला. जर एखाद्या सूत्रातील उक्तानुक्ततेचा विचार करून त्यावर स्वतंत्र वार्तिक करण्याची गरज नाही असे म्हटले तर सर्वच वैदिक प्रयोग केवळ 'बहुलं छन्दसि' या एकाच सूत्राने सिद्ध करता येतील. अर्थात अशामुळे कोणत्याच प्रकारचे संशोधन ते असणार नाही, तर केवळ कसेबसे केलेले व्यर्थ प्रयत्न ठरतील. याशिवाय पाणिनी महर्षींनी सुद्धा वेगवेगळे वैदिक प्रयोग पाहून ठिकठिकाणी गरजेनुसार 'बहुलं छन्दसि' या सूत्राचा वापर केलेला आहे. संपूर्ण अष्टाध्यायीत अशी १३ सूत्रे[२] रचण्यात आलेली आहेत.

तसेच वार्तिककारांनी देखील 'एकाचो द्वे प्रथमस्य'[३] या सूत्रावर 'छन्दसि वेति वक्तव्यम्' असे वार्तिक केलेले आहे. तेव्हा मतितार्थ एवढाच की, सूत्रकार व वार्तिककार हे दोघेही लक्ष्यैकचक्षुष्क होते; त्यामुळे त्यांनी त्या त्या उदाहरणांनासमोर ठेवून प्रयोग सिद्ध करण्यासाठी सूत्रांची रचना केली. जे जे प्रयोग सूत्रकारांच्या नजरेतून निसटले, त्याची सिद्धी साधण्याचा प्रयत्न वार्तिककारांनी केला.

तेव्हा याचप्रमाणे 'लक्ष्यलक्षणे व्याकरणम्' असे व्याकरण शास्त्राचे संबंध वाक्य आहे. त्यानुसार मुच्यते इ. वैदिक प्रयोग लक्ष्य मानून केलेले प्रस्तुत स्वरचित वार्तिक अयोग्य, अप्रस्तुत ठरीत नाही, हे सिद्ध होते.

मग वार्तिकामध्ये 'यकि' पद का घातले आहे?

'कर्तृयकि' या पदाची सूत्रातून अनुवृत्ती येऊ नये म्हणून. अन्यथा प्रस्तुत वार्तिकाने कर्तरी अर्थी यक् प्रत्यय केला तरच हलन्त व अजन्त धातूंचा आदिस्वर विकल्पाने उदात्त झाला असता. पण 'यकि' पद घातल्यामुळे कर्मणी अर्थी यक् प्रत्यय असतानाही अजन्त व हलन्त धातूंचा आदि स्वर उदात्त होईल.

---

१ पा. सू. ३।१।८५

२ बहुलं छन्दसि = पा. सू. २।४।३९, २।४।७३, २।४।७६, ३।२।८८, ५।२।१२२, ६।१।३४, ७।१।८, ७।१।१०, ७।१।१०३, ७।३।९७, ७।४।७८, ६।४।७५, ३।२।८१

३ पा. सू. ६।१।१

मग 'हलश्च' यातील 'च' ग्रहणाने काय विशेष साधावयाचे आहे?

चकार ग्रहणाने येथे 'अजन्त' म्हणजे सूत्रातील 'अच:' पदाची व 'अन्यतरस्याम्' याही पदाची अनुवृत्ती साधावयाची आहे. पण नुसते 'हल:' असे म्हटले असते तर 'अन्यतरस्याम्' पदाची अनुवृत्ती आली असती पण केवळ हलन्त धातूंचाच आदिस्वर उदात्त झाला असता. 'हूयते' या उदाहरणाची त्यामुळे स्वरसिद्धी होऊ शकली नसती व अव्याप्ती दोष उत्पन्न झाला असता. तेव्हा ही सदोषता टाळण्यासाठी 'चकाराचे' ग्रहण केले.

'छन्दसि' असे का म्हटले?

तर हे स्पष्टच आहे की, हे वार्तिक केवळ वैदिक प्रयोग सिद्ध करण्यासाठीच आहे. लौकिक प्रयोगात 'यक्' विकरणस्वरच उदात्त रहावा म्हणून 'छन्दसि' पद घातले.

तेव्हा स्पष्टपणे सिद्ध होते की, प्रस्तुत स्वरचित वार्तिकाने मुच्यते, पच्यते, उप्यते व हूयते या चारही तिङन्ताची स्वरसिद्धी स्वरव्यत्यय न मानता देता येईल.

तरीही प्रश्न राहतोच की, केवळ चार-पाच वैदिक प्रयोगांच्या सिद्धतेसाठी एखादे स्वतंत्र वार्तिक नव्याने करणे योग्य आहे का?

तर याचे समाधान असे की, जर 'छन्दसि पुनर्वस्वोरेकवचनम्'[१] 'विशाखयोश्च'[२] इ. अनेक ठिकाणी काही विशिष्ट प्रयोगांसाठी प्रत्यक्ष महर्षी सूत्र करण्याचा प्रपंच करीत असतील, तर हे सुद्धा वैदिक स्वरसिद्धीच्या दृष्टीने विशेष प्रयोग आहे. त्याच्या स्वरसिद्धीसाठी असे वार्तिक रचणे योग्यच ठरेल. किंबहुना यातून वैयाकरणांची लक्ष्यैकचक्षुष्कताच सिद्ध होईल.

आज वैयाकरण केवळ लक्षणैकचक्षुष्क झाले आहेत. म्हणजे जे सूत्रांनी सिद्ध होत नाही वा वार्तिकांनी सिद्ध होत नाही ते अयोग्य मानतात, असा आरोप होतो. त्यांचेही खंडन होऊन आज ही शब्द हेच लक्ष्य असून वैयाकरण त्या शब्दांची साधुशब्द सिद्धीसाठी व्याकरणाची रचना करतात हे सिद्ध होईल.

---

१ पा. सू. १।२।६१
२ पा. सू. १।२।६२

तसेच येथे ४ उदाहरणे समोर आलेली आहेत. कारण विषय ऋग्वेदीय प्रथम मंडलापर्यंतच मर्यादित आहे. त्यामुळे शेष ९ मंडलामध्येही असे प्रयोग आढळू शकतील की, जे या नवनिर्मित वार्तिकाने स्वरसिद्ध होऊ शकतील. आणि खऱ्या अर्थाने तेव्हा प्रस्तुत प्रबंध रचनेचा उद्देश सफल होईल, असे वाटते.

थोडक्यात, मुच्यते, हूयते, पच्यते, उप्यते व क्षीयन्ते यांचे धातुस्वर याप्रमाणे सिद्ध करता येतील. तसेच यासारख्या इतर स्वरव्यत्ययांचाही स्वरसिद्धी होऊ शकेल, असे वाटते.

**३. प्रत्ययस्वरबाधक व अभ्यस्तादिस्वरबाधक :-**

प्रत्ययस्वरबाधक स्वरव्यत्ययामध्ये 'जुहोत' व 'शिशीते' या दोन तिङन्ताचा समावेश होतो. तर अभ्यस्तादिस्वरबाधक स्वरव्यत्ययामध्ये - १) रारणत् २) चाकनः ३) तस्तंभत् ४) ततनन् ५) ततनाम ६) शूशवाम ७) ततनन्त अशा सात तिङन्ताचा समावेश होतो.

यापैकी जुहोत, रारणत्, चाकनः, तस्मंभत्, ततनन्, ततनाम, शूशवाम व ततनन्त या ८ तिङन्ताचा अभ्यस्तान्त उदात्त झालेला आहे. त्यापैकी 'जुहोत' हे तिङन्त स्वरसिद्ध करताना "भीह्रीभृहुमदजनघनदरिद्राजागरां प्रत्ययात्पूर्वं पिति"[१] या सूत्राने 'तप्' या लोट् लकारात मध्यम पुरुष बहुवचन झालेल्या पित् प्रत्यय आहे[२]. त्यामुळे या पित् प्रत्ययापूवीचा स्वर 'हो' उदात्त झाला व त्याने 'अनुदात्ते च'[३] सूत्राने प्राप्त अभ्यस्तादिस्वराचाही बाध केला व याप्रमाणे 'जुहोत' हे अभ्यस्तान्त स्वर उदात्त असलेले तिङन्त स्वरसिद्ध होईल.

याचप्रमाणे 'रारणत्' ते 'शूशवाम' या पाच तिङन्तामध्ये पित् प्रत्यय असून ही सर्व तिङन्त अभ्यस्त संज्ञक होतात व 'ततनन्' व 'ततनन्त' ही दोन तिङन्तेही अभ्यस्त संज्ञक आहेत. फक्त अपित् प्रत्ययान्त आहे. या सर्वांचा अभ्यस्तान्त स्वर उदात्त तो सिद्ध करण्यासाठी व अशा प्रकारच्या छांदस अभ्यस्त धातूंची स्वरसिद्धी करण्यासाठी

---

१ पा. सू. ६।१।१९२
२ पा. सू. तप्तनप्तनथनाश्च।७।१।४५ ने 'तप्'
३ पा. सू. ६।१।१९०

'भीह्रीभृहुमदजलधनदरिद्राजागरां प्रत्ययात्पूर्व पिति' या सूत्रावर नववार्तिक रचले तर स्वरव्यत्यय टाळून अशा प्रकारच्या इतर प्रयोगांचीही सिद्धता होऊन सूत्रातील अनुक्ततेचा दोषही टळेल.

२) **स्वरचित वा. ''छान्दसाभ्यस्तानामपिति च वेति वक्तव्यम्.''**

अर्थ - ''वेदामध्ये छान्दस अभ्यस्त संज्ञकांचा पित् प्रत्यय पुढे असताना व अपित् प्रत्यय असतानाही विकल्पाने प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त होतो, असे म्हणावे.''

वार्तिकातील 'छान्दस-अभ्यस्त' म्हणजे काय?

वेदामध्ये बहुलेकरून शप् विकरण होते व शपाचा श्लु देखील बहुलेकरून होतो. तेव्हा असा श्लु होऊन द्वित्व झालेले धातू त्यांना येथे 'छान्दस अभ्यस्त' म्हटले आहे. अशी वेदामध्ये अनेक उदाहरणे आहेत. त्यांच्यापुढे पित् वा अपित् प्रत्यय आला तर विकल्पेकरून त्या पित् वा अपित् प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त व्हावा म्हणून 'छान्दसाभ्यस्त' शब्द वापरला आहे.

'अपिति' असे का म्हटले आहे?

कारण छान्दस द्वित्व झालेल्या धातूंचा अपित् सार्वधातुक प्रत्यय असताना तो अजादि प्रत्यय असेल तर 'अभ्यस्तानामादिः'[१] याने आद्युदात्त प्राप्त होईल पण 'ततनन्' व 'ततनन्त' या ठिकाणी अभ्यस्तादिस्वर न होता, 'अन्' व 'अन्त' या अपित् प्रत्ययांपूर्वीचा स्वर उदात्त झालेला आहे, तो सिद्ध व्हावा म्हणून अपित् प्रत्ययांचे ग्रहण केले.

मग 'चकार' ग्रहणाने कशा-कशाची अनुवृत्ती मानावी?

'प्रत्ययात्पूर्व पिति' या पदांची अनुवृत्ती मानावी, त्यामुळे पित् प्रत्यय असताना अभ्यस्तादिस्वराचा बाध होऊन प्रत्ययाच्या पूर्वीचा स्वर उदात्त होईल. उदा. रारणत्, चाकनः, तस्तंभत्, ततनाम, शूशवाम. या पाचही उदाहरणांमध्ये पित् प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त झालेला आहे. यामुळे ही पाचही उदाहरणे स्वरसिद्ध होऊ शकतात.

मग 'वा' वार्तिकात घालण्याचे प्रयोजन काय?

---

१ पा. सू.।६।१।१८९

'वा' घालून प्रत्ययापूर्वीचा स्वर विकल्पाने उदात्त होईल, असे सांगावयाचे आहे. कारण तसा विकल्प सांगितला नाही, तर 'अभ्यस्तानामादि:'[१] व 'अनुदात्ते च'[२] या दोन सूत्रांची विहित अभ्यस्तादिस्वर कधीच प्राप्त होऊ शकणार नाही. तसेच विकल्प सांगितल्यामुळे हलादि – अपित् प्रत्यय असताना विकल्पाने छांदस अभ्यस्तांचा प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त होईल अन्यथा प्रत्ययस्वरच कायम राहील.

तेव्हा प्रस्तुत स्वरचित नववार्तिकाने छांदस अभ्यस्तांचा, पित् वा अपित् प्रत्यय पुढे असताना त्या प्रत्ययापूर्वीचा स्वर विकल्पाने उदात्त होईल व तो जेव्हा उदात्त होणार नाही, तेव्हा पूर्वोक्त सूत्रांनी जो स्वरविहित असेल, तो होईल व याप्रमाणे वेदात बहुलेकरून द्वित्व झालेल्या अशा छांदस धातूंच्या तिङन्त रूपांची या वार्तिकाच्या सहाय्याने स्वरसिद्धी सहजपणे साधता येईल.

या वार्तिकामुळे निश्चितच स्वरप्रक्रियेत मौलिक भर पडून छान्दस प्रयोग स्वरव्यत्यय न मानता सिद्ध करता येतील.

रारणत् ते ततनन्त या ७ तिङन्तांची स्वरसिद्धी असून एखाद्या वेगळ्या मार्गाने देता येईल का?

हो. ही सातही तिङन्ते जर ण्यन्त, लुङ् लकारान्त मानली, तर यांची स्वरसिद्धी करता येईल.

पण, मग त्या तिङन्ताच्या अर्थाच्या दृष्टीने काय अवस्था? कारण, ही तिङन्ते 'लिङर्थे लेट्'[३] अशी झालेली आहेत.

अशी अर्थ विषयक समस्या निर्माण होत नाही. कारण वेदामध्ये धातूच्या अर्थाशी संबंध आला असताना लुङ्, लङ्, व लिट् या लकारांचा सर्व काळात विकल्पाने उपयोग करण्यात येतो. हे पाणिनी महर्षींनींच 'छन्दसि लुङ्लङ्लिट:'[४] या सूत्रामध्ये सांगितले आहे. त्यामुळे या सूत्रानुसार लिङर्थे लुङ् लकार झाला असे समजून अर्थविषयक समस्येचे निवारण सहजपणे करता येईल.

---

१ पा. सू. ६।१।१८९
२ पा. सू. ६।१।१९०
३ पा. सू. ३।४।७
४ पा. सू. ३।४।६

ठीक. मग लुङ् लकारात रारणत् इ. सात उदाहरणांची स्वरसिद्धी कशी केली जाईल?

ण्यन्त लुङ् लकार मानल्यामुळे प्रथम या सातही तिङन्तामध्ये 'हेतुमति च'[१] याने 'णिच्' प्राप्त समजावा किंवा बहुलेकरून[२] 'णिच्' झाला असे ही मानता येईल. पुढे 'णिश्रिद्रुस्रुभ्य: कर्तरि चङ्'[३] या सूत्राने 'चङ्' होऊन 'चङि'[४] या सूत्राने द्वित्वादि कार्ये होऊन पुढे 'बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि'[५] या सूत्राने लुङ् लकारात 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त:'[६] याने जो अडागमस्वर प्राप्त, तो अडागम न झाल्यामुळे 'चङ्यन्यतरस्याम्'[७] या सूत्राने चङन्ताच्या पूर्वीचा स्वर उदात्त होईल व रारणत्, चाकन:, तस्तंभत्, ततनन्, ततनाम, शूशशवाम, ततनन्त ही तिङन्ते स्वरसिद्ध होतील.

अशा प्रकारे 'भीह्रीभृहुमदजनधनदरिद्राजागरां प्रत्ययात्पूर्वं पिति'[८] या सूत्राने 'जुहोत' व नवनिर्मित वार्तिक 'छान्दसाभ्यस्तानामपिति च वेति वक्तव्यम्' याच्या सहाय्याने रारणत्, चाकन:, तस्तंभत्, ततनन्, ततलास, शूशवाम, ततनन्त ही तिङन्ते स्वरसिद्ध करता येतील.

पण 'शिशीते' हे तिङन्त मात्र कोणत्याही प्रकारे आद्युदात्त सिद्ध करता येत नाही. त्यामुळे येथे मात्र स्वरव्यत्यय मानून ते आद्युदात्त झाले आहे, असे म्हणावे लागेल.

**४. गतिनिघातस्वरबाधक :-**

गतिनिघातस्वरबाधक अशी तीन तिङन्ते आहेत - १) उपागहि, २) संगृभीता ३) वितन्वते.

यापैकी 'उपागहि' व 'संगृभीता' या दोन तिङन्तामध्ये 'उप + आ' व 'सम्' हे उपसर्ग अर्थात गतिसंज्ञक सर्वानुदात्त न होता उदात्त राहिले आहेत. तर याचे कारण काय?

---

१ पा. सू. ३।१।२६
२ पा. सू. व्यत्ययो बहुलम्।३।१।२८ ने विकरण व्यत्यय
३ पा. सू. ३।१।४८
४ पा. सू. ६।१।११
५ पा. सू. ६।४।७५
६ पा. सू. ६।४।७१
७ पा. सू. ६।१।२१८
८ पा. सू. ६।१।१९२

तर गतिनिघातस्वर प्रकरणातच सूत्राने स्पष्ट केले आहे की उदात्त तिङन्त पुढे असेल तरच गतिनिघातस्वर म्हणजे सर्वानुदात्त होतो.[१] त्यानुसार येथे 'गहि' व 'गृभीता' ही दोन्ही तिङन्ते 'तिङतिङ'[२] सूत्राने सर्वानुदात्त आहेत; त्यामुळे गतिसंज्ञकाचे मूळ स्वर कायम राहिले आहेत.

याशिवाय 'उपागहि' यामध्ये 'उप' व 'आ' अशी दोन गतिसंज्ञके आहेत. त्यापैकी पहिले 'उप' सर्वानुदात्त असून 'आ' या गतिसंज्ञकाचे उदात्तत्व कायम आहे. याचे कारण गतिसंज्ञकापुढे दुसरे गतिसंज्ञक आले तर पहिले गतिसंज्ञक सर्वानुदात्त होते, असे 'गतिर्गतौ'[३] या सूत्राने सिद्ध केले आहे, त्यानुसार येथे 'उप' पहिले गतिसंज्ञक सर्वानुदात्त झाले हे सिद्ध होऊ शकते. या शिवाय गतिनिघातस्वर प्रकरणात सांगितले आहे की, गतिनिघात व तिङन्त पदपाठात अवग्रहाने वेगळा दाखवितात, तेथे ते एकच पद मानतात.

उदा. "**वेदा ये अध्यासते** ।"[४] - संहितापाठ

**वेद । ये । अधिऽआसते** । पदपाठ

पण तिङन्त सर्वानुदात्त असून गतिसंज्ञकावर उदात्त असेल, तर ती दोन्ही पदे वेगवेगळी मानली जातात.

उदा. चिकि**त्वाँ अभि** पश्यति।[५] - संहिता-पाठ

चिकि**त्वान्** । अ**भि**। पश्यति। - पदपाठ

आणि जर दोन गतिसंज्ञक पूर्वक सर्वानुदात्त तिङन्त असेल, तर त्यांचे एकपद मानून गतिनिघात अवग्रहाने वेगळा दाखविला जातो.

उदा. जुजुषा**ण उपा**गहि।[६] - संहितापाठ

जुजुषा**णः**। उपऽ**आ**गहि। - पदपाठ

---

१ तिङि चोदात्तवति। पा. सू. ८।१।७१
२ पा. सू. ८।१।२८
३ पा. सू. ८।१।७०
४ ऋ. सं. १।२५।९
५ ऋ. सं. १।२५।११
६ ऋ. सं. १।९१।१०

म्हणून यांचा सर्वांचा स्वतंत्र अशा संकीर्ण प्रकरणात समावेश केला.

यानंतर 'वितन्वते' हे ही एक वेगळे तिङन्त आहे. येथे गतिनिघात दिसतो, पण तो 'तिङि चोदत्तवति'[१] या सूत्राने झालेला नाही. आणि त्यामुळे या तिङन्ताचा 'गतिनिघातस्वर' या प्रकरणात समावेश न करता यास स्वतंत्रपणे चर्चेसाठी संकीर्ण प्रकरणात घेतले आहे.

जर 'तिङि चोदात्तवति' या सूत्राने गतिनिघात झाला नाही, तर कोणत्या सूत्राने झालेला आहे? याची स्वरप्रक्रिया काय?

याचे समाधान असे की, 'वितन्वते' या तिङन्तामध्ये 'समासस्य'[२] या सूत्राने अन्तोदात्त होऊन शेष निघात 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[३] या सूत्राने झालेला आहे.

याच्या स्वरप्रक्रियेनुसार 'वि' गतिसंज्ञक 'उपसर्गाश्चाभिवर्जम्'[४] या फिट्सूत्राने आद्युदात्त होईल, तर 'तन्वते' हे तिङन्त 'अते' हा प्रत्यय 'आद्युदात्तश्च'[५] या सूत्राने आद्युदात्त होईल पण 'तनादिकृञ्भ्य उ:'[६] याने होणारे 'उ' हे विकरण 'अते' प्रत्यय स्वराचा बाध करेल पण, 'सतिशिष्ट स्वरबलीयस्त्वमन्यत्रविकरणेभ्य: इति वाच्यम्' या वार्तिकाने 'उ' विकरणस्वराचा बाध करून 'अते' प्रत्ययस्वर कायम राहील व 'तन्वते' असे मध्योदात्त तिङन्त सिद्ध व 'वि' गतिनिघात प्राप्त असताना 'वि' उदात्त गतिसंज्ञकाबरोबर असताना 'तिङि चोदत्तवति'[७] याने गतिनिघात प्राप्त असताना 'वि' गतिसंज्ञकाचा 'तन्वते' तिङन्त पदाशी गतितत्पुरुष समास झाल्यामुळे 'समासस्य'[८] सूत्राने 'वितन्वते' याचे शेवटचे अक्षर 'ते' उदात्त झाले व 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'[९] या सूत्राने शेष सर्वानुदात्त होईल.

अशा प्रकारे सामासिक तिङन्त ऋग्वेदीय प्रथम मंडलात हे एकच आढळले, त्यामुळे त्याची स्वरसिद्धी या संकीर्ण प्रकरणात स्वरसिद्धी सांगितली आहे.

---

१ पा. सू. ८।१।७१
२ पा. सू. ६।१।२२३
३ पा. सू. ६।१।१५८
४ फि. सू. ४।१३
५ पा. सू. ३।१।३
६ पा. सू. ३।१।७९
७ पा. सू. ८।१।७१
८ पा. सू. ६।१।२२३
९ पा. सू. ६।१।१५८

५. **धातुस्वर व आगमस्वर :-**

धातुस्वर व आगमस्वर यांची अनुक्रमे 'पप्रथत्' व 'प्रणक्' अशी प्रत्येकी एक उदाहरणे आहे. त्याची क्रमश: स्वरसिद्धी करू.

१. ''**पप्रथत्**'' या तिङन्तामध्ये धातुस्वर उदात्त आहे, असे सांगितले जाते. मग येथे संकीर्ण प्रकरणात घालण्याचे कारण काय ?

तर याचे समाधान असे की, येथे पूर्ववर्ति-वैयाकरणांच्या मतानुसार धातुस्वर असला तरी आमच्या प्रबंध रचनेनुसार येथे अभ्यस्ताचा अन्त उदात्त आहे. त्यामुळे याची स्वतंत्र स्वरसिद्धी सांगणे आवश्यक वाटले. तसेच हे लुङ् लकारातील चङन्त रूप आहे. त्यामुळे चङन्ताच्या पूर्वीचा स्वर उदात्त होतो, हे सिद्ध करणारे हे एकच उदाहरण प्रथम मंडलातील आढळल्याने त्यास स्वतंत्र करून मांडत आहे.

येथे ''पृथुं करोति इति, प्रथयति, विस्तारयति'' या अर्थी ''तत्करोति तदाचष्टे'' या गणसूत्राने 'णिच्' प्रत्यय होतो[१]. आणि ''प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च''[२] या वार्तिकाने 'पृथु' हा प्रातिपदिकाहून धात्वर्थी 'णिच्' प्रत्यय होऊन 'इष्ठवत्' कार्य करण्याचा अतिदेश प्राप्त होतो. त्यानुसार 'र ऋतो हलादेर्लघो:'[३] या सूत्राने ऋकारास रकार होऊन 'प्रथु' बनले. पुढे 'टे:'[४] सूत्राने टिलोप; 'प्रथ् + णिच् = प्रथि' यास 'सनाद्यन्ता धातव:'[५] या सूत्राने धातुसंज्ञा, लुङ्[६] लकार, 'णिश्रिद्रुस्रुभ्य: कर्तरि चङ्'[७] याने 'चङ्', 'चङि'[८] सूत्राने द्वित्वाभ्यासादिकार्ये होऊन 'बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि'[९] याने अडागमाभाव व 'चङ्यन्यतरस्याम्'[१०] ने 'पप्रथत्' थकारापूर्वीचा स्वर उदात्त होऊन स्वरसिद्धी होईल.

---

१ येथे पा. सू. ३।१।१७ वरील गणसूत्राने तसे करोति, आचष्टे या अर्थी द्वितीयान्त प्रातिपादिकाहून 'णिच्' प्रत्यय सांगितला आहे. त्यानुसार येथे 'पृथु' म्हणजे पसरविणे या 'प्रसार करतो' या अर्थी 'णिच्' झाला आहे.

२ ''धात्वर्थी प्रातिपदिकाहून विकल्पाने णिच् प्रत्यय होऊन 'इष्ठवत्' कार्य केले जाते''

३ पा. सू. ६।४।१६१

४ पा. सू. ६।४।१५५

५ पा. सू. ३।१।३२

६ पा. सू. ३।२।११०

७ पा. सू. ३।१।४८

८ पा. सू. ६।१।११

९ पा. सू. ६।४।७५

१० पा. सू. ६।१।२१८

अशा प्रकारे 'पप्रथत्' येथे धातुस्वर किंवा अभ्यस्तान्तस्वर सिद्ध करत येईल.

२. "**प्रणक्**" - याठिकाणी 'पृचीसम्पर्के' या धातूहून 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त'[१] या सूत्राने अडागम प्राप्त झाला, तो 'आद्यन्तौ टकितौ'[२] या सूत्राने टित् असल्यामुळे 'पृणक्' या तिङन्ताचा आदिस्थानचा अवयव होऊन 'अपृणक्' असे रूप होणे अभिप्रेत होते. पण 'व्यत्ययो बहुलम्'[३] यानुसार 'श्नम्' विकरणापूर्वी होऊन 'पृ + अ + न + क्' अशी स्थिती झाली व 'इको यणचि'[४] सूत्राने यण् होऊन 'प्रणक्' रूपे बनले. येथे 'अनुदात्त' कायम राहिला, त्याने 'श्नम्' विकरणस्वराचा बाध केलेला आहे.

येथे आगमस्वरच आहे; पण अडागम व्यत्ययाने त्याच्या विहित स्थानी झालेला नसल्यामुळे यास संकीर्ण प्रकरणात स्वीकारले व अशा प्रकारे आगमस्वर सिद्ध होईल.

अशा प्रकारे स्वरव्यत्यय येऊन वेगळी झालेली तिङन्ते या संकीर्ण प्रकरणात सिद्ध करण्याचा प्रत्यय केला आहे. यावरून असे म्हणता येईल की, वैदिक तिङन्तामध्ये स्वरसिद्धी करताना वैदिक तिङन्ते व व्याकरण यांचा लक्ष्यलक्षण संबंधाने विचार करून त्या त्या तिङन्ताच्या स्वरानुसार व्याकरणसूत्रांचा विचार केला पाहिजे. जर एखादे सूत्र तो विशिष्ट प्रयोग सिद्ध करू शकत नसेल, तर त्याच्या पूर्ततेसाठी वार्तिकादिकांचा आधार घ्यावा. त्यांचे ही मौन असेल, तर वैयाकरानी ती जबाबदारी स्वीकारून व्याकरणशास्त्रात परिपूर्णता आणण्यासाठी नवीन वार्तिकांची रचना केली पाहिजे. जशी येथे दोन नवीन वार्तिके रचून स्वरसिद्धीस परिपूर्तता आणण्याचा प्रयत्न केला आहे.

### ७.५ मूल्यमापन :-

प्रस्तुत संकीर्ण स्वर प्रकरणात २१ अशी तिङन्ते संकलित करण्यात आलेली आहेत, ज्यामध्ये पूर्वीच्या मांडलेल्या धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर, आगमस्वर, अभ्यस्तस्वर व गतिनिघातस्वर यापैकी कोणत्या ना कोणत्या तरी स्वराचा बाध करून वेगळाच स्वर उदात्त

---

१ पा. सू. ६।४।७१
२ पा. सू. १।१।४६
३ पा. सू. ३।१।८५
४ पा. सू. ६।१।७७

झालेला आहे. म्हणून अशा स्वराचा अडथळा येण्यास, वा उलटापालट आढळते, त्यास व्याकरणशास्त्रात 'व्यत्यय' असे म्हटले आहे. येथे या व्यत्ययाचा अभ्यास करण्यासाठी हे संकीर्ण स्वर प्रकरण केले आहे. या २१ तिङन्तांपैकी १८ तिङन्तामध्ये स्वरव्यत्यय आलेला आहे, तर ३ तिङन्ते ही अशी स्वरप्रक्रियेच्या दृष्टीने निराळी आहेत; म्हणून त्यांचा समावेश करण्यासाठी यास 'स्वरव्यत्यय' असे नाव न देता, 'संकीर्ण स्वर' असे शीर्षक दिले आहे.

मग ही ३ तिङन्ते कोणती? असा प्रश्न निर्माण होईल. तर ती तिङन्ते आहेत, "वितन्वते, पप्रथत्, प्रणक्." यापैकी पहिले तिङन्त हे समासस्वराचे बोधक आहे, ज्या स्वराचा वास्तविक पाहता पूर्ण प्रबंधात कोठेही उल्लेख करण्याचा संबंध आलेला नव्हता; पण या एका तिङन्तामुळे उपसर्ग अर्थात गतिसंज्ञकाचा तिङन्ताशी होणारा गतितत्पुरुष समास येथे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या तिङन्तांचा अभ्यास हा केवळ प्रथम मंडलापुरता मर्यादित असल्यामुळे या तिङन्त - समासस्वरावर अधिक भाष्य वा स्वतंत्र प्रकरण करता आलेले नाही; तरी देखील त्याचे महत्त्व व स्वतंत्र अस्तित्व या प्रकरणात मांडण्याचा निश्चितच प्रयत्न केला आहे. ज्यामुळे पुढे जर कोणी संशोधनाचे दुसऱ्या, तिसऱ्या वा इतर मंडलातील तिङन्तांच्या स्वरसिद्धी अभ्यास केला, तर निश्चितच त्यांना हा 'तिङन्त समासस्वर' स्वतंत्रपणे मांडता येईल, ज्याची मुहूर्तमेढ या प्रकरणात करण्यात आलेली आहे.

'पप्रथत्' या तिङन्ताच्या बाबतीत देखील चङन्तापूर्वीचे स्वरोदात्तत्व सांगण्यासाठी यास वेगळे मांडले आहे. त्यामुळे वेदामध्ये लुङ् लकारात चङ् झालेला असेल व अडागमाचा अभाव असेल, तर अभ्यस्ताचा अन्त उदात्त होईल, असा नियम येथे मांडता येईल.

'प्रणक्' हे देखील असेच वेगळे रूप आहे. याठिकाणी आगमव्यत्यय आलेला आहे. अर्थात लुङ्, लङ्, लृङ् या तीन लकार विहित असलेला अडागम हा धातूच्या आदिस्थानी होतो; पण येथे तो धातूच्या उपधेला होऊन आगम देखील वेदामध्ये व्यत्ययाने होतात हे स्पष्ट करण्यास पुरावा मिळालेला आहे. पाणिनी महर्षींच्या 'व्यत्ययो बहुलम्' या सूत्रावर भाष्य करताना वेगवेगळे व्यत्यय सांगितले जातात, त्यामध्ये 'प्रणक्' या उदाहरणांचा समावेश करून लङ्, लुङ्, लृङ् लकारात होणारे आगम देखील व्यत्ययाने होतात, हे सिद्ध करता येईल.

आता शेष १८ तिङन्तांमध्ये स्वरव्यत्यय आलेला आहे. आणि हा स्वरव्यत्यय टाळून किंवा 'व्यत्ययो बहुलम्' असे म्हणून स्वरसिद्धी करण्याऐवजी प्रत्यक्ष स्वरसिद्धी करण्याचा येथे प्रयत्न केला आहे, त्यानुसार 'पीपरत्' व 'जीजनन्त' या ठिकाणी वेदामध्ये आर्धधातुक व सार्वधातुक अशा दोन्ही संज्ञा होतात, असे मानून या दोन्ही तिङन्ताचा अभ्यस्तादिस्वर सिद्ध केला आहे.

तर मुच्यते, हूयते, क्षीयन्ते, पच्यते, उप्यते या तिङन्तामध्ये 'यक्' विकरणस्वराचा बाध करणारा धातुस्वर सिद्ध केला आणि त्यासाठी **'यकि हलश्च छन्दसीति वक्तव्यम्'** असे नववार्तिक सुचविले आहे, ज्यामुळे तत्सदृश्य अन्य प्रयोगही सिद्ध होऊ शकतील.

जुहोत, रारणत्, चाकनः, तस्तंभत्, ततनन्, ततनन्त, ततनाम, शूशवाम या आठ (८) तिङन्तामध्ये अभ्यस्तादि स्वराचा बाध होऊन अभ्यस्तान्त उदात्त झाला आहे, हा सिद्ध करण्यासाठी वरील प्रमाणे येथेही एक नववार्तिक सुचविले आहे ते की **'छान्दसाऽभ्यस्तानामपिति च वेति वक्तव्यम्'**. यामुळे हे सर्व धातू अभ्यस्त संज्ञक आहेत. त्यामुळे त्याचा येथे प्रस्तुत वार्तिकामुळे अभ्यस्ताचा अन्तोदात्त विकल्पाने झालेला असे सिद्ध करता येते. शिवाय ऋग्वेदीय अन्य मंडलातील असे प्रयोगही यामुळे सिद्ध होतील.

तर तिङन्तावर उदात्त नसेल, तरच त्याच्याबरोबर असलेले गतिसंज्ञक अर्थात उपसर्ग त्यांच्यावर उदात्त राहतो, अन्यथा गतिनिघात स्वर प्रकरणात सांगितल्याप्रमाणे ते सर्वानुदात्त होतात, हे सिद्ध करण्यासाठीच ही 'उपागहि व संगृभीता' उदाहरणे स्वतंत्रपणे दिलेली आहेत.

याशिवाय दोन उपसर्ग एकत्रित असतील तर त्यातील प्रथम उपसर्ग सर्वानुदात्त होतो व दुसऱ्याचे प्रकृतिस्वरत्व कायम राहते हे देखील सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

थोडक्यात, या संकीर्ण प्रकरणाचा सारांश असा सांगता येईल की, ज्यांचा स्वरव्यत्यय मानून त्यांना या संकीर्ण प्रकरणात घातले, त्यांची पूर्वोक्त प्रकरणात पुढील प्रमाणे मांडणी करून विभागणी करता येईल.

१) **अभ्यस्तस्वर**

१) **अभ्यस्तादिस्वर -**

१) लुङ् लकारातही विकल्पाने सार्वधातुक संज्ञेमुळे अजादि प्रत्यय व पित् यांचा अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल. उदा. पीपरत्, जीजनन्त.

२) वेदामध्ये छान्दस द्वित्व झालेले असेल, तर अभ्यस्तादि स्वर विकल्पाने उदात्त आढळतो, अपित् प्रत्यय असतानाही. उदा. शिशीते.

२) **अभ्यस्तान्त स्वर -**

१) लुङात चङन्त धातू असेल, तर त्याअभ्यस्ताचा अन्त उदात्त होईल. पण अडागम भाव असताना. उदा. पप्रथत्.

२) भी, ह्री, हु, भृ, मद्, धन्, दरिद्रा, जागृ या धातूंच्या पुढे पित् प्रत्यय असताना अभ्यस्ताचा अन्त उदात्त होतो अर्थात प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त होईल. उदा. जुहोत.

३) वेदामध्ये छांदस द्वित्व होऊन अभ्यस्त धातूंच्या पुढे पित् व अपित् प्रत्यय असताना विकल्पाने अभ्यस्तान्तोदात्त होईल. उदा. रारणत्, चाकन:, तस्तंभत्, ततनन्, ततनन्त, ततनाम, शूशवाम.

२) **धातुस्वर**

१) **विकरणस्वरबाधक धातुस्वर :**

१) कर्मकर्तरी प्रयोगामध्ये विकरणस्वराचा बाध होऊन अजन्त धातूचा स्वर उदात्त होईल. उदा. क्षीयन्ते.

२) वेदामध्ये कर्मणी प्रयोगामध्येही 'यक्' विकरणाचा बाध विकल्पाने होऊन हलन्त व अजन्त अशा दोन्हींचे धातुस्वर उदात्त होतील. उदा. हूयते - अजन्त धातू. मुच्यते, पच्यते, उप्यते - हलन्त धातू.

३) **गतिस्वर -**

१) तिङन्त सर्वानुदात्त असताना 'गति' संज्ञक अर्थात उपसर्गाचे प्रकृती स्वर कायम राहतात. उदा. संगृभीता.

२) दोन उपसर्ग असतील व तिङन्त सर्वानुदात्त असेल, तर त्या उपसर्गापैकी प्रथम उपसर्ग सर्वानुदात्त होईल व दुसऱ्याचे प्रकृतिस्वरत्व कायम राहील. उदा. उपागहि.

४) **तिङन्तसमासस्वर -**

१) उपसर्गाबरोबर तिङन्ताचा गतितत्पुरुष समास होऊन वेदामध्ये कधी कधी तो समास अन्तोदात्त असतो. उदा. वितन्वते.

५) **आगम व्यत्यय -**

१) वेदामध्ये लुङ्, लङ्, लृङ् लकारात होणाऱ्या आगम व्यत्ययाने आदि वा अन्त्य स्थानी होऊ शकतो. उदा. प्रणक्

अशा प्रकारे संकीर्ण स्वर प्रकरणात एकत्रित करून स्वरसिद्धी केलेल्या तिङन्ताची विभागणी करता येईल. तसेच या प्रकरणात तयार करण्यात आलेली दोन स्वरचित नववार्तिके निश्चितपणे संस्कृत व्याकरणशास्त्राला उपकारचे ठरून जेथे जे तदनुकूल स्थिती आढळेल, ते प्रयोग स्वरसिद्ध करता येतील. 'व्यत्ययो बहुलम्' असे म्हणावे लागणार नाही.

# अनुदात्तकांड

**प्रास्ताविक :-**

ऋग्वेदातील प्रथम मंडलातील तिङन्तांची स्वरसिद्धी करणे असा विषय समोर घेऊन ऋग्वेदामध्ये संशोधन केले तेव्हा दोन प्रकारची तिङन्ते आढळली – १) उदात्ततिङन्त, २) अनुदात्ततिङन्त. यापैकी उदात्ततिङन्तांची चर्चा करण्यासाठी पूर्वी 'उदात्तकांड' रचून त्यातील उदात्तस्वराविषयी सविस्तर चर्चा केलेली आहे. आता तिङन्तांचा जो दुसरा प्रकार 'अनुदात्ततिङन्त' यांच्या अध्ययनासाठी 'अनुदात्तकांड' कल्पिले आहे.

या 'अनुदात्तकांडा'मध्ये ऋग्वेदातील प्रथम मंडलात आढळलेली अनुदात्ततिङन्ते एकत्रित करून त्यांच्या सर्वानुदात्त स्वराचा अभ्यास केला जाणार आहे. वास्तविक पाहता अनुदात्त तिङन्तांची संख्या ही 'उदात्ततिङन्तांहून' बरीच मोठी आहे. पण स्वरसिद्धीच्या दृष्टीने अनुदात्ततिङन्ताची स्वरप्रक्रिया उदात्ततिङन्तस्वरसिद्धीहून किती तरी पटीने सहज, सुलभ व सुबोध आहे.

तसे बघितले तर संहितेत सर्वानुदात्तच तिङन्त आढळतात किंबहुना तिङन्ते अनुदात्तच असतात. असा बऱ्याचदा ग्रह असल्यामुळे तिङन्त स्वरसिद्धीचा अभ्यास दूरच राहतो. मग प्रश्न निर्माण होतो की, जर तिङन्त अनुदात्त असतात, हे सिद्धपूर्व आहे, तर येथे अनुदात्त तिङन्तांचा पुनरुच्चार का केला जात आहे ?

याचे समाधान असे की, तिङन्तस्वरसिद्धी सांगताना केवळ उदात्ततिङन्त स्वरसिद्धी सांगून चालणार नाही, तर त्या बरोबर अनुदात्ततिङन्तावरही चर्चा होणे आवश्यक आहे. आणि जर अनुदात्ततिङन्तांचा समावेश केला नसता, तर प्रबंध अपूर्ण राहिला असता, तसेच ऋग्वेदीय प्रथम मंडलातील १५१४ अनुदात्ततिङन्तानी जी संख्या आहे ती, निश्चितपणे उदात्तकांडात सांगितलेल्या उदात्तस्वर प्रकार उदा. धातुस्वर वगैरे या सर्वांचा बाध करून अनुदात्त होतात हे सिद्ध करण्यास समर्थ ठरतील म्हणूनच येथे 'अनुदात्तकांड' स्वतंत्रपणे मांडून या सर्वानुदात्त तिङन्ताचे अध्ययन केले जाईल.

मग उदात्तकांडांप्रमाणे येथे अनुदात्तस्वराची वेगवेगळी प्रकरणे केली जातील का ?

नाही. याचे कारण असे की, येथे सर्व तिङन्ते एकाच स्वराने युक्त असतात, आणि तो म्हणजे 'अनुदात्त', त्यामुळे त्याची स्वतंत्र प्रकार करून प्रकरणे करता येणार नाही.

पण, उदात्तस्वराचे जे प्रकार धातुस्वर वगैरे त्याचे बाधक सर्वानुदात्त तिङन्त असे म्हणून प्रकारात विभागणी करता येणार नाही का ?

नाही. कारण येथे तीच उदात्तकांडातील प्रकरणे घेऊन, तीच नावे पुनरुच्चारून दोषास्पद होतील. पुनरुक्तिदोषनिवारणार्थ तसे केले जाणार नाही. परंतु, सर्वानुदात्त तिङन्त होताना कोणत्या स्वराचा बाध करून ते सर्वानुदात्त होईल हे मात्र तळटीपांमध्ये सांगितले जाईल.

उदात्तस्वराचा बाध करून तिङन्तास सर्वानुदात्त करणाऱ्या पाणिनीय स्वरसाधक सूत्राचे विवेचन करू.

**स्वरसाधक पाणिनीय सूत्र व विवेचन :**

**१) तिङ्ङतिङः।८।१।२८**

अतिङन्तात् पदात् परं अपादादौ तिङन्तं सर्वमनुदात्तं स्यात्।

प्रस्तुत सूत्रात 'सर्वमनुदात्तमपादादौ'[१] या सूत्राची अनुवृत्ती येते. येथे 'अतिङः' हे 'न तिङ्, अतिङ् तस्मात्। नञ् तत्पु.' असे नञ् तत्पुरुष समासान्त रूप असून पंचम्यन्त पद आहे. तर 'तिङ्' प्रथमा एकवचनान्त आहे. तेव्हा याचा अर्थ पुढील प्रमाणे होईल –

"तिङन्त भिन्न पदापुढील पादारंभी नसलेले तिङन्त पद सर्वानुदात्त होईल."

सूत्रात 'अतिङ' पद का घातले? याचे समाधान असे की, जर मागील 'तिङो गोत्रादीनि कुत्सनाभीक्ष्ण्ययो:'[२] या सूत्रातून 'तिङो' या पंचम्यन्त पदाचे निवारण व्हावे म्हणून. अन्यथा तिङन्तापुढील तिङन्तपदच केवळ सर्वानुदात्त होण्याचा अतिप्रसंग ओढविला असता.

---

१ पा. सू. ८।१।१८

२ पा. सू. ८।१।२७

त्या टाळण्यासाठी 'अतिङ्:' असे पंचम्यन्त पद सूत्रात घालण्यात आले. तसेच 'अतिङ' सांगितल्यामुळे क्रियापद नसलेले अशी सर्व पदे या एका पदाने संगृहीत केली आहे. म्हणूनच 'अग्निमीळे.'[१] या उदाहरणात 'अग्निम्' या अतिङ् पदापुढील 'ईळे' पद सर्वानुदात्त होते.

तसेच येथे 'सर्वम् अनुदात्तम् अपादादौ' यांची अनुवृत्ती घेऊन काय साधले?

या सूत्राच्या अनुवृत्तीमुळे 'ईळे' तिङन्तातील सर्व स्वर अनुदात्त होतील. तसेच 'अपादादौ' अर्थात पादारंभी नसलेले असे तिङन्त असणे आवश्यक आहे. कारण जर 'अपादादौ' याची अनुवृत्ती नसेल, तर पादारंभी सुद्धा तिङन्त अनुदात्तच राहील.

ते कसे शक्य आहे, सूत्रात 'अतिङः' असे पद आहे. याचे समाधान असे की, जरी 'अतिङ्' पदापुढील 'तिङन्त' म्हटले तरी, पादारंभी आमंत्रितपद असेल, तर ते अतिङ् म्हणजे क्रियापद नसते, पण 'आमन्त्रितं पूर्वमविद्यमानवत्'[२] या सूत्रानुसार ते अविद्यमान म्हणजे तेथे नाही असे समजून त्यापुढील तिङन्त आपोआपच पादारंभी मानले जाईल. तेव्हा ते सर्वानुदात्त होऊ नये म्हणून 'अपादादौ' पदाची अनुवृत्ती मानणे आवश्यक आहे. उदा. ''मरुतः पिबत.''[३], किंवा ''धिष्ण्या वनतं.''[४]

आणि म्हणूनच पादारंभी असलेले तिङन्त उदात्त आढळते. उदा. ''गायन्ति तया गायत्रिणो.''[५], ''ईळते त्वामवस्यवः.''[६] येथे 'गायन्ति' व 'ईळते' ही दोन्ही तिङन्ते पादारंभी आहेत, त्यामुळे 'तिङतिङः' या सूत्रात 'अपादादौ' पदाची अनुवृत्ती मानल्यामुळे येथे निघात होत नाही. व तिङन्त उदात्त होतात. तर 'पिबत' व 'वनतम्' या उदाहरणांमध्ये अनुक्रमे 'मरुतः' व 'धिष्ण्या' ही अनुक्रमे क्रियापदे नसलेली अशी 'अतिङ्' पदे आहेत; पण ती दोन्ही

---

१ ऋ. सं. १।१।१
२ पा. सू. ६।१।७२
३ ऋ. सं. १।१५।२
४ ऋ. सं. १।३।२
५ ऋ. सं. १।१०।१
६ ऋ. सं. १।१४।५

विवेचन करताना 'तस्योदात्ततरोदात्तादर्धमात्रार्धमेव वा'[१] असे सूत्र केले आहे जे पाणिनीय 'तस्यादित उदात्तमर्धऱ्हस्वम्'[२] याच्याशी तुल्य आहे. त्याचबरोबर स्वरिताचे पुढे जर उदात्त वा स्वरित नसेल तर स्वरिताचा उत्तरार्ध 'अनुदात्तः परः शेषः'[३] असा ऐकू येतो, हे सुद्धा पाणिनीय शास्त्रात 'उदात्तस्वरिपरस्य सन्नतरः'[४] याने अभिव्यक्त केले आहे. स्वरिताची व्युत्पत्ती सांगताना 'उदात्तपूर्वं स्वरितमनुदात्तं पदेऽक्षरम्'[५] अशी केली आहे, जी पाणिनीय सूत्रात 'उदात्तादनुदात्तस्य स्वरित'[६] अशी सांगितली आहे. पण याचबरोबर जात्यस्वरिताची व्युत्पत्ती ही ऋक्प्रातिशास्त्राची स्वतंत्र रचना आहे, जी त्यांनी 'अतो ऽ न्यत्स्वरितं स्वारं जात्यम्'[७] अशी सूचित केली आहे. या व्याख्येनुसार जो स्वरित उदात्तपूर्ववर्ती नाही असा आहे, त्याहून वेगळा तो 'जात्यस्वरित' म्हटला आहे. उदा. " क्वं नूनं कद्वो."[८] यातील 'क्च' पद जात्यस्वरिताचे उदाहरण आहे. पण हा जात्यस्वरित पाणिनींना 'तित्स्वरितम्'[९] या द्वारे अभिप्रेत आहे.

पण संधीवर आधारित जो प्रश्लेष, क्षैप्र व अभिनिहित स्वर ते स्वरित होतात[१०] व यांच्या सिद्धतेसाठी सर्वस्वी प्रातिशाख्यांवर अवलंबून रहावे लागते. जसे – "मक्ष्वि १ त्था धिया नंरा।"[११] या "अप्स्व १ न्तरमृतं."[१२] किंवा 'ह्यु १ च्वा विंजर्भृतः।"[१३] इ. अशी ऋग्वेदीय प्रथम मंडलात १८ उदाहरणे आहेत[१४]. पण या सर्व उदाहरणांमध्ये क्षैप्र–जात्यस्वरित

---

१ ऋक्. प्राति. ३.२.२
२ पा. सू. १।२।३२
३ ऋक्. प्राति. ३.३.१
४ पा. सू. १।२।४०
५ ऋक्. प्राति. ३.४.१
६ पा. सू. ८।४।६६
७ ऋक्. प्राति. ३.४.२
८ ऋ. सं. १।३८।२
९ पा. सू. ६।१।१८५
१० ऋक्. प्राति. ३।७
११ ऋ. सं. १।२।६
१२ ऋ. सं. १।२३।१९
१३ ऋ. सं. १।२८।७
१४ १८ उदाहरणांपैकी ३ उदाहरणे दिलेली आहेत. १५ उदाहरणे पुढीलप्रमाणे
ष्व १ स्मा अवतं.। ऋ. सं. १।४७।५
न्यू ३ षुवाचं.। ऋ. सं. १।५३।१
ततन्थार्व १ न्तरिक्षं.। ऋ. सं. १।९१।२२

आहे, जो यण् संधीने झालेला आहे. त्यामुळे ही उदाहरणे पाणिनीय सूत्राने 'उदात्तस्वरितयोर्यण: स्वरितोऽनुदात्तस्य।'[1] याने जात्यस्वरित सिद्ध होऊ शकतो पण "वृणानो ३ यं सोमो."[2] येथील 'वृणान: + अयम्' हा ऋक्प्रातिशाख्यानुसार 'अभिनिहित' आहे. जो पाणिनीय सूत्रांनी सिद्ध करण्यासाठी 'स्वरितो वानुदात्ते पदादौ'[3] हे सूत्र केले आहे.

याशिवाय पाणिनीय व्याकरणात संहितेतील स्वरितापुढील अनुदात्तांची एकश्रुती सांगितली आहे, ती येथे 'प्रचय' या नामाने रूढ आहे. थोडक्यात, ऋक्प्रातिशाख्यातील तृतीय पटलाचा जो संकल्प आढळतो की, "श्रीशौनकीय ऋग्वेदप्रातिशाख्ये स्वरवर्णनं नाम तृतीयपटलम्" यानुसार केवळ या पटलात उदात्तादिक स्वराचे वर्णन व स्वरिताचे स्वरूप व प्रकारांचे विवेचन आहे. ते वगळता ऋक्प्रातिशाख्यात स्वरसिद्धीच्या दृष्टीने विवेचन केलेले आढळत नाही, हे वरील विवेचनातून स्पष्ट होते. शिवाय हे 'स्वरवर्णन' करण्यासाठी प्रातिशाख्यकारांनी १० श्लोकांचा वापर केला आहे, तर या उलट पाणिनी महर्षींनी पूर्वीच उपोद्घातात स्पष्ट केल्याप्रमाणे २८ सूत्रांनी स्वरविवेचन केलेले आहे.

येथे स्पष्ट होते की, 'ऋक्प्रातिशाख्य' जरी ऋग्वेदाचे व्याकरण सांगणारे, शिक्षोपदेशक असले तरी स्वरसिद्धीच्या दृष्टीने अत्यल्प विवचेन आहे, जे विवेचन पाणिनीय सूत्रांनी अधिक स्पष्टपणे केलेले आहेच, शिवाय त्याहून किती तरी अधिक प्रमाणात वैदिक स्वरसिद्धी

---

ह्यु १ श्मसि.। ऋ. सं. १।९४।३
दिव्य १ न्यद.। ऋ. सं. १।१०३।१
अभ्य १ न्यद.। ऋ. सं. १।१२३।७
ह्य १ र्कस्य.। ऋ. सं. १।१३१।६
भ्या ३ यव:। ऋ. सं. १।१३९।३
व्यू ३ नाकं.। ऋ. सं. १।१३९।४
व्यू १ षाश्व.। ऋ. सं. १।१५७।१
न्य १ न्यं चिक्यु.। ऋ. सं. १।१६४।३८
तन्वा ३ नामभि: स्वै:। ऋ. सं. १।१८२।४
युयोध्य १ स्मज.। ऋ. सं. १।१८९।१
न्य १ घ्न्यस्य.। ऋ. सं. १।३०।१९
अप्सव १ करा.। ऋ. सं. १।१०५।१

१ पा. सू. ८।२।४
२ ऋ. सं. १।१०८।६
३ पा. सू. ८।२।६

साधली जाते. तसेच प्रस्तुत प्रबंधाच्या 'तिङन्तस्वर' याबाबतीत प्रातिशाख्यात वर्णन आढळत नाही. याचबरोबर हेही स्पष्ट होते की, जरी प्रातिशाख्यकारांच्या उदात्तादिक स्वरविवेचनावरून काही पाणिनीय सूत्र बनविली आहेत, तरी स्वरसिदधी या विषयात व वैदिक व्याकरणाबाबत अष्टाध्यायीच सर्वोत्तम ठरते हे निश्चित.

तेव्हा पाणिनीय व्याकरणातील या वैशिष्ट्यपूर्ण स्वरविवेचनामुळे व्याकरणाची व्याख्या 'शब्दार्थव्युत्पत्तिकरं शास्त्रम्' अशी जी केली जाते, तिच्यात सुधारणा करून 'सस्वरशब्दार्थ व्युत्पत्तिकरं शास्त्रम्' असे म्हटले पाहिजे. कारण पाणिनीय व्याकरण न केवळ शब्दार्थाचीच व्युत्पत्ती सांगते, तर उदात्तादिक स्वरांची देखील, मग हे स्वर प्रातिपादकाचे असो, वा समासाचे वा तिङन्ताचे असोत, ते व्याकरणशास्त्राद्वारे सिद्ध करता येतात. त्यातही 'तिङन्त' जे संहितेत बहुत करून सर्वानुदात्त असते, त्यावर स्वरसिद्ध कसा करता येतो तेही प्रस्तुत प्रबंधात मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यातील प्रत्येक प्रकरणाचा सविस्तर आढावा घेऊ, ज्यामुळे ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिदधी विशेष करून 'तिङन्तस्वरसिद्धी' व्याकरणशास्त्राने करता येते हे सिद्ध होईल.

## उदात्तकांड

**धातुस्वर :-**

तिङन्तांचा स्वर ठरविताना ऋग्वेदीय प्रथम मंडलातून उदात्त तिङन्त प्रथमत: शोधून एकत्रित केली. तेव्हा असे लक्षात आले की, त्यातील काही तिङन्तावर धातूच्या ठिकाणी उदात्त हा मुख्य स्वर आढळला. त्यातून तिङन्तामध्ये 'धातुस्वर' सिद्ध करण्यासाठी प्रस्तुत प्रकरण निर्माण झाले. वास्तविक पाहता पूर्वी जेव्हा लौकिक व वैदिक अशा दोन्ही ठिकाणी सस्वर बोलणे चालत असे त्यावेळपासून धातुपाठांची जी रचना केली गेली ते धातू सुद्धा सस्वर पठन केले जात. त्यामुळे 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्'[१] वगैरे सूत्रे पाणिनीय व्याकरणात आढळतात. तेव्हा पहिला प्रश्न येथे निर्माण होतो की, जर धातुपाठातच धातू सस्वर पठित

---

१ पा. सू. ७।२।१०

आहेत, तर प्रयोगावस्थेत त्यांचे ते स्वर कायम राहतात का ? तर या शंकेचे समाधान प्रस्तुत प्रकरणात करण्याचा प्रयत्न केला आहे.

उपदेश अवस्थेत एखादा धातू अनुदात्त पठित असला तरी प्रयोगावस्थेत तो उदात्त होतो. अर्थात पाणिनीय प्रक्रियेनुसार जेव्हा धातूला पाणिनीय 'धातुसंज्ञा' प्राप्त होते, तेव्हा त्या धातूचा उपदेश काळी कोणताही स्वर असो त्याचा बाध करून 'धातोः'[१] या सूत्राने तो धातू अन्तोदात्त होतो. पण येथे $\sqrt{\text{कृ}}$ हा एकच धातू असल्यामुळे तो आद्युदात्त असल्यासारखा वाटतो. याशिवाय 'तनु विस्तारे' हा तनादिगण पठित धातू घेऊ. हा देखील उपदेशी अनुदात्त असून स्वरितेत आहे आणि म्हणूनच तर 'भू सत्तायाम्' हा धातू मात्र उपदेशी उदात्त आहे आणि म्हणूनच आर्धधातुक वलादि[२]- प्रत्यय 'थल्' लिट् प्रकारातील असताना इडागम होऊन 'बभूविथ' रूप सिद्ध होते. असो, यातून एक निष्कर्ष समोर येतो की, उपदेश काळी धातू उदात्त किंवा अनुदात्त असे दोन स्वरयुक्त असतात. स्वरित स्वर आढळत नाही. त्याचबरोबर उपदेश काळी धातू उदात्त असो वा अनुदात्त तो एकाच् असेल तर आद्युदात्त अथवा बव्हच् असेल तर अन्तोदात्त सिद्ध होईल.

अशा प्रकारे धातूवर उदात्त आहे अशी तिङन्ते ऋग्वेदीय प्रथम मंडलात एकूण २६९ आहेत, ज्यांचे परीक्षण प्रस्तुत प्रकरणात करण्यात आलेले आहे. ही तिङन्ते अभ्यासल्यावर असे लक्षात येते की, धातुस्वर तेव्हाच शेष राहतो, जेव्हा विकरण व प्रत्यय हे दोन्ही अनुदात्त किंवा प्रत्ययस्वराचा बाध होतो तेव्हा धातुस्वर आढळतो. यावरून धातुस्वराचे दोन प्रकार कल्पिले आहेत - १) पिदनुदात्त धातुस्वर, २) प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर. यांचे क्रमाने विवेचन करू.

---

१ पा. सू. ६।१।१६२

२ आर्धधातुकस्येड् वलादेः। पा. सू.७।२।३५

## १) पिदनुदात्त धातुस्वर :-

स्वर प्रक्रियेनुसार उपदेशी उदात्त वा अनुदात्तयुक्त धातू तिङन्त निर्मिती प्रक्रियेत उदात्त झाल्यानंतर त्याच्या पुढील लकाराच्या स्थानी होणारा तिङ् प्रत्यय जर पित् असेल व होणारे विकरणही पित् असेल तर पित्-प्रत्यय अनुदात्त होतात. यानुसार लकारस्थानी झालेला पित्प्रत्यय व पिद् विकरण दोन्ही अनुदात्त होऊन धातूचा जो उदात्त स्वर तो कायम राहील. त्यालाच येथे 'पिदनुदात्त धातुस्वर' असे म्हटले आहे.

ज्या तिङ्न्तामध्ये विकरण व प्रत्यय दोन्ही पित् आहेत, अशी ११४ उदाहरणे आहेत. ज्यांच्या अभ्यासातून पुढील निष्कर्षाप्रत पोहचता येऊ शकते.

येथे पुन्हा तिङन्ताची सार्वधातुक व आर्धधातुक लकारात विभागणी करू. यानुसार सार्वधातुक लकारात – लट्, लङ्, लोट्, विधिलिङ् या चार लकारांचा समावेश होतो. तर आर्धधातुक लकारात – लिट्, लुट्, लृट्, लिङ् (आशीर्लिङ्), लुङ् व लृङ् तर सार्वधातुक व आर्धधातुक असा द्विविध संज्ञक 'लेट्' लकार आहे. या लकारानुसार धातुस्वराचा विचार करू.

१. भ्वादिगणातील धातूंहून 'शप्' हे पित् विकरण होते, त्यामुळे पुढे पित् प्रत्यय असेल तर भ्वादिगणस्थ धातूंवर उदात्त कायम राहील.

२. लोट् लकारातील 'हि' प्रत्यय लोप पावलेल्या शबन्त भ्वादिगणस्थ धातूंवर उदात्त स्वर कायम राहील. उदा. पिबा, रक्षा, यच्छा, शिक्षा, भवा, तिष्ठ, गाय, यजा, योज, अव, बोध, रद, अज, रह.

३. विकरण व्यत्ययाने वेदात शबन्त पित् प्रत्ययान्त तिङन्तांवर धातुस्वर कायम राहील , व शपाचा विकल्पाने लोप झाला तरी.उदा.मत्सि, योत्सि, भर्ति, यंसि, यक्षि, धक्षि इ.

४. लङ् व लुङ् लकारात अडागमाचा अभाव असताना पित् प्रत्ययान्त तिङन्तामध्ये धातुस्वर शेष राहील.

उदा. १) लङ् लकार – तक्षत्, वर्क्, वेः, हनः इ.

२) लुङ् लकार – वधीः, धाः, मथीत्, भूत् इ.

५. लेट् लकारात प्रत्ययास अडागम वा आडागम झालेली पित् प्रत्ययान्त रूपे धातुस्वर युक्त राहतील. उदा. पताति, वहासि, बोधाति, भराति

६. लेट् लकारात विकल्पाने प्रत्ययाच्या इकाराचा लोप झालेला आहे अशा पित् प्रत्ययान्त तिङ्न्तामध्ये ही धातुस्वर कायम राहील. उदा. अवाः, श्रवत्, भुवत्, करत्. इ.

७. अदादिगणस्थ पित् प्रत्ययान्त तिङन्तांमध्ये धातुस्वर कायम राहील. उदा. असि, यासि, अस्ति, हंसि इ.

थोडक्यात, वरील सर्व निष्कर्षावरून असे सिद्‌ध होते की, एखाद्या धातूपुढे जर शप् विकरण व पित् प्रत्यय असेल तर तेथे धातुस्वर कायम राहील. तेव्हा तो धातुस्वर हा पित् प्रत्ययांच्या अनुदात्तामुळे असल्यामुळे त्यास 'पिदनुदात्त' धातुस्वर असे स्पष्ट संज्ञक नाव योग्य ठरेल.

**२) प्रत्ययस्वरबाधक – धातुस्वर :-**

पिदनुदात्त धातुस्वरामध्ये विकरण व प्रत्यय दोन्हींही पित् असल्याने अनुदात्त होतान व आपोआप धातुस्वर शेष राहतो. पण जेव्हा अपित् प्रत्यय येतात, तेव्हा धातुस्वर शेष राहणार नाही. तर त्या धातुस्वराचा बाध करून प्रत्ययस्वर शेष राहू लागेल. मग अशी स्थिती असताना धातुस्वर कसा सिद्‌ध करता येईल, अशी शंका उपस्थित होते. याचेच समाधान करून धातुस्वर सिद्‌ध करण्याचा प्रयत्न या प्रकरणात केलेला आहे.

अपित् प्रत्ययान्त तिङन्त ज्यामध्ये धातुस्वर शेष राहिला आहे, अशी ऋग्वेदीय प्रथम मंडळात १५५ तिङन्ते आढळून आलेली आहेत. त्यामुळे त्यांच्या धातुस्वराची सिद्‌धता पुढीलप्रमाणे करता येईल.

प्रत्ययस्वराचा बाध तेव्हा होऊ शकेल, जेव्हा धातू हा अदुपदेश, अनुदात्तेत्, व ङित् या तीन पैकी एका अटीची पूर्तता करणारा असतो. यावरून प्रत्ययस्वरबाधक धातुस्वराचे तीन उपप्रकार कल्पिले ते पुढीप्रमाणे – १) अदुपदेश धातू

२) अनुदात्तेत् धातू

३) ङित् धातू

**१) अदुपदेश प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर :-**

येथे 'अदुपदेश' म्हणजे काय हे थोडक्यात स्पष्ट करणे आवश्यक आहे. जे अकारान्त उपदेश आहेत असे धातू 'अदुपदेश' संज्ञक होतात. अकारान्त किंवा अदन्त असा अर्थ करताना अशी शंका निर्माण होते की, यात केवळ हलन्त धातूंचाचा समावेश होतो का ? तर याचे समाधानअसे की, पाणिनी महर्षींनी 'अदुपदेश' जे धातू अभिप्रेत आहेत ते केवळ हलन्त धातू नव्हे, तर अजन्त धातूंचाही यात समावेश आहे. पण मग अजन्त धातूंचा कसा समावेश करणार, कारण अदन्त रूप त्यांना दिसत नाही. याचे उत्तर असे की, जेव्हा धातूहून शप्, श, श्यन्, णिच् + शप् अशी विकरणे होऊन जे अदन्त अंग होते त्यास 'अदुपदेश' म्हटले आहे, त्यामुळे अदुपदेश धातूंची कक्षा फार विस्तारित होते. यानुसार भ्वादिगण, दिवादिगण, तुदादिगण व चुरादिगण अशा चार गणातील धातूंचा यात समावेश होईल.

आता प्रस्तुत प्रकरणात धातुस्वराची सिद्धता द्यावयाची असल्यामुळे तिङन्ताचे त्यादृष्टीने अध्ययन केले असता, पुढील निष्कर्ष समोर आले.

१. अपित् सार्वधातुक प्रत्यय पुढे असताना शबन्त भ्वावादिगणस्थ धातूंच्या तिङन्तांवर धातुस्वर कायम राहील. उदा. वनतम्, हवामहे, जयेम, गायन्ति, अर्चन्ति, इन्वतः, वहन्ति, पिबत, अजामहे, पिबतम्, गच्छथ, भवत, पतन्ति, अर्चाम, सीदन्तु, यजाम, बोधन्तु, यजते, गच्छतम्, भवतम्, रक्षन्ति, नयन्ति, नयथ, हवन्ते, वहन्तु, चरामसि, सचन्ते, पिन्वन्ति, नक्षन्ते, भरस्व, यच्छसे, सीदत, पर्षथ, श्चोतन्ति, भवन्ति, यजन्ति, भराम, अवन्तु, शिक्षत, भरे, जिन्वथः, अवथः, पिन्वथः, गच्छथः, पिन्वतम्, हवे,

वहथः, मन्दन्तु, हरते, गच्छन्ति, भरथः, स्वरन्ति, अर्चथः, भरन्ति, पश्यामसि, जिन्वन्ति, क्रीळन्ति, नक्षन्ति, वहते, अर्चामः, भरते, जयाव, वहेथे, तिष्ठतः, हवते, रक्षतम्, भजामहे, तिष्ठत, सचस्वा, पिन्वते.

ही अदुपदेश प्रत्ययस्वरबाधक धातुस्वरांची ७२ उदाहरणे ऋग्वेदीय प्रथम मंडलात आढळली. त्यात सर्वच उदाहरणे ही परस्मैपदी आहेत. काहीच उदाहरणे आत्मनेपदी आहेत. पण हे धातू अनुदात्तेत् नाहो. उदा. यजते, हवन्ते, सचन्ते, नक्षन्ते, भरे, वहते, भजामहे इ. ठिकाणी स्वरितेत् अहे तर 'हवन्ते' मध्ये धातू ञित् आहे म्हणून परस्मैपदाशिवाय आत्मनेपद होते. म्हणूनच यांचा समावेश 'अदुपदेश'मध्ये करण्यात आलेला आहे.

२. विकल्पे करून शबन्त धातूंपुढील लसार्वधातुक अपित् प्रत्यय अनुदात्त होऊन धातुस्वर शेष राहील. उदा. स्तवामः, मदेम, मदन्ति, यामः, मदथः, रास्व, स्तरते, भोजते, हनाम, सुवते, वशाम, नशते, चयते, मदत, भवन्ते, साधते, असाम.

३. विकल्पाने शपाचा लोप झाला तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्'[१] यानुसार प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वरच शेष राहील. उदा. होम, गन्ता, सक्ष्वा, कर्त, धामहे, श्रोत, यन्त, क्रन्त, मत्स्वा.

४. अडागमाभावी लङ् व लुङ लकारातील तिङन्तांवर प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर कायम राहील. उदा. लङ् = तक्षन्, सोदन्, सचन्त, क्षरन्, पश्यन्, करन्, भजन्त, भरन्त, लुङ् = धायि, तारिष्टम्.

५. लेट् लकारात अडागम वा आडागम झालेली तिङन्तामधील अपित् प्रत्यय अनुदात्त होतो, त्याच्या प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर शेष राहील. उदा. दृक्षसे, वदान्, श्रोषन्, पश्यान्, नम्नते, शेषन्, भुवन्, असन्.

---

१ पा. सू. १।१।६२

६. छान्दस धातू जे 'निघण्टु' मध्ये पठित आहेत, पाणिनीय धातुपाठात नाहीत, असेही धातू शबन्त अदुपदेश मानले जाऊन त्यांच्या अपित् लसार्वधातुक प्रत्ययाच्या प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर शेष राहतो. उदा. जरसे, हर्यथ.

अशा प्रकारे अदुपदेश प्रत्ययस्वरबाधक तिङन्तांची एकूण संख्या १२३ इतकी आहे, ज्यावरून सिद्ध होते की, अदुपदेश म्हणजे शबन्त, लुक् शबन्त, लेटातील अडागम वा आडागम युक्त धातूं पुढील प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर कायम राहतो.

**२) अनुदात्तेत् प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर :-**

'अनुदात्तेत्' म्हटलेले असल्यामुळे या प्रकारात आत्मनेपदी धातूंचा समावेश होतो. जे उपदेशी अदुपदेशी नाहीत, जसे 'वृधु वृद्धौ' हा धातू अदुपदेश नाही, पण अनुदात्तेत् आहे ; म्हणून यापुढील अपित् लसार्वधातुक प्रत्ययाच्या स्वराचा बाध होऊन धातुस्वर कायम राहील. अशी अनुदात्तेत् धातूंची ऋग्वेदीय तिङन्ते संकलित केली तेव्हा त्यांची संख्या २९ भरली. ज्यांच्यामध्ये धातुस्वर आढळून आला. त्यांच्या अध्ययनावरून पुढील निष्कर्ष समोर आले आहेत.

१. भ्वादिगणस्थ अनुदात्तेत् धातूंपुढील अपित् लसार्वधातुक प्रत्यय अनुदात्त होऊन तिङन्तावर धातुस्वर शेष राहतो. उदा. रोचन्ते, मंहते, बाधस्व, मन्दस्व, शिक्षते, बाधते, शोचस्य, रेजते, वन्दस्व, रोचते, मन्दसे, वेपेते, शुंभन्ते, बाधन्ते, भ्राजन्ते, मन्दामहे, गाहते, वन्दते, वर्तते, यतते, ईषते.

२. धातू अनुदात्तेत् असून विकल्पाने शबन्त झाला तर प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर शेष राहतो. उदा. मनामहे[१].

३. अदादिगणस्थ अनुदात्तेत् धातूंपुढील लसार्वधातुक प्रत्यय अनुदात्त होऊन धातुस्वर शेष राहतो. उदा. ईळते, आसते, ईरते, ईशिषे, ईट्टे, ईळे.

---

१ मनामहे मध्ये बहुलेकरुन शप् झाला अन्यथा 'श्यन्' झाला असता तर विकरणस्वर शेष राहिला असता.

४. लेट् लकारातील अडागम / आडागम युक्त ञपित् प्रत्ययान्त तिङन्तावर धातुस्वर शेष राहतो. उदा. वर्धान्.

३) **ङित् प्रत्ययस्वरबाधक धातुस्वर :-**

उपदेशी जे धातू ङित् आहेत, अशा धातूंपुढीलही लसार्वधातुक प्रत्ययाच्या स्वराचा बाध होऊन धातुस्वर शेष राहतो. वास्तविक पाहता ङित् धातू व प्रत्ययस्वर बाध यांचे क्षेत्र मोठे व्यापक आहे. पण ही दोन विशेषणे मानून 'धातुस्वरास' लावली तर त्यांचे क्षेत्र सीमित होते. धातुस्वर असलेली फक्त ३ उदाहरणे समोर आली. ईमहे, चष्टे, चक्षते. यावरून असे स्पष्ट होते -

१. शपाचा लोप झाला असेल व ङित् धातू असेल तर त्यापुढील अपित् लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होऊन धातुस्वर शेष राहील. उदा. ईमहे, चष्टे, चक्षते.

असा 'शप् लुगविकरण' म्हटल्यामुळे हा नियम व्यापक होऊन जेथे जेथे शपाचा लोप होऊन तो धातू ङित् असेल, त्याठिकाणी धातुस्वर सिद्ध होऊ शकेल. म्हणून 'अदादिगणाचा' उल्लेख टाळला आहे.

थोडक्यात, धातुस्वर या प्रकरणाचा सारांश असा सांगता येईल की, तिङन्तामध्ये जर धातुस्वर सिद्ध करावयाचा असेल वा तिङन्तामध्ये धातुस्वर केव्हा आढळतो, याचे समाधान पुढील नियमाद्वारे होऊ शकेल.

१. धातूहून होणारे विकरण व प्रत्यय पित् असताना.

२. धातूहून होणारे विकरण पित् व अपित् लसार्वधातुक प्रत्यय असता.

३. अदुपदेश, अनुदात्तेत् व ङित् धातू यांच्या पुढील शप् विकरण असून अपित् लसार्वधातुक प्रत्यय असता.

४. अदुपदेश, अनुदात्तेत् व ङित् धातूंपुढील शप् विकरण लुक् झाला तरी धातुस्वर कायम राहील.

# वैदिक प्रयोग

१. उपरोक्त नियमात विकल्पेकरून शप् विकरण वा लुक् झाला तरी वेदातही धातुस्वर आढळेल.

२. लेट् लकारात तर अडागम वा आडागम झालेल्या पित् वा अपित् प्रत्यय पुढे असला तरी धातुस्वर सिद्ध करता येईल.

अशा प्रकारे लौकिक वैदिक दोन्ही ठिकाणी प्रसंगानुसार धातुस्वर सिद्ध कसा करता येईल हे स्पष्ट होते.

## २) विकरणस्वर :-

धातुस्वरानंतर तिङन्तामध्ये आढळणारा पुढील स्वर म्हणजे 'विकरणस्वर'. वास्तविक पाहता पाणिनीय व्याकरणात 'विकरण' या शब्दाचा प्रत्यक्ष वापर नाही. पण उत्तरवर्ती आचार्यांनी शप् वगैरे प्रत्ययांसाठी विकरण शब्द वापरलेला आहे. याची चर्चा या प्रकरणाच्या प्रस्तावनेत विस्ताराने करण्यात आलेली आहे. त्यामुळे पुन्हा येथे द्विरूक्ती करीत नाही. थोडक्यात, उदात्त तिङन्ताचे अध्ययन करताना असे लक्षात आले की ऋग्वेदीय प्रथम मंडलात १२६ तिङन्तांमध्ये विकरण स्वर आहे. त्यानुसार त्याचे अधिक सूक्ष्मपणे अध्ययन करून तीन प्रकार कल्पिले.

अ) नित् विकरण स्वर

ब) चित् विकरण स्वर

क) सामान्य विकरण स्वर

## अ) नित् विकरण स्वर -

'नित्' विकरण हे दिवादिगणाचे आहे. त्यामुळे 'नित् विकरणस्वर' हा दिवादिगणाचा विशेष नियम आहे व स्वरदेखील. येथे नित् असल्यामुळे आद्युदात्त होतो व धातूवर उदात्त येतो. त्यामुळे ही तिङन्ते आद्युदात्त असतात. त्यामुळे धातुस्वर व नित् विकरणस्वर दोन्ही तिङन्ते आद्युदात्त दिसतात. मग ही दोन्ही तिङन्ते वेगवेगळी ओळखली कशी, अशी समस्या

निर्माण होते. तेव्हा 'श्यन्' हे विकरण येथे 'भेदलक्षण' ठरते. जर तिङन्तामध्ये 'श्यन्' विकरणाचा 'य' असून आद्युदात्त असेल, तर तेथे धातुस्वर नसून नित् विकरणस्वर आहे असे समजावे.

पण विकरस्वर हा प्रत्ययस्वरबाधक होत नाही, असे वार्तिक आहे, त्यामुळे धातुस्वर आहे, असे का म्हणू नये ?

याचे समाधान असे की, वार्तिकानुसार सतिशिष्टतेने विकरणस्वर प्रत्ययस्वराच्या मागाहून होत असल्यामुळे तो बलवान ठरून प्रत्ययस्वराचा बाध करू लागेल, पण तसे होऊ नये म्हणून वार्तिकाने विकरणस्वर प्रत्ययस्वरबाधक होऊ शकत नाही, असे स्पष्ट केले आहे. येथे मात्र प्रत्ययस्वराचा बाध विकरणस्वराकडून होतच नाही, कारण जेव्हा 'श्यन्' विकरण होते तेव्हा तो धातु अदुपदेश होऊन किंवा अनुदात्तेत् किंवा ङित् असेल तर प्रत्ययस्वर उदात्त राहत नाही, व त्याचा बाध होतो. त्यामुळे आपोआपच विकरणस्वर शेष राहतो, म्हणून धातुस्वर आहे म्हणणे योग्य ठरत नाही.

मग हा नियम केवळ दिवादिगणस्थ धातूंच्या बाबतीतच लागू होतो, असे म्हणावे का?

नाही. तर कारण जी जी विकरणे अदन्त होतात, त्या त्या विकरणांपुढील लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होईल. त्यामुळे विकरणस्वर शेष राहील केवळ शबन्त धातू वगळून. यानुसार दिवादिगण, चुरादिगण, तुदादिगण, ण्यजन्त प्रयोजक रूपे, नामधातुरूपे यांचा समावेश होईल.

मग तुदादिगणस्थ रूपे व इतर उपरोक्त तिङन्त रूपांमध्ये नित् विकरण स्वरच असेल का?

नाही. तर चुरादिगणस्थ तिङन्ते, ण्यन्त प्रयोजक तिङन्त व नामधातुसाधित तिङन्ते यांच्या ठिकाणी 'चित् विकरण स्वर' असेल व तुदादिगणस्थ तिङन्ते येथे 'सामान्यविकरण स्वर' असेल, जे पुढे या प्रकरणात स्पष्टपणे कसे सिद्ध केले ते सांगितले जाईल. तेव्हा येथे असे सिद्ध होईल -

१. दिवादिगणस्थ धातूहून लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होऊन 'श्यन्' विकरणाचा 'नित् विकरणस्वर' शेष राहील. उदा. सिध्यति, ईयते, जायते, पुष्यति, जायेमहि, मन्यसे, ईयसे, रीयते, पुष्यसि

२. लङ् लकारात अडागमाभावी नित् विकरण स्वरच शेष राहील. उदा. विध्यत्.

**ब) चित् विकरण स्वर :-**

नित् विकरणस्वराप्रमाणे हा देखील विशेष विकरणस्वर आहे. या स्वर प्रकारात अशी विकरणे एकत्रित केली आहेत, जी चित् म्हणजे चकार इत्संज्ञक आहेत अशी. यानुसार यामध्ये 'णिच् + शप्' , 'क्यच्' अशा दोन विकरण प्रत्ययांचा समावेश होईल. यापैकी 'णिच्+शप्' यांनी मिळून 'अय' असे विकरण तयार होते. यामध्ये 'अ' हा 'णिच्' मधील चित् स्वराने अन्तोदात्त व 'य' हा 'शप्' यातील पित्त्वामुळे अनुदात्त आहे. तेव्हा 'अय' हे विकरण आद्युदात्त होते व यामध्ये चित् स्वर आढळतो, म्हणून यास 'चित् विकरण स्वरात' अंतर्भूत केले. तेव्हा 'अय' विकरण हे चुरादिगणस्थ धातूंहून व प्रयोजक रूपांमध्ये होते, सार्वधातुकामध्ये. तेव्हा सार्वधातुक प्रकरणाचा विचार करून चित् विकरण स्वराचे तीन उपप्रकार कल्पिले आहेत- १) चुरादिगणस्थ तिङन्त रूपे २) ण्यन्त-प्रयोजक तिङन्त रूपे ३) क्यजन्त नामधातुसाधित तिङन्त रूपे

या तीन उपप्रकारात मिळून एकूण ४७ तिङन्ते ऋग्वेदीय प्रथम मंडळात आढळली. त्यांच्या अध्ययनातून पुढील नियम मांडता येतात -

१. चुरादिगणस्थ धातूंपुढील लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होऊन चित् विकरण स्वर शेष राहील. उदा. जंभय, स्तनयन्ति, मादयस्व, मादयध्वम्, मादयेथे, मर्चयति, चितयन्ते, पारय, जंभयतम्.

२. लङ् लकारात अडागमाभावी वरीलप्रमाणे चित् विकरणस्वर शेष राहील. उदा. बर्हयः, अर्दयत्.

३. प्रयोजक रूपांमध्ये लसार्वधातुक प्रत्यय असेल तर त्याच्या प्रत्यय स्वराचा बाध करून तेथे चित् विकरण स्वर शेष राहील. उदा. सादस, वर्तयथ, तर्पय इ.[१]

४. लेट् लकारातही जरी विकल्पेकरून 'अय (णिच् + शप्)' होऊन अडागम वा आडागम युक्त लसार्वधातुक प्रत्यय असेल, तर प्रत्ययस्वराचा बाध होऊन चित् विकरण स्वर शेष राहील. उदा. अर्थयासे, चोदयासि, मादयासे, पादयात्, छदयाथ

५. नामधातुसाधिक तिङन्तामध्ये 'क्यच्' हा चित् विकरण शेष राहून लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध होईल. उदा. वाजयामः, चनस्यतम्, नमस्यन्ति इ.[२]

**क) सामान्य विकरण स्वर :-**

नित् विकरण स्वर व चित् विकरण स्वर हे दोन्ही स्वर नकारेत् व चकारेत् असल्यामुळे विशेष स्वर प्रकारात समाविष्ट केले. पण याशिवाय इतरत्रही विकरण स्वर आढळून आला. ज्यामध्ये पूर्वोक्त चुरादिक उदाहरणे वगळून इतर उदाहरणे असून तेथे विकरण स्वर आढळतो. अशी ऋग्वेदीय प्रथम मंडळात ६७ उदाहरणे आढळून आली ज्यांच्या अभ्यासातून त्या तिङन्ताचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण करता येते – १) तुदादिगणस्थ धातूंची तिङन्ते २) कर्मणी धातूंची तिङन्त ३) कण्ड्वादिगणस्थ धातूंची तिङन्ते ४) अदन्त अंग रहित तिङन्ते.

वरीलपकी तीन उपप्रकारात अनुक्रमे 'श', 'यक्'[३] व 'कण्डवादिक यक्'[४] अशी विकरणे होतात. ही विकरणे लागल्यानंतर तिङन्त अदन्त अंग होतात, त्यामुळे ती अदुपदेश होऊन त्यांच्या पुढील लसार्वधातुक प्रत्यय अनुदात्त व विकरणस्वर शेष राहतो. यावरून पुढील नियम मांडता येतील –

---

१ अधिक उदाहरणांसाठी पहा. – विकरणस्वर, मूल्यमापन, पृ. क्र. १५०
२ अधिक उदाहरणांसाठी पहा. – विकरणस्वर, मूल्यमापन, पृ. क्र. १५०
३ सार्वधातुके यक्। पा. सू. ३।१।६७
४ कण्डवादिभ्यो यक्। पा. सू. ३।१।२७

१. तुदादिथणस्थ धातूंपुढील लसार्वधातुक प्रत्ययस्वराचा बाध करून विकरणस्वर शेष राहील. उदा. सृजामि, सृज, स्पृशन्ति इ.[१]

२. कर्मणी यक् विकरणस्वर कायम राहील. उदा. युज्यसे, वच्यन्ते, तुज्यते, वच्यते.

३. कण्ड्वादिगणस्थ धातूहून 'यक्' विकरणस्वर कायम राहून लसार्वधातुक प्रत्ययस्वर अनुदात्त होतो. उदा. इरज्यति, सपर्यति, दुवस्यन्ति इ.

४. अदन्त अंग नसलेल्या धातूंपुढील पित् लसार्वधातुक प्रत्ययामुळे विकरणस्वर आढळतो. यामध्ये स्वादिगण, रूधादिगण, तनादिगण, क्रयादिगण यांच्या विकरणांचा समावेश होईल.

उदा. १) **स्वादिगण** – हिनोति, शक्नवाम इ.

२) **रूधादिगण** – रूणधामहै इ.

३) **तनादिगण** – वनोषि, तनोति

४) **क्रयादिगण** – पृणाति, पुनाति इ.

५. लृट् लकारात होणारा 'स्य' प्रत्यय हा विकरणरूप होऊन त्यापुढील अपित् प्रत्यय अनुदात्त होतो विकरणस्वर शेष राहतो. उदउा. स्तविष्यामि, करिष्यथ, करिष्यति.

६. यङन्त तिङन्तामध्ये जर यङ्लुक् झाला नसेल, तर त्या पुढील लसार्वधातुक प्रत्यय अनुदात्त होऊन 'यङ्' विकरणस्वर राहील. उदा. वेविज्यते.

थोडक्यात, उपरोक्त विवेचनावरून असे स्पष्ट होते की, तिङन्तामध्ये विकरणस्वर देखील आढळू शकतो. विकरणस्वर शेष राहण्यासाठी ती विकरणे अदन्त असणे आवश्यक आहे. जर ती अदन्त असतील, तर तिङन्तामध्ये प्रत्ययस्वराचा बाध होऊन विकरणस्वर शेष राहील. यावरून लौकिक प्रयोग सस्वर सिद्ध करावयाचे झाल्यास पुढीलप्रमाणे तिङन्ते आढळतील.

---

१ अधिक उदाहरणांसाठी पहा. – विकरणस्वर, मूल्यमापन, पृ. क्र. १५०

१. दिवादिगण, तुदादिगण, चुरादिगण या तीन गणातील तिङन्त सार्वधातुकात विकरणस्वर युक्त असतील.

२. स्वादिगण, रूधादिगण, तनादिगण, क्र्यादिगण या गणातील तिङन्तांवर सार्वधातुकात केवळ पित् प्रत्यय असतानाच विकरणस्वर असेल.

३. प्रयोजक तिङन्त, कर्मणी रूपे, क्यजन्त, यङन्त तिङन्ते या सर्व ठिकाणी सार्वधातुकात विकरणस्वर आढळेल.

अशा प्रकारे ऋग्वेदीय प्रथम मंडळातील १२६ तिङन्तांवर विकरणस्वर सिद्ध होतो, शिवाय नित्, चित् विकरणस्वर असे नव्याने विकरणस्वरांचे अधिक सूक्ष्म विवेचन करण्याचाही येथे प्रत्यय केला आहे.

**३) प्रत्ययस्वर :-**

तिङन्ताची जी तीन अंगे असतात धातू, विकरण व प्रत्यय. यापैकी धातू व विकरण याठिकाणी उदात्त स्वराची सिद्धी मागील दोन प्रकरणात करून आता या प्रकरणात प्रत्ययस्वराची सिद्धता दिलेली आहे. आतापर्यंत मांडलेल्या प्रकरणामध्ये विवेचित स्वर हा पूर्ववर्ती स्वरापेक्षा बलवान आहे. त्यानुसार धातुस्वर – त्यापेक्षा विकरणस्वर व त्याहून अधिक बलवान प्रत्ययस्वर आहे. त्यामुळे प्रत्ययस्वराचे क्षेत्र इतर दोन स्वरांहून अधिक व्यापक आहे. वास्तविक पाहता शपादिकांना वार्तिकारांदिक पूर्ववैयाकरणाचार्यांनी 'विकरण' अशी संज्ञा प्रयोजिली म्हणून हा 'विकरणस्वर' वेगळा करता आला. अन्यथा पाणिनीय मतानुसार त्यांचाही समावेश प्रत्ययस्वरात झाला असता, असो. येथे मात्र केवळ प्रत्ययस्वर तिङन्तावर कधी आढळतो, कसा सिद्ध करता येईल याची चर्चा करू.

प्रत्ययस्वराने युक्त अशी १४२ तिङन्ते ऋग्वेदीय प्रथम मंडळात आढळली. त्या तिङन्ताच्या अभ्यासातून जर प्रत्ययस्वराने धातुस्वर किंवा विकरणस्वराचा बाध केला असेल तर तशी तिङन्ते वेगळी करून प्रत्ययस्वराचे प्रकार कल्पिले –

अ) धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर

ब) विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर

क) चित्प्रत्ययस्वर

**अ) धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर :-**

मागील प्रकरणांमध्ये धातुस्वर प्रत्ययस्वराचा बाध करीत असे, पण येथे मात्र प्रत्ययस्वर धातुस्वराचा बाध करणारा आहे. वास्तविक पाहता स्वरप्रक्रियेनुसार धातुस्वर झाल्यानंतर प्रत्ययस्वर होतो व तो सतिशिष्टस्वर बलवान ठरून धातुस्वराचा बाध करतो. अशा प्रकारे प्रत्ययस्वर शेष राहिलेली १२५ उदाहरणे सापडली आहेत. त्यांच्या अभ्यासावरून पुढील निष्कर्ष समोर येतात -

१. अदादिगणस्थ धातूंपुढील अपित् लसार्वधातुक प्रत्ययस्वरावर उदात्त कायम राहतो. उदा. उशन्ति, विद्याम, विद्या, विदुः, हत, याथन इ.[१]

२. अदादिगणस्थ धातूंना धातुपाठातील अदुपदेशत्व लागू पडत नाही, व प्रत्ययस्वर शेष राहतो. उदा. उशन्ति, विद्याम, हत.

३. लुग्विकरण झालेल्या तिङन्तामध्ये प्रत्ययस्वर कायम राहतो. उदा. श्रुधी, युक्ष्वा, कृष्वा, कृधी इ.[२]

४. विकरणस्वराचा लोप झालेल्या रूधादिगणस्थ धातूंपुढील अजादि लसार्वधातुक प्रत्यय, त्याचा स्वर कायम राहील. उदा. छिन्धि, वृञ्जे, इन्धते, पृणन्ति इ.[३]

५. अभ्यस्त धातूंपुढील अपित् लसार्वधातुक प्रत्यय उदात्त होतो. उदा. जुहूमसि, ररन्धि, पिपृतम्, शुशुग्धि, ववृधीथाः, दिधृत, युयोध.

६. लिङ् लकारातही धातू अदुपदेशादिक नसताना अपित् प्रत्यय उदात्त राहतो. उदा. वोचेयुः, मंसीमहि, दृशेयम्, ऋध्याम इ.[१]

---

१ अधिक उदाहरणांसाठी पहा. - प्रत्ययस्वर प्रकरण, मूल्यमापन, पृ. क्र. १८५

२ अधिक उदाहरणांसाठी पहा. - प्रत्ययस्वर प्रकरण, मूल्यमापन, पृ. क्र. १८५

३ अधिक उदाहरणांसाठी पहा. - प्रत्ययस्वर प्रकरण, मूल्यमापन, पृ. क्र. १८५

७. लिट् लकारातही लित् प्रत्ययस्वर वगळून इतर प्रत्ययस्वर कायम राहतात. उदा. शेपे, ईधे, ईयुः, आनृचुः, पस्पशे इ.[२]

थोडक्यात, अदादिगणस्थ धातूंपुढील अपित् लसार्वधातुक प्रत्ययस्वर कायम राहतो, तसेच लुग्विकरण झालेल्या धातूंपुढील अपित् प्रत्ययाचा स्वरही कायम राहतो. याशिवाय रूधादिगणस्थ धातूंपुढील अजादिलसार्वधातुक प्रत्ययस्वर हा देखील धातुस्वराचा बाध करून उदात्त होतो, कारण येथे विकरणस्वराचा लोप झालेला असतो. संक्षिप्ततः असे सांगता येईल की, जेव्हा जेव्हा विकरणाचा लोप होतो वा विकरणस्वराचा लोप होतो, तेव्हा प्रत्ययस्वर धातुस्वराचा बाध करून कायम राहील. अशा प्रकारे तिङन्तामधील धातुस्वर बाधक प्रत्ययस्वर सिद्ध करता येईल.

**ब) विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर :-**

प्रत्ययस्वरांचा हा अत्यंत महत्त्वाचा प्रकार मांडलेला आहे. सतिशिष्ट स्वर नियमाचा अपवाद वार्तिक-कारांनी सांगितला की, विकरणस्वर प्रत्ययस्वरापेक्षा बलवान होत नाहीत. अर्थात सतिशिष्टतेचा नियम विकरणस्वरास लागू होत नाही.

पण तुदादिगणस्थ वगैरे तिङन्तांमध्ये विकरणस्वर आढळतो त्याचाही या नियमाने बाध झाला पाहिजे, तो का होत नाही ?

वास्तविक पाहता विकरणस्वर प्रकरणात स्पष्ट केल्याप्रमाणे अदन्त अंग झाल्यामुळे तेथे विकरणस्वरापूर्वीच प्रत्ययस्वराचा बाध होतो. त्यामुळे शप्, श, श्यन्, यक्, क्यच् वगैरे विकरणान्त तिङतांबाबतीत हा नियम लागू होत नाही, तेथे विकरणस्वरच आढळतो.

मग कोणत्या विकरणस्वरास हा सतिशिष्टतेचा नियम लागू होत नाही. याचे समाधान असे की, स्वादिगण, रूधादिगण, तनादिगण व क्र्यादिगण यांच्या पुढे लसार्वधातुक प्रत्यय असताना अनुक्रमे 'श्नु', 'श्नम्', 'उ', 'श्ना' या विकरणाचा उदात्तस्वर त्याबाबतीत

---

१ अधिक उदाहरणांसाठी पहा. - प्रत्ययस्वर प्रकरण, मूल्यमापन, पृ. क्र. १८५
२ अधिक उदाहरणांसाठी पहा. - प्रत्ययस्वर प्रकरण, मूल्यमापन, पृ. क्र. १८५

सतिशिष्टतेचा नियम लागू होत नसून तेथे प्रत्ययस्वरच बलवान ठरतो. म्हणूनच 'विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर' हा उपरोक्त गणस्थ धातूंच्या बाबतीत आहे, असे समजावे. त्यामुळे शप्, श, श्यन् इ. विकरणांच्या ठिकाणी होणारी अतिव्याप्ती टळेल.

यावरून पुढीलप्रमाणे नियम करता येईल -

१. 'श्नु, श्नम्, उ, श्ना' या विकरणस्वरांचा बाध करून अपित् लसार्वधातुक प्रत्ययस्वर उदात्त होईल.

उदा. १) **स्वादिगण** - शृणुतम्, शृणुष्व, शृणुहि

२) **तनादिगण** - तन्वन्ति, वनुयाम

३) **क्र्यादिगण** - पृणीत, गृणीषे

**क) चित् प्रत्ययस्वर :**

चित् प्रत्ययस्वर हा येथे केवळ तिङन्तांपर्यंत मर्यादित आहे. तसेच आर्धधातुकात लिट् प्रकारात आत्मनेपदी 'इरेच्' असा चित् प्रत्यय होतो व चित् प्रत्यय अन्तोदात्त होतो[१] व ज्या धातूहून होतो तो तिङन्तही अन्तोदात्त होते. म्हणून 'चित् प्रत्ययस्वर' स्वतंत्रपणे मांडला आहे. यावरून बहुवचनास चित् प्रत्ययस्वर राहील. उदा. शृण्विरे, दधिरे, चक्रिरे, येमिरे, बुभुज्रिरे, सश्चिरे.

यानंतर अशी शंका उपस्थित होऊ शकते की, जर लिट् लकारातील 'इरेच्' प्रत्ययासाठी चित् प्रत्ययस्वर वेगळा केला तर 'णल्', 'थल्' प्रत्ययांचा लित् प्रत्यय स्वर का घेतला नाही?

याचे समाधान असे की, 'णल्, थल्' या प्रत्ययांमध्ये 'आद्युदात्तश्च'[२] ने प्राप्त उदात्त स्वराचा बाध होऊन 'लित् प्रत्ययस्वर' होत असला, तरी हा लित् असल्यामुळे त्याचा उपान्त्यस्वर उदात्त होतो.[३] 'णल्' व 'थल्' प्रत्ययांचे उपान्त्य पद हे अभ्यस्ताचे अन्त्यपद असते. त्यामुळे अभ्यस्ताचे अन्त्यपद उदात्त होते. म्हणून या दोन प्रत्ययस्वरांना 'लित्

---

१ चितः। पा. सू. ६।१।१६३
२ पा. सू. ३।१।३
३ लिति। पा. सू. ६।१।१९३

प्रत्ययस्वरात' समाविष्ट न करता पुढे विवेचन केलेल्या 'अभ्यस्तस्वर' या स्वतंत्र प्रकरणात स्थान दिले आहे.

अशा प्रकारे १४२ तिङन्ताचा अभ्यास करून त्यांचा प्रत्ययस्वर सिद्ध करण्याचा येथे प्रयत्न केला आहे. याचबरोबर हा प्रत्ययस्वर सिद्ध करताना 'धातुस्वरबाधक प्रत्ययस्वर', 'विकरणस्वरबाधक प्रत्ययस्वर' व 'चित्प्रत्ययस्वर' असे तीन नवीन प्रत्ययस्वराचे प्रकार प्रकाशात आणण्याचा प्रयत्न केला गेला आहे. तसेच लौकिक व वैदिक प्रयोग सस्वर सिद्ध करताना तिङन्तांवर प्रत्ययस्वर कोणकोणत्या स्थितीत आढळू शकेल याविषयीचे मार्गदर्शन या प्रकरणाद्वारे निश्चितच होईल, असे वाटते. सार्वधातुकात व आर्धधातुकात अशा दोन्ही ठिकाणी हा प्रत्ययस्वर तिङन्त प्रकरणात आढळून येईल.

**४) आगमस्वर :-**

पूर्वोक्त तीनही स्वरांपेक्षा अधिक बलवान असा हा 'आगम' स्वर आहे. एखाद्या तिङन्तावर धातुस्वर, विकरणस्वर वा प्रत्ययस्वर शेष राहत असो, त्यांचा बाध करून आगमस्वर शेष राहतो. तसेच पुढे सांगितला जाणारा अभ्यस्तस्वर त्याचा बाधक हा आगम स्वर ठरतो. या आगमस्वराचे क्षेत्र हे लुङ्, लङ् व लृङ् या तीन लकारांपर्यंत मर्यादित आहे. या तीन लकारात धातूहून होणारा उदात्त अडागम किंवा अजादिधातूहून होणारा आडागम येथील 'आगमस्वर' म्हणून स्वतंत्रपणे मांडला आहे.

या आगमस्वराचे इतके महत्त्व असतानाही त्याची स्वतंत्र मांडणी केलेली आढळत नाही. किंबहुना आगमस्वराचे प्रतिपादक 'लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्त'[१] व 'आडजादीनाम्'[२] या सूत्रांचा समावेश स्वर प्रकरणात देखील केलेला नाही. म्हणूनच येथे आगमस्वरास प्रतिष्ठित करण्यासाठी स्वतंत्र प्रकरण करून त्याची व्यवस्थित मांडणी करण्याचा प्रयत्न केला आहे.

---

१ पा. सू. ६।४।७१
२ पा. सू. ६।४।७२

ऋग्वेदीय प्रथम मंडळात अडागमस्वर असलेली एकूण १५२ उदाहरणे आढळली, तर आडागमस्वर असलेली १७ तिङन्ते आहेत. एकूण आगमस्वराची १६९ उदाहरणे आहेत, असे सांगता येईल. आगमस्वराचे यावरूनच दोन प्रकार कल्पिले –

१) अडागमस्वर

२) आडागमस्वर

स्वरप्रक्रियेनुसासर धातुस्वर, त्यानंतर प्रत्यय व प्रत्ययस्वरानंतर विकरण व विकरणस्वर असा क्रम झाल्यानंतर आगमस्वर होत असल्यामुळे तो सतिशिष्ट राहतो, व शेष सर्वांचा निघातस्वर म्हणजे अनुदात्त होतो. यावरून असा निष्कर्ष निघतो –

१. लुङ् लङ् व लृङ् लकारात तिङन्तावर आगमस्वर शेष राहतो. उदा. अभजन्त, अविन्दः, अस्पष्ट, अयुयुत्सन्, आसीत्, आक्षिषुः, ऐरयेथाम्, ऐतन इ.

याचबरोबरच आगमस्वराचे वर्गीकरण त्याने बाध केलेल्या स्वरावरूनही करता येईल, त्यानुसार पुढील प्रकार पडतील –

१) धातुस्वरबाधक आगमस्वर

२) विकरणस्वरबाधक आगमस्वर

३) प्रत्ययस्वरबाधक आगमस्वर

४) अभ्यस्तस्वरबाधक आगमस्वर

थोडक्यात, यावरून असे सिद्‌ध होईल की, कोणत्याही गणातील धातू असो जर लुङ्, लङ्, लृङ् लकार असेल व आगम चा लोप झाला नसेल तर तिङन्तावर आगमस्वर आढळेल.

येथे 'आगमाचा लोप झाला नसेल तर' असे का म्हटले ?

याचे समाधान असे की, लौकिक प्रयोगात 'माङ्' याचा प्रयोग असताना अडागमाचा लोप सांगितला आहे[१], तेव्हा तिङन्तावर आगमस्वर आढळणार नाही, तर त्याने ज्या स्वराचा बाध केला होता, तो स्वर कायम होईल. उदा. 'भूत्'[२]

येथे 'अभूत्' अशा रूपातील आगमाचा लोप झाल्यमुळे पित् प्रत्ययामुळे धातुस्वर शेष राहतो. म्हणून आगमाचा लोप झाला नसेल तरच आगमस्वर आढळेल. वैदिक प्रयोगात अनेक ठिकाणी आगमचा लोप झालेला आढळतो. तेथे हा नियम लागू होणार नाही. पण जेव्हा जेव्हा आगम असेल, तेव्हा तोच आढळून येईल.

५) **अभ्यस्तस्वर :-**

धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर व आगमस्वर असे ४ स्वरप्रकार सांगून झाल्यानंतर ऋग्वेदीय प्रथम मंडळात अशी उदाहरणे आढळली ज्यामध्ये पूर्वोक्त कोणताच स्वर नाही. धातूला दित्व झालेले असून त्याच्या अनुषंगाने स्वर झालेला आढळला. आता धातूला द्वित्व श्लु[३], लिट्[४], चङ्[५], सन्[६], यङ्[७] यांच्या निमित्ताने विहित आहे. तसेच वेदामध्ये द्वित्व बहुलेकरून विकल्पाने होते[८]. या द्वित्व विशिष्ट समुदायास अभ्यस्त संज्ञा होते[९]. येथे अभ्यस्तस्वर उदात्त आढळून येतो, अशी ४६ तिङन्ते आढळून आली आहेत. त्यांचे सूक्ष्म परीक्षण करून त्याद्वारे अभ्यस्तस्वराचे प्रकार कल्पिले –

अ) अभ्यस्तादिस्वर

ब) लित् स्वर

---

१ न माङ्योगे। पा. सू. ६।४।७४
२ पहा. – धातुस्वर प्रकरण, पृ. क्र. ८८
३ श्लौ। पा. सू. ६।१।१०
४ लिटि धातोरनभ्यासस्य। पा. सू. ६।१।८
५ चङि। पा. सू. ६।१।११
६ सन्यङो। पा. सू. ६।१।९
७ सन्यङो। पा. सू. ६।१।९
८ छन्दसि वेति वक्तव्यम्। पा. सू. ६।१।१ वा. १
९ उभे अभ्यस्तम्। पा. सू. ६।१।५

## अ) अभ्यस्तादिस्वर :-

अभ्यस्त संज्ञकांचा आदिस्वर उदात्त आढळतो, तेव्हा त्या स्वराने प्रत्ययस्वराचा बाध केलेला असतो. मग अभ्यस्तादिस्वर कधी आढळतो ?

अभ्यस्तादिस्वर हा जर लसार्वधातुक अजादि प्रत्यय असेल तर आणि लसार्वधातुक हलादि-पित् असेल तर आढळेल.

येथे समाधान असे की, हलादि तिप् प्रत्यय हा अनुदात्त म्हणजे उदात्त नसलेला असा असतो. त्यामुळे तो असताना अभ्यस्ताचा आदिस्वर उदात्त होईल. पित् म्हटले नसते, तर इतरही प्रत्ययांच्या ठिकाणी अतिव्याप्ती झाली असती व त्यांच्या उदात्ताचा बाध होऊ लागला असता.

मग हलादि-अपित् प्रत्यय असेल तर अभ्यस्ताचा आदिस्वर उदात्त होत नाही का ?

होय. जर हलादि-अपित् प्रत्यय असेल तर अभ्यस्ताचा आदिस्वर उदात्त न होता, प्रत्ययस्वर शेष राहतो.

मग 'अजादि प्रत्यय' असताना आदिस्वर उदात्त होतो, तेथे पित्-अपित् निर्देश का नाही?

तेथे पित्-अपित् प्रत्ययांचा निर्देश केला नाही; कारण तेथे 'अजादि लसार्वधातुक' एवढेच पद महत्त्वाचे आहे. जर असा प्रत्यय असेल तर अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल.

यावरून पुढीलप्रमाणे नियम मांडता येईल.

१. अजादि लसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल. उदा. दधीत, जिहीत, पिप्रति, दधन्, दहश्रे, दधति, जंगहे, विवासान्.

२. हलादि पित्-लसार्वधातुक प्रत्यय अर्थात अनुदात्त लसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल. उदा. ददाति, पिपर्ति, चिकेतति, इयर्ति, सिषक्ति इ.

३. लङ् लकारात अडागमाभावी अजादि लसार्वधातुक प्रत्यय असता अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल. उदा. दधन्.

४. वेदामध्ये सार्वधातुक-आर्धधातुक उभय संज्ञेमुळे लिट् लकारातील अजादि प्रत्ययही सार्वधातुक मानून अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल. उदा. ददृश्रे, ददृशे, जंगहे.

५. वेदामध्ये बहुलेकरून 'श्लु' झाला तरी व लेट् लकारातही अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल. उदा. लेट = विवासान्, चिकेतति, दादशत, चिकेतसि, ददाशति, श्लु = सिषक्ति.

६. यङ् लुगन्तामध्ये अभ्यस्तादिस्वर आढळून येईल. उदा. वर्वर्ति, चर्कृषत्.

**ब) लित् स्वर :-**

लित् स्वर हा केवळ लिट् लकारातील 'णल्, थल्' या प्रत्ययांच्या लित् स्वरासाठी स्वतंत्रपणे करण्यात आलेला आहे. अभ्यस्त स्वरामध्ये का समाविष्ट केला ?

लित् स्वराचा अभ्यस्तस्वरामध्ये समावेश केला ; कारण लित् स्वराने प्रत्ययापूर्वीचा स्वर उदात्त होतो व तो येथे अभ्यस्ताचा अंत असतो. त्यामुळे या लित्स्वराने अभ्यस्ताचा अंत उदात्त होतो हे सिद्ध करण्यासाठी लित् प्रत्ययस्वर म्हणून न घेता अभ्यस्तस्वर प्रकरणात घेतले आहे. अशी लित्स्वराची वेदामध्ये २२ तिङन्ते आढळली, त्यावरून असा नियम करता येईल.

१. लिट् प्रकार लित् प्रत्ययान्त तिङन्त असताना अभ्यस्ताचा अंत उदात्त होईल. उदा. चकार, ददाश, दीदेथ, ततक्ष इ.

थोडक्यात, अभ्यस्तस्वर या प्रकरणामध्ये ऋग्वेदीय प्रथम मंडळातील ४६ तिङन्ताची स्वरसिद्धी करण्यात आलेली असून त्याच्याबरोबर 'अभ्यस्तस्वर' हा नव्याने मांडण्याचा प्रयत्न केला आहे. ज्यामुळे स्वरसिद्धी प्रक्रिया अधिक सुस्पष्ट होईल व अजादिलसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्त संज्ञक धातूंचा अभ्यस्तादिस्वर उदात्त सिद्ध करता येईल. तसेच

हलादि पित प्रत्यय असताना देखील. तसेच लिट् लकारातील लित् स्वराने अभ्यस्तान्त उदात्त होऊन हा नवीन स्वर देखील वेगळा दाखवून स्वरसिद्धी अधिक समृद्ध सर्वव्यापक होईल.

६) **गतिनिघातस्वर :-**

धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर, आगमस्वर, अभ्यस्तस्वर या पूर्वोक्त पाच प्रकरणांपर्यंत जी जी तिङन्ते अभ्यासली, ती सर्व तिङन्ते ही सोपसर्ग नव्हती. अर्थात उपसर्गरहित होती. या प्रकरणात तिङन्त जर सोपसर्ग असेल तर त्याच्या स्वराची व्यवस्था काय? किंबहुना उपसर्गांमुळे जसा धातूच्या अर्थामध्ये बदल घडून येतो, तसा स्वरावरही परिणाम होतो का, अशा प्रश्नांचा विचार करण्यासाठी व त्यांनी स्वरसिद्धी करावी यासाठी हे स्वतंत्र प्रकरण आंरभिले.

उपसर्गांनाच क्रियेशी योग असताना 'गति' संज्ञा दिलेली आहे. उपसर्गांच्या स्वरासाठी फिट् सूत्रांचा आधार घ्यावा लागतो. फिट् सूत्रांनुसार 'अभि' उपसर्ग वगळता इतर उपसर्ग आद्युदात्त असतात. म्हणजेच गतिसंज्ञक आद्युदात्त होतात व त्यापुढील तिङन्त तेही उदात्त असेल, तर कोणाच्या स्वराचा बाध होईल की समास समजून 'समासस्य' या सामान्यसूत्राने अन्तोदात्त होईल.

गति तत्पुरुष समास होत नाही, त्यामुळे 'समासस्य' या सूत्राने सगतितिङन्त अन्तोदात्त होत नाही. तर मग उदात्त तिङन्त पुढे असेल तर, गतिनिघातस्वर होऊन तिङन्ताचे प्रकृतिस्वरत्व कायम राहील अशी १०६ उदाहरणे ऋग्वेदीय प्रथम मंडळात आढळली आहेत. त्यातून पुढील निष्कर्ष निघतात -

१. उदात्त तिङन्त पुढे असता गतिसंज्ञक सर्वानुदात्त होईल, व तिङन्ताचा प्रकृतिस्वर कायम राहील. उदा. अध्यासते, उपजायते, प्रमिनन्ति, पर्यतिष्ठत्, आविवासति,

थोडक्यात, असे स्पष्ट होते की, जर तिङन्तावर उदात्त स्वर असेल, तर गतिसंज्ञक सर्वानुदात्त होतील.

पण, तिङन्त सर्वानुदात्त असेल तर काय व्यवस्था ?

तिङन्त सर्वानुदात्त असेल, तर गतिसंज्ञकाचा स्वर कायम राहील व पदपाठामध्येही अशी उदाहरणे स्वतंत्र दर्शविली जातात. उदा.

"आगहि दिवो."[१] - संहिता पाठ.

आ। गहि। दिवः।. - पदपाठ।

येथे 'गहि' तिङन्त सर्वानुदात्त आहे, तर 'आ' उपसर्गाचा उदात्त कायम राहिला असून पदपाठात पदे स्वतंत्र दर्शविली आहेत.

तर याउलट तिङन्तावर उदात्त असताना गतिनिघातस्वर युक्त तिङन्त अवग्रहाने वेगळे करून एकत्र दाखविले जाते.

उदा. "प्रतिहर्यथ नरो विश्वेद्.।"[२] - संहितापाठ

प्रतिऽहर्यथ। नरः। विश्वा। इत्। - पदपाठ

यावरून असे सिद्ध होते की, उदात्त-तिङन्त असताना उपसर्गांवर - गतिसंज्ञकांवर सर्वानुदात्त स्वर येईल व तिङन्तस्वर कायम राहील. त्यामुळे गतिनिघातस्वराचे पुढीलप्रनाणे उपप्रकार कल्पिले जाऊ शकतात.

१) धातुस्वरपूर्वक गतिनिघातस्वर

२) विकरणस्वरपूर्वक गतिनिघातस्वर

३) प्रत्ययस्वरपूर्वक गतिनिघातस्वर

४) आगमस्वरपूर्वक गतिनिघातस्वर

५) अभ्यस्तस्वरपूर्वक गतिनिघातस्वर

उपरोक्त प्रकारांच्या उदाहरणांसह चर्चा गतिनिघातस्वर प्रकरणात केलेली आहे.[३]

---

१ ऋ. सं. १।६।९

२ ऋ. सं. १।४०।६

३ उदाहरणांसाठी पहा. - गतिनिघातस्वर प्रकरण, मूल्यमापन, पृ. क्र.२५७

## ७) संकीर्ण स्वर :-

उदात्तकांडातील हे अखेरचे प्रकरण. या प्रकरणामध्ये आतापर्यंतच्या सर्व सहा प्रकरणांमध्ये सिद्ध न होऊ शकणाऱ्या तिङन्ताची स्वरसिद्धी करण्यासाठी त्यांना एकत्रित केलेले आहे. अशी २१ उदाहरणे येथे आढळली आहेत की, ज्यामध्ये पूर्वोक्त प्रकरणातील कोणत्या ना कोणत्या तरी स्वराचा बाध होऊन वेगळाच स्वर उदात्त झालेला आढळतो. अर्थात एखाद्या ठिकाणी जर धातुस्वर उदात्त होणार असेल, किंवा विकरणस्वर उदात्त होणार असेल तर तो न होता दुसराच स्वरावर उदात्त आढळून येतो. अशा प्रकारे स्वरातील फेरफारस 'स्वरव्यत्यय' असे म्हटले जाते. मग कोणी शंका घेऊ शकेल की, मग प्रकरणास 'स्वरव्यत्यय' असेच शीर्षक समर्पक ठरले नसते का ?

या शंकेचे समाधान असे की, जर प्रकरणास 'स्वरव्यत्यय' असे शीर्षक केले असते, तर त्यामध्ये इतर प्रकारचे व्यत्यय वा स्वरप्रक्रियेच्या दृष्टीने काही विशेष मांडता आले नसते व केवळ एक वा दोन तिङन्तांसाठी स्वतंत्र प्रकरण करावे लागले असते. म्हणून 'संकीर्ण स्वर' असे नामनिर्देश केल्यामुळे उपरोक्त अव्याप्ती दोषाचे निवारण होते व स्वरप्रक्रियेच्या दृष्टीने थोडी वेगळी असलेली वा नवीन स्वर जो आतापर्यंत सांगितला नाही तो सांगण्यासाठी या प्रकरणात त्याचा समावेश करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

संकीर्ण स्वर प्रकरणामध्ये "पीपरत्, जीजनन्त, मुच्यते, हूयते, क्षीयन्ते, पच्यते, उप्यते, जुहोत, शिशीते, रारणत्, चाकनः, तस्तंभत् ततनन्, ततनन्त, ततनाम, शूशवाम, उपागहि, संगृभीता, वितन्वते, पप्रथत्, प्रणक्" या २१ तिङन्तांच्या स्वरसिद्धीचा परामर्श करण्यात आलेला आहे.

वरील पैकी पीपरत् ते शूशवाम, संगृभीता अशा १८ तिङन्तांवर स्वरव्यत्यय आलेला आहे व 'वितन्वते' व 'पप्रथत्' व प्रणक् या ठिकाणी स्वरप्रक्रियेच्या दृष्टीने वैशिष्ट्य आहे. त्यात देखील 'वितन्वते' हे तिङन्त सोपसर्ग असून याचा समास झालेला आहे. आता येथे शंका येईल की, उपसर्गाचा तिङन्ताशी समास कसा झाला?

याचे समाधान असे की, उपसर्गांना क्रियेशी योग असताना गतिसंज्ञा सांगितली आहे. म्हणून या गतिसंज्ञकाशी समर्थ तिङन्त पदाशी समास झालेला आहे.

पण, गति वगैरेचा सुबन्तांशी समास होतो, मग तिङन्ताशी कसा झाला मानावा ?

सूत्रकारांनी 'समर्थः पदविधिः'[१] असे म्हटले आहे. तर याची व्याख्या ''पदसम्बन्धी यो विधिः सः समर्थाश्रितो बोध्यः''[२] अशी करतात व पद ही संज्ञा सुबन्त व तिङन्त अशी दोहोंना आहे[३]. तेव्हा 'सह सुपा'[४] या सूत्रातील 'सह' विभाग करून तिङन्ताचा सामर्थ्याने गतिसंज्ञाकाशी समास होईल.

आणि येथे अशा समास सिद्ध झाल्यामुळे 'वितन्वते' हे 'समासस्य'[५] याने अन्तोदात्त होतो असा हा स्वतंत्र 'तिङन्त समास स्वर' येथे सांगितला आहे. केवळ एकमेव उदाहरण ऋग्वेदीय प्रथम मंडळात आढळल्याने 'तिङन्तसमासस्वर' असे स्वतंत्र प्रकरण केले नाही. परंतु, यापुढे संशोधकांना, अभ्यासकांना, जिज्ञासू व विद्यार्थ्यांना निश्चित अध्ययन करताना स्वतंत्रपणे उदाहरणे संकलित करून हा 'तिङन्त समासस्वर' मांडता येईल की, जो येथे एका उदाहरणाद्वारे स्वरसिद्ध केलेला आहे.

यानंतर 'पप्रथत्' या ठिकाणी 'पृथुं करोति, विस्तारितं करोति इति', या अर्थी 'शब्द वैरकलहाभ्रकण्वमेघेभ्यः करणे'[६] या सूत्रातील शब्दादिगणातील 'तत्करोति तदाचष्टे इति णिच्' या गणसूत्राने येथे 'पृथु' प्रातिपदिकाहून 'णिच्' प्रत्यय होऊन 'प्रथि' या नामधातूचे लुङ्-चङन्त रूप येथे स्वतंत्र मांडून चङन्ताचा पूर्वस्वर उदात्त होतो व तो अभ्यस्ताचा अंत उदात्त होईल हे सिद्ध करून अभ्यस्त प्रकरणात 'अभ्यस्तान्त' स्वर या प्रकाराचा समावेश करण्यासाठी स्वतंत्र सिद्ध केला आहे.

---

१ पा. सू. २।१।१
२ पहा. - वै. सि. कौ. भ. दी. वृत्ती; ल. सि. कौ. वृत्ती
३ सुप्तिङन्तं पदम्। पा. सू.१।४।१४
४ पा. सू. २।१।२४
५ पा. सू. ६।१।२२३
६ पा. सू. ३।१।१७

तर 'प्रणक्' हे तिङन्त लङ् लकारान्त असून याच्यामध्ये आगम व्यत्यय आलेला आहे. आगम धातूच्या आरंभी न होतो, धातूच्या प्रथम वर्णानंतर व विकरणापूर्वी झालेला आहे. म्हणून यास 'आगमस्वर' या प्रकरणात स्थान न देता स्वतंत्र ठेवले. ज्यामुळे असे सिद्ध करता येते की, वेदामध्ये लुङ्, लङ् व लृङ् लकारात होणारे आगम व्यत्ययाने होतात.

पीपरत् ते संगृभीता या १८ तिङन्तामध्ये स्वरव्यत्यय आलेला आहे. ह्या स्वरव्यत्ययाचेही येथे प्रकार कल्पिले आहेत. ते पुढीलप्रमाणे -

| | | | |
|---|---|---|---|
| १. | धातुस्वरबाधक | - | पीपरत्, जीजनन्त |
| २. | विकरणस्वरबाधक | - | मुच्यते, हूयते, क्षीयन्ते, पच्यते, उप्यते |
| ३. | प्रत्ययस्वरबाधक | - | जुहोत, शिशीते |
| ४. | अभ्यस्तादिस्वरबाधक | - | रारणत्, चाकनः, तस्तंभत्, ततनन्, ततनाम, शूशवाम |
| ५. | गतिनिघातस्वरबाधक | - | उपागहि, संगृभीता |

अशा प्रकारे यांचा स्वरव्यत्यय मांडून त्यांची स्वरसिद्धी करण्याचा प्रयत्न केला व त्यांना पूर्वोक्त स्वरांमध्ये प्रतिष्ठित केले आहे. ते पुढीलप्रमाणे -

**१) धातुस्वर प्रकरण**

१) विकरणस्वरबाधक धातुस्वर - मुच्यते, हूयते, क्षीयन्ते, पच्यते, उप्यते.

**२) अभ्यस्तस्वर प्रकरण**

१) अभ्यस्तादिस्वर - पीपरत्, जीजनन्त, शिशीते

२) अभ्यस्तान्तस्वर - पप्रथत्, जुहोत, रारणत्, चाकनः, तस्तंथत्, ततनन्, ततनाम, शूशवाम

स्वरसिद्धीच्या दृष्टीने नवीन स्वर देखील कल्पिले आहेत.

**१) गतिस्वर प्रकरण**

१) गति-प्रकृतिस्वर - संगृभीता

२) पूर्वगतिनिघातस्वर - उपागहि

२) **तिङन्त समास स्वर** - वितन्वते

याशिवाय 'आगमव्यत्यय' असे प्रक्रियेच्या व्यत्ययाचे स्वतंत्र निर्देश केला आहे. उदा. प्रणक्.

थोडक्यात, या संकीर्ण स्वर प्रकारात स्वरव्यत्यय सांगून म्हणजे कोणत्या स्वराचा व्यत्यय आला व तो स्वर कसा सिद्ध करता येईल, याची सविस्तर चर्चा करून 'विकरणस्वरबाधक धातुस्वर' व 'अभ्यस्तान्तस्वर' हे दोन स्वरसिद्ध करताना स्वरव्यत्यय मानण्याऐवजी पाणिनीय सूत्रातील कमतरता लक्षात घेऊन त्यास पुरक अशी नवीन दोन स्वकल्पित वार्तिके रचिली आहेत. ज्यांच्या सहाय्याने पाणिनीय सूत्रांनी दुर्लक्षित राहिलेले प्रयोग स्वरसिद्ध करता येतील. प्रथम मंडलातील उदाहरणे तर आम्ही सिद्ध करून दाखविलेली आहेतच ; पण इतर मंडळात जर अशी उदाहरणे आढळली तर वैयाकरांनी किंवा संशोधक, अभ्यासकांनी तेथे स्वर-व्यत्यय मानण्याऐवजी **''यकि हलश्च छन्दसीति वक्तव्यम्''** या नववार्तिकाने विकरणस्वरबाधक धातुस्वर सिद्ध करता येईल व **''छान्दसाभ्यस्तानाम् अपिति च वेति वक्तव्यम्''** या नववार्तिकाने अभ्यस्तादिस्वराचा बाध करून होणारा अभ्यस्तान्तस्वर किंवा प्रत्ययपूर्ववर्तिस्वर सिद्ध होऊ शकेल.

अशा प्रकारे जर या प्रकरणातील वार्तिक वैयाकरण जगतात मान्यता पावली तर निश्चितपणे अनेक पुढील प्रयोग सिद्ध होऊ शकतील. तसेच वैयाकरणांची लक्ष्यैकचक्षुष्कता सिद्ध होऊ शकेल.

सारांश असा की, धातुस्वराला प्रारंभ करून संकीर्ण स्वर येथपर्यंत एकूण सात प्रकरणे रचून उदात्तकांड पूर्ण करण्यात आलेले आहे. या उदात्तकांडातील (७) सात प्रकरणांमध्ये मिळून एकूण ८७९ उदात्त तिङन्ताची स्वरसिद्धी देण्याचा प्रयत्न केला आहे. प्रकरणपरत्वे उदात्त तिङन्तांची सांख्यिकी पुढीलप्रमाणे -

## उदात्तकांड

| | | |
|---|---|---|
| १ | धातुस्वर प्रकरण | २६९ |
| २ | विकरणस्वर प्रकरण | १२६ |
| ३ | प्रत्ययस्वर प्रकरण | १४२ |
| ४ | आगमस्वर प्रकरण | १६९ |
| ५ | अभ्यस्तस्वर प्रकरण | ४६ |
| ६ | गतिनिघातस्वर प्रकरण | १०६ |
| ७ | संकीर्णस्वर प्रकरण | २१ |
| | एकूण | ८७९ |

या विषयावर पुढे अभ्यास करणाऱ्यांना, संशोधन करणाऱ्यांना तसेच महाविद्यालयीन विद्यार्थी व प्राध्यापकांनाही अध्ययनाध्यापनात वैदिक स्वरसिद्धी शिकविताना या प्रबंधातील या उदात्तकांडात करण्यात आलेल्या विवेचनाचा उपयोग होईल, असा विश्वास वाटतो. याचबरोबर व्याकरणाशास्त्रात आजपर्यंत जे तिङन्ताचे स्वर मान्यता पावलेले होते, त्याच्यात अधिक सूक्ष्म निरीक्षणाने आढळून आलेले नवीन स्वर जे स्वरप्रक्रिया अधिकाधिक सुस्पष्ट करून वेदवाङ्मयाच्या अभ्यासापासून दुरावणाऱ्या जिज्ञासू अभ्यासक, संशोधकांना पुन्हा याविषयाकडे आकृष्ट करून घेऊ शकेल.

**अनुदात्तकांड :-**

ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिद्धी करण्याचा संकल्प करून त्यामध्ये विशेष करून तिङन्ते निवडली. तिङन्ताची स्वरसिद्धी करण्याचा विषय समोर आला तेव्हा प्रथम तिङन्तावर उदात्तादिक स्वर केव्हा येतात, व उदात्तादिक स्वर नसतात तेव्हा त्या तिङन्तावर कोणता स्वर असतो, अशा प्रश्नांची उत्तरे 'तिङतिङः'[१] या सूत्राने दिलेले आहे. जेव्हा

---

१ पा. सू. ८।१।२८

तिङन्तापूर्वी तिङ्भिन्न पद असेल, तेव्हा त्या पुढील तिङन्त सर्वानुदात्त होईल. त्यानुसार सर्वानुदात्त युक्त तिङन्त एकत्रित संकलत करून त्यांचे प्रस्तुत 'अनुदात्तकांड' कल्पिले आहे.

या अनुदात्त कांडात आलेली सर्व तिङन्ते ही 'तिङतिङ:' या एकाच सूत्राने सर्वानुदात्त झालेली आहेत. यापैकी प्रत्येक तिङन्तापूर्वी एखादे नाम, सर्वनाम अर्थात यद् सर्वनाम वगळून, प्रातिपदिक अर्थात तद्धित, कृदन्त आहे. त्यामुळे तिङन्त सर्वानुदात्त झालेले आहे.

तिङन्त सर्वानुदात्त होताना उदात्तकांडात सांगितलेले धातुस्वर, विकरणस्वर, प्रत्ययस्वर, आगमस्वर, अभ्यस्तस्वर, गतिनिघातस्वर अशा सर्व स्वरांचा बाध होऊन तिङन्त पूर्ण सर्वानुदात्त होते. याचे मुख्य कारण म्हणजे भाषेतही बोलताना क्रियापदांवर जोर पडत नाही. त्यामुळे ती अनुदात्तच उच्चारली जातात. अर्थात येथे भाषाशास्त्रीय द्वारे तिङन्तच्या स्वराचा विचार केलेला नसून व्याकरणशास्त्राद्वारे हा अभ्यास मांडलेला आहे. त्यामुळे तिङ् भिन्न पद पूर्वक तिङन्त सर्वानुदात्त असेल.

येथे 'तिङतिङ:'[१] या सूत्रामध्ये 'अनुदात्तं सर्वमपादादौ'[२] या पूर्ण सूत्राचीच अनुवृत्ती आहे. त्यामुळे तिङन्त 'अपादौ' अर्थात पादारंभी असणार नाही, तेव्हाच ते सर्वानुदात्त होईल. तसेच 'सर्वम्' या पदामुळे 'उदात्तकांडात' सांगितलेले जे जे धातुस्वरादिक स्वर आहे, त्या सर्व स्वरांचा अनुदात्त होईल आणि म्हणूनच येथील सर्व तिङन्ते अनुदात्त आहेत.

उदात्तकांडाप्रमाणे या कांडाची प्रकरणे केलेली नाहीत. कारण स्वरदृष्ट्या उपरोक्ती प्रमाणे एकाच सूत्राने तिङन्त निघात होत असल्यामुळे वर्गीकरण केलेले नाही. परंतु, तळटीपांमध्ये मात्र ते तिङन्त कोणत्या स्वराचा बाध करून सर्वानुदात्त झाले आहे, हे सांगितले आहे. ज्यामुळे नवाधीतांना, अभ्यासू, जिज्ञासू, संशोधक या सर्वांना त्याचा निश्चितच उपयोग होईल तसेच तिङन्तनिघात हा सर्वांपेक्षा अत्यंत बलवान आहे, हे देखील स्पष्ट होईल.

---

१ पा. सू. ८।१।२८
२ पा. सू. ८।१।१८

अनुदात्त कांडात एकूण १५१४ सर्वानुदात्त तिङन्ते एकत्रित करून त्या त्या तिङन्तांनी उदात्तकांडात सांगितलेले स्वरांपैकी कोण-कोणत्या स्वरांचा बाध करून ही तिङन्ते सर्वानुदात्त झाली आहेत, हे सिद्ध करण्यात आलेले आहे.

## सारांश :-

वेदवाङ्मयामध्ये स्वरोच्चारणाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे आणि हे जाणूनच परोपरीने प्रातिशाख्य व शिक्षा ग्रंथांनी शुद्ध स्वरोच्चारणावर भर दिलेला आहे. या प्रबंधातही प्रातिशाख्ये व शिक्षा ग्रंथातील स्वरविषयक उल्लेखांचा परामर्श घेण्यात आलेला असून या प्रबंधाचा मुख्य उद्देश म्हणजे उदात्तादिक स्वरांची उपपत्ती सांगणे. आणि स्वरांची व्युत्पत्ती सांगण्यास केवळ व्याकरणशास्त्रच समर्थ ठरते हे वेगवेगळ्या उदाहरणांनी उपोद्घातात व अन्यत्र प्रकरणांमधून सिद्ध केले आहे. त्यात देखील पाणिनीय व्याकरण आज स्वरप्रक्रिया सांगण्यास खऱ्या अर्थाने कसे समर्थ आहे, हे देखील यातून स्पष्ट होईलच.

वेदवाङ्मयातील स्वरोच्चारण-शुद्धतेचे महत्त्व लक्षात घेऊन 'ऋग्वेदातील प्रथम मंडलाची स्वरसिद्धी (केवल तिङन्त)' हा विषय हाती घेतला. त्यामुळे तिङन्ताची स्वरसिद्धी सांगताना प्रथम मंडलातून समोर आलेली उदात्त व सर्वानुदात्त तिङन्ते 'उदात्तकांड' व 'अनुदात्तकांड' या दोन कांडात विभागून एकूण २३९३ तिङन्तांची स्वरसिद्धी सांगण्याचा प्रयत्न येथे केला आहे.

याचबरोबर 'उदात्तकांडात' तिङन्तावर जेव्हा उदात्त हा मुख्य स्वर असेल, तेव्हा त्या स्वराची विभागणी करून पूर्ववर्ति-वैयाकरणांनी सांगितलेल्या स्वरांच्या सह नवीन सूक्ष्म संशोधन करून उदात्तवर्तितिङन्त स्वराचे प्रकार मांडले आहेत ; जे निश्चितपणे प्रत्येक तिङन्ताला स्वत:ची स्वतंत्र ओळख करून देण्यास उपयोगी होऊन अभ्यासक, विद्यार्थी, प्राध्यापक, जिज्ञासू यांना सुलभतेने वैदिक शुद्ध स्वरोच्चारण पठन-पाठनास उपकारक ठरतील.

तेव्हा तिङन्तांची स्वरसिद्धी करताना समोर आलेले सर्व निष्कर्ष एकत्रितपणे मांडणे आवश्यक वाटते. तरी सर्व प्रकारांतर्गत समोर आलेले निष्कर्ष मांडीत आहे, ज्यामुळे ऋग्वेदीय प्रथम मंडलातील तिङन्ताची स्वरसिद्धी तर होईलच पण त्यासह पुढील मंडलातील देखील तत्सदृश तिङन्ताची स्वरसिद्धी करता येईल.

## निष्कर्ष :-

**१) धातुस्वर :-**

१. शप् विकरण व पित् प्रत्यय असताना धातुस्वर उदात्त राहील.

२. विकरणाचा लोप होऊन पित् प्रत्यय पुढे असेल, तरीही धातुस्वर उदात्त होईल.

३. शप् विकरणापुढील अपित् प्रत्यय अनुदात्त होऊन धातुस्वर उदात्त होईल.

४. विकरणाचा लोप होऊन धातू अदुपदेश, अनुदात्तेत् वा ङित् असेल, अपित् प्रत्यय अनुदात्त होऊन धातुस्वर उदात्त राहील.

५. कर्मकर्तरी प्रयोगात यक् प्रत्यय पुढे असताना अजन्त धातूंचा धातुस्वर उदात्त होईल.

६. वेदामध्ये कर्मणी प्रयोगातील यक् प्रत्यय असताना अजन्त व हलन्त धातूंचा धातुस्वर विकल्पाने उदात्त होईल.

**२) विकरणस्वर :-**

१. 'श्यन्' विकरणापुढे पित् प्रत्यय असताना नित् विकरणस्वर होऊन तिङन्त आद्युदात्त होईल.

२. तसेच अपित् प्रत्यय अनुदात्त होऊन नित् विकरणस्वराने तिङन्त आद्युदात्त होईल.

३. अदन्त (श, अय (णिच् + शप्), यक्, यङ्, क्यच्, स्य इ.) विकरणांपुढील अपित् सार्वधातुक प्रत्यय अनुदात्त होऊन विकरणस्वर उदात्त होईल.

४. 'श्नु, श्नम्, उ, श्ना' या विकरणांपुढे पित् प्रत्यय असतानाच विकरणस्वर उदात्त होईल.

**३) प्रत्ययस्वर :-**

१. विकरणाचा लोप झाला असून धातू अदुपदेश, अनुदात्तेत्, ङित् नसेल, तर अपित् प्रत्ययस्वर उदात्त राहील.

२. अभ्यस्त धातूंपुढील हलादि - अपित् प्रत्ययस्वर उदात्त राहील.

३. अपित् प्रत्यय असताना 'श्नु, श्नम्, उ, श्ना' या विकरणस्वराचा बाध करून प्रत्ययस्वर उदात्त होईल.

**४) अभ्यस्तस्वर :-**

१. अजादि - लसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्तांचा आदिस्वर उदात्त होईल.

२. पित् - लसार्वधातुक प्रत्यय असताना अभ्यस्तादिस्वर उदात्त होईल.

३. लित् प्रत्यय पुढे असताना अभ्यस्तान्त उदात्त होईल.

४. छांदस अभ्यस्त धातूंपुढे पित् वा अपित् प्रत्यय असताना विकल्पाने अभ्यस्तान्त उदात्त होईल.

५. अडादिक- आगमरहित चङ् पुढे असताना विकल्पाने अभ्यस्तान्त उदात्त होईल.

**५) आगमस्वर :-**

१. लुङ्, लङ्, लृङ् लकारात येणारे अट् व आट् आगम पूर्ववर्ति सर्व स्वरांचा बाध करून उदात्त होतील.

**६) गतिस्वर :-**

१. उदात्त तिङन्त असताना गतिसंज्ञक (उपसर्ग) सर्वानुदात्त होईल.

२. सर्वानुदात्ततिङन्त असताना गतिसंज्ञक उदात्त होईल.

३. दोन गति संज्ञक एका पुढे एक असून सर्वानुदात्त तिङन्त असेल, तर त्यातील पहिले गति संज्ञक सर्वानुदात्त व दुसरे उदात्त होईल.

